


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४२ । अंक ९–१० । जून जुलै १९८९
ज्येष्ठ-आषाढ-श्रावण, शके १९११
किंमत १२ रुपये. वार्षिक वर्गणी ४५ रुपये.
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–






संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी 'स्थायी निधी' निर्माण केला आहे आणि अनुदानही दिले आहे.

## नवभारताच्या वर्गणीत वाढ

कागदाच्या भरमसाट वाढलेल्या किंमती, मुद्रणाचे वाढलेले दर आणि वाढलेला पोस्टेजचा खर्च हे सर्व लक्षात घेता नवभारताच्या वार्षिक वर्गणीत वाढ करणे अपरिहार्य झाले आहे. **ऑक्टोबर १९८९ पासून वर्गणीचे नवे दर** खालीलप्रमाणे राहतील–

**वार्षिक वर्गणी**– रु. ६० /–
**किरकोळ अंकाची किंमत**– रु. ७ /–
**आजीव सदस्यत्व– व्यक्ती** : रु. ५००/–
**संस्था** : रु. ७५०/–

कृपया वर्गणीदारांनी वरील बदलाची नोंद घेऊन नवभारताला पूर्वीप्रमाणेच सहकार्य करावे, ही विनंती.

**– संपादक**









अनुक्रमणिका

# लेखक-परिचय

- **इ. कृ. परांजपे**– एल्फिन्स्टन कॉलेज, सिडनहॅम कॉलेज, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ पब्लिक ॲडमिनिस्ट्रेशन ह्या शिक्षणसंस्थांतून अर्थशास्त्राचे अध्यापन; भारत सरकारच्या विविध समित्यांवर अध्यक्ष वा सदस्य ह्या नात्याने काम; इंडियन कौन्सिल ऑफ सोशल सायन्स रिसर्चचे सीनिअर फेलो; जवाहरलाल नेहरू फेलो; निवास : सोनाली, प्रभात रोड, गल्ली ६, पुणे– ४११००४.
- **ज. सु. चौधरी**– किसन वीर महाविद्यालय, वाई येथे वाणिज्य विषयांचे प्राध्यापक व विभागप्रमुख, वाई ४१२८०३.
- **अरुण प्रभुणे**– मराठीचे प्राध्यापक, महाराष्ट्र उदयगिरी विद्यालय, उदगीर. निवास : 'चिंतामणी', 'श्री' नगर कॉलनी, उदगीर ( जि. लातूर ) ४१३५१७.
- **अ. ना. ठाकूर**– मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इ. विषयांचे संपादक; वाई– ४१२८०३
- **एस. डी. इनामदार**– मराठी कथाकार व विश्वकोशात विविध कलाविषयांचे संपादक; वाई– ४१२८०३.
- **प्र. म. बांदिवडेकर**– रामनारायण रूइया कॉलेज, मुंबई येथे राज्यशास्त्राचे प्राध्यापक; निवास : ४६/१५८१ सुभाषनगर, चेंबूर, मुंबई– ४०००७१
- **देवदत्त दाभोलकर**– माजी कुलगुरू, पुणे विद्यापीठ; भूतपूर्व संचालक, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशन, पुणे– २९; निवास : समन्वय, क्षिप्रा सहकारी वसाहत, २५।५।८ कर्वेनगर, पुणे– ४११०२९
- **म. द. हातकणंगलेकर**– प्रसिद्ध मराठी समीक्षक आणि भूतपूर्व प्राचार्य, विलिंग्डन कॉलेज; सांगली. निवास : ३१०–११ 'निर्वेद', कूपवाड रोड, विश्रामबाग, सांगली ४१६४१५.
- **अ. रे. डिसूझा**–प्राचार्य, महिला महाविद्यालय, कराड. निवास : २२९, सोमवार पेठ, कराड (जि. सातारा) ४१५११०.
- **स. न. होनप**– भौतिकीचे निवृत्त प्राध्यापक, स. प. महाविद्यालय, पुणे– ४११०३०; निवास : १५६२, सदाशिव पेठ, पुणे– ४११०३०.
- **अ. श्री. भडकमकर**– मराठीचे प्राध्यापक, स. गा. म. महाविद्यालय, कराड (जि. सातारा) ४१५११०.
- **यशवंत कळमकर**– किसन वीर महाविद्यालय, वाई येथे इंग्रजीचे प्राध्यापक व विभागप्रमुख; वाई– ४१२८०३.
- **रत्नाकर हातेकर**– किसन वीर महाविद्यालय, वाई येथे अर्थशास्त्राचे प्राध्यापक, धर्मपुरी, वाई– ४१२८०३.



अनुक्रमणिका








# नवभारत

जून–जुलै १९८९

अ नु क्र म



○ ○ ○










# संपादकीय

'नवभारता'चा जून-जुलै ८९ ह्या दोन महिन्यांचा हा जोडअंक आपल्या हाती विलंबाने पडत आहे, ह्याची सखेद जाणीव आम्हाला आहे. आमच्या अनेक अडचणींमुळे हे घडले. अंक लवकरात लवकर निघावा, ह्यासाठी पराकाष्ठेचे प्रयत्न करूनही हा विलंब आम्ही टाळू शकलो नाही, ह्याबद्दल अतिशय दिलगीर आहोत.

हा जोडअंक खरे तर एक विशेषांक म्हणून आम्हाला काढावयाचा होता. अलीकडच्या काळात महाविद्यालयीन प्राध्यापकांनी दोनदा केलेला दीर्घकालीन संप ही घटना अनेकांना विचार करावयास लावणारी. एका संपाच्या काळात वाई येथे संपावर असलेल्या प्राध्यापकांना श्री. वसंत पळशीकर ह्यांनी पाठविलेले एक अनौपचारिक पत्र वाचून ह्या अंकाची कल्पना सुचली. तसेच ह्या दोन्ही संपांबाबत उलट-सुलट प्रतिक्रिया विविध व्यक्तींकडून व्यक्त केल्या गेल्या. त्याही वाचनात आल्या. प्राध्यापकांचे संप आणि त्यांच्या अनुषंगाने अपरिहार्यपणे पुढे येणारे अन्य काही शैक्षणिक प्रश्न ह्यांचा चिकित्सक आणि विश्लेषक वृत्तीने विचार करून लिहिलेले काही लेख जर एका विशेषांकाच्या रूपाने एकत्र देता आले, तर ते अधिक उपयुक्त ठरेल आणि संपाच्या सनसनाटीमागे जाऊन पाहण्यासाठी एक वस्तुनिष्ठ यथादर्शन ( पर्स्पेक्टिव्ह ) ह्या लेखांतून गवसेल असा विचार हा विशेषांक काढण्यामागे होता. शिवाय प्रतिक्रियांबाबत—मग त्या भक्कम पाठिंब्याच्या असोत वा परखड विरोधाच्या—बोलायचे, तर त्या बहुधा तडकाफडकी, तावडतोबीने दिल्या जातात. त्या प्रतिक्रियांमागचा विचार त्यांत सर्वांगांनी व्यक्त होण्याची शक्यता फारशी नसतेच. तेव्हा प्रतिक्रिया व्यक्त करणाऱ्यांनाही ह्या विशेषांकाची कल्पना स्वागतार्ह वाटावी आणि त्यांचे सहकार्य आपणास मिळावे, ही अपेक्षा वावगी वा अस्वाभाविक नव्हती. पण ह्या संकल्पित अंकातून उभ्या केल्या जाणाऱ्या एका वैचारिक व्यासपीठावर येऊन आपले विचार मांडावे, अशी तळमळ मात्र फार थोड्यांनी दाखविली आणि अपेक्षित प्रतिसादाच्या संदर्भात बरीचशी निराशाच पदरी आली, हे खेदाने नमूद करणे भाग आहे. संपनेतृत्वाशी अगदी वरच्या पातळीवर संबंधित असलेल्या व्यक्तींकडून तर पत्रोत्तराबाबतही उदासीनता दिसली. 'विद्याक्षेत्रातल्या विद्यावंत वर्गाने विद्यासंपन्न व्यक्तींच्या नेतृत्वाखाली केलेले संप' हा ह्या अंकामागचा महत्त्वाचा संदर्भ असूनही असे घडावे, ही बाब आपल्याकडील एकूणच वैचारिक वातावरणाबद्दल बरेच काही सांगून जाते, ह्यात शंका नाही.

परंतु अशा निराशेतही उमेद देणारे अगत्यपूर्ण सहकार्य आम्हाला ज्यांच्याकडून मिळाले, त्यांचे आम्ही ऋणी आहोत. प्राचार्य देवदत्त दाभोलकर, प्राचार्य म. द. हातकणंगलेकर, प्राचार्य अ. रे. डिसोझा, प्रा. प्र. म. बांदिवडेकर, प्रा. य. शं. कळमकर, प्रा. अविनाश भडकमकर, प्रा. रत्नाकर हातेकर आणि प्रा. स. न. होनप ह्यांनी विशेषांकासाठी म्हणून दिलेले लेख, उपर्युक्त परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर ह्या जोडअंकात फक्त सलगपणे एक छोटा विभाग म्हणून आम्ही प्रसिद्ध केले. ह्या विशेषांकाची कल्पना निघाली, तेव्हा प्रा. य. शं. कळमकर ह्यांना आम्ही त्याचे अतिथी संपादकत्व स्वीकारण्याची विनंती केली होती आणि ती मान्य करून त्यांनी हा विशेषांक निघण्यासाठी म्हणून जी धडपड केली तिच्याबद्दल आम्ही त्यांचे विशेष आभारी आहोत.

— संपादक

**'प्राध्यापकांचा संप आणि आनुषंगिक प्रश्न'**

ह्या विभागात सलगपणे छापलेल्या लेखांतून एक गोष्ट स्पष्ट होते, की महाविद्यालयीन शिक्षणात आज जे प्रश्न उपस्थित झाले आहेत, त्याचे मुख्य कारण नियोजनाचा आणि खंबीर धोरणाचा अभाव, हे आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात राजकीय स्वातंत्र्याला अग्रक्रम दिल्यामुळे सामाजिक आणि शैक्षणिक प्रश्नांचा






जितक्या गंभीरपणे विचार व्हावयास हवा होता, तितका तो झाला नाही. स्वातंत्र्यानंतरच्या काळात आपल्या अर्थव्यवस्थेप्रमाणेच, अर्थव्यवस्थेशी निगडित असे शिक्षणाचेही काटेकोर संयोजन करावे, शिक्षणाचा योजनाबद्ध विकास व्हावा ह्याचे भान राखले गेले नाही. परिणामतः शिक्षण–विशेषतः महाविद्यालयीन शिक्षण–प्रवाहपतित धोरणाचा बळी ठरले.

महाविद्यालयीन शिक्षणाच्या आणि त्याचबरोबर प्राध्यापकांच्याही गुणवत्तेची चर्चा ह्या सर्वच लेखांतून थोड्याफार प्रमाणात आलेली आहे लोकसंख्येच्या स्फोटाप्रमाणेच महाविद्यालयीन शिक्षणाचाही जो स्फोट झाला त्यातून हा गुणवत्तेचा प्रश्न मुख्यतः निर्माण झालेला आहे, हे सर्वच मान्य करतात.

यावर उपाय काय ? प्रा. दाभोलकरांनी उपाय सुचविले आहेत. पण सत्ताधारी वर्गाला शैक्षणिक परिवर्तन खरोखर हवे आहे काय याबद्दलच प्रा. दाभोलकरांना मोठी शंका आहे. तरीदेखील त्यांनी उच्च शिक्षणाचे जे 'कळीचे' प्रश्न दिले आहेत ते सोडविण्यासाठी ते अखेर प्राध्यापकांनाच जबाबदार धरतात. या कळीच्या प्रश्नांत गुणवत्तेच्या अंगाने महत्त्वाचा एक प्रश्न राहिलाच, तो म्हणजे एका वर्गात विद्यार्थी किती असावेत हा. विद्यार्थिसंख्येमुळे अध्यापनपद्धती आणि अंतर्गत मूल्यमापनाच्या योजनांचा कसा पराभव होतो हे या क्षेत्रातल्या अनुभवी विचारवंतांना माहीत आहेच. यात पुन्हा वर्ग, बाके आणि आवश्यक शैक्षणिक साधनसामग्रीचा प्रश्न आहेच. एकूण शैक्षणिक खर्चाच्या ८० टक्के किंवा अधिक भाग शिक्षकांच्या पगारावरच खर्च होतो असे प्रा. दाभोलकरांनी नमूद केले आहे ते खरे आहे. शिक्षणाची प्राथमिक गरज शिक्षक. ही गरज पुरी करण्याइतपतच सरकारी धोरण होते आणि आहे. प्रा. बांदिवडेकर आणि प्रा. होनप यांनी हा साधन-सामग्रीचा प्रश्न मांडला आहेच. शासनाने या बाबतीत खूपच अनास्था दाखविलेली आहे. शिक्षकांवर जरी ८० टक्के खर्च होत असला तरी शिक्षक पुरेसे आहेत, असेही नाही.

स्वायत्त महाविद्यालये निर्माण करून गुणवत्तेची काही केंद्रे निर्माण करता येतील काय ? प्रा. बांदिवडे-करांनी स्वायत्ततेचे आव्हान स्वीकारावे, असे म्हटले आहे. आपली विद्यापीठे स्वायत्त आहेतच. पण काहीही बदल किंवा प्रयोग करावयाचे असतील, तर आर्थिक बाबतीत त्यांचे हात कसे बांधलेले आहेत हे प्रा. बांदिवडेकरही मान्य करतात. एखादा दुय्यम शिक्षणाधिकारीदेखील विद्यापीठांच्या अकादमिक धोरणावर आघात करू शकतो असा अनुभव आहे. पुन्हा, स्वायत्तता ही एखाद्या महाविद्यालयाची उत्क्रांत अवस्था असावी की ती 'दिली' जावी हा प्रश्न आहेच. अभ्यासक्रम, परीक्षापद्धती, प्राध्यापकांचे प्रशिक्षण, ग्रंथालय आणि परिसराचा विकास यांविषयी एखाद्या महाविद्यालयाने काही उपक्रम केले असतील, तशा काही योजना त्यांच्याकडे असतील, तर स्वायत्त बनण्याची इच्छाशक्ती त्या महाविद्यालयाकडे आणि संस्थेकडे आहे असे समजायला हरकत नाही. अशा महाविद्यालयांतील प्राध्यापकांनी स्वायत्ततेचे आव्हान स्वीकारावे. पण अशा स्वायत्त महाविद्यालयाचे वेगळेपण कसे दाखविणार ? पदवी प्रमाणपत्र जर विद्यापीठच देणार असेल तर या स्वायत्त महाविद्यालयांचा 'प्रॉडक्ट' बाह्य जगाला कळणार कसा ? असा प्रश्न आहेच.

प्राध्यापकांचा कार्यभार या विवाद्य प्रश्नावर प्रा. म. द. हातकणंगलेकर यांनी प्राध्यापकांना विचार करायला लावेल असा लेख लिहिला आहे. प्राध्यापक खरोखरच एक शैक्षणिक तास घेण्यासाठी किती परिश्रम घेतात ह्या प्रश्नाचे त्यांनी वस्तुनिष्ठ उत्तर दिलेले आहे. पण याचबरोबर आदर्श काय हेदेखील त्यांनी मांडले आहे. म्हणजे एक तास घ्यायचा असेल तर त्यामागे परिश्रम करायला लागतातच हे त्यांना मान्य आहे. प्राध्यापक परिश्रम घेत नाहीत, म्हणून शिकवून होत नाही. म्हणून त्यांचा कार्यभार वाढविला तरी फार तर अजून शिकवून होणार नाही असा तर्क मात्र यावरून कोणी काढणे योग्य होणार नाही. आपला प्रश्न गुण-वत्तेचा आहे. परिश्रम घेणारा प्राध्यापक हाच कार्यभारासाठी आपण दंडक म्हणून गृहीत धरला पाहिजे. प्राध्यापकांना परिश्रम घ्यायला लावण्याचे काम व्यवस्थापनाचे आणि विद्यार्थ्यांचेदेखील आहे. जबाबदार विद्यार्थ्यांनी तयारी करून न आलेल्या प्राध्यापकांना जाब विचारला पाहिजे आणि तास चुकविणाऱ्या प्राध्यापकांना व्यवस्थापनाने खुलासा विचारला पाहिजे. एवढेच नाही, तर प्राध्यापकांना आणि विद्यार्थ्यांना परिश्रम घ्यावे लागतील असे अभ्यासक्रम आणि परीक्षापद्धती आणणे हे अभ्यासमंडळांचे आणि विद्या-






पीठांचे काम आहे. विद्यार्थी मार्गदर्शके वाचून पास होतात किंवा वर्गात न बसता पास होतात ही टीका परीक्षापद्धतीवरची टीका आहे, अध्यापनावरची नाही. कारण सध्याच्या परीक्षापद्धतीमुळे गुणवान विद्यार्थी आणि कार्यक्षम प्राध्यापक यांना नेहमीच मोठे वैफल्य वाटत आलेले आहे. काही प्राध्यापक परिश्रम घेत नाहीत म्हणून त्यांचा कार्यभार वाढवावा मग गुणवत्तेचे काही झाले तरी चालेल, असा विचार करणे योग्य नाही. या न्यायाने लोक जाणीवपूर्वक मतदान करीत नाहीत म्हणून लोकशाहीच रद्द करावी असे म्हणावे लागेल.

प्राध्यापकांच्या कामाचे मूल्यमापन या महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा प्रा. हातेकरांच्या लेखात आलेली आहे. प्राध्यापक संघटनांनी पुढाकार घेऊन स्वयंमूल्यमापनाची योजना आखली आणि अमलात आणली तर ती त्यांच्यासाठी मोठी जमेची बाजू ठरेल. नवीन प्राध्यापकांसाठी प्राध्यापक संघटनेनेच प्रशिक्षणाची सोय करावी. त्यासाठी अनुभवी प्राध्यापकांची मदत घ्यावी. स्वयंमूल्यमापनाची तसेच इतरांनी केलेल्या मूल्य-मापनाची प्राध्यापकांना सवय नाही असे नाही. खरे म्हणजे प्राध्यापक स्वतःवर जितकी टीका करतात तितकी क्वचितच कुठल्या क्षेत्रातील लोक स्वतःवर टीका करीत असतील. तरीपण मूल्यमापनाच्या या प्रश्नाला निश्चित औपचारिक स्वरूप देणे आवश्यक आहे. असे मूल्यमापन म्हणजे सरकारी कचेऱ्यांतला तथाकथित सी. आर. (कॉन्फिडेन्शिअल रिपोर्ट) नव्हे, हे लक्षात घेऊन प्राध्यापकांनी प्रांजळपणे आपले आणि आपल्या सहकाऱ्यांचे मूल्यमापन केले पाहिजे. त्याचा उपयोग सुधारणा करण्यासाठी व्हावा, शिक्षा करण्यासाठी नाही याची हमी व्यवस्थापनानेदेखील घ्यावी. अशा योजनांना आणि प्रशिक्षणाला प्राध्यापक संघटनेचा विरोध नाही हे प्रा. भडकमकरांनी नमूद केलेले आहेच.

प्राध्यापकांचे प्रश्न सोडविण्यासाठी प्रा. डिसूझा आणि प्रा. भडकमकर दोघांनीही एका कायमस्वरूपी मंडळाची कल्पना मांडली आहे. असे मंडळ कार्यरत करता आले तर संप किंवा बहिष्कार हे मार्ग टाळता येतील. पण हे अखेर शासनाला आणि शासनाच्या नोकरशाहीला मान्य व्हायला हवे.

विशेषांकाच्या आमच्या योजनेनुसार ठरलेले जे लेख आमच्या हाती येऊ शकले नाहीत, ते पुढे उपलब्ध झाले, तर नवभारतातून यथावकाश प्रसिद्ध होतीलच.

**य. शं. कळमकर**
अतिथी संपादक

अनुक्रमणिका

# *भारताची आजची स्थिती : घसरण कोण व कशी थांबवणार ?

ह. कृ. परांजपे

आपल्या विद्यापीठाच्या या टिळक स्मृतिव्याख्यान-मालेमध्ये पुष्प गुंफण्यासाठी आपण मला बोलावलं याबद्दल मी आपला आभारी आहे. आजचे माझे भाषण टिळक स्मृतिदिनाला या वास्तूत व्हावं याच्या मागे काही वैशिष्टच आहे. आपल्याला माहीत असेल, की चाफेकरबंधूंनी जे क्रांतिकार्य केलं, त्या क्रांतिकार्या-नंतर ज्या घटना घडल्या, त्या या परिसरात घडल्या. एवढेच नाही, तर हा वाडा त्यामुळे भुताचा वाडा म्हणून संबोधला जात असे. माझ्या लहानपणी आम्ही घाबरत, जानव्याची गाठ धरून, येथून जात असू. आता ही चांगली गोष्ट आहे, की हा भुताचा वाडा राहिला नाही, विद्यापीठाच्या कार्याचा वाडा झाला आहे. त्या दृष्टीने हा इतिहास लक्षात घेता या वास्तूत व्याख्यान द्यावयाची संधी मला लाभली याचा मला आनंद वाटतो.

भारताची आजची स्थिती आपण जेव्हा लक्षात घेतो, तेव्हा बहुतेक जे भारताबद्दल स्वतंत्र अभ्यास करणारे आहेत, ते एतद्देशीय असोत किंवा बाहेरचे असोत, त्यांना जर भारताच्या स्थैर्यात व प्रगतीत रस असला तरी त्यांना या देशाचे आता भवितव्य काय, त्याची काळजी वाटल्याशिवाय राहात नाही. जेव्हा १९४७ साली भारत स्वतंत्र झाला तेव्हा त्या स्वतंत्र भारताकडून काही अपेक्षा होत्या. त्यांपैकी महत्त्वाची अपेक्षा म्हणजे स्वातंत्र्य-चळवळीचा इतिहास आणि या चळवळीत जे विचार मांडण्यात आले होते ते लक्षात घेता या देशामध्ये जास्तीत जास्त लोकशाही पद्धती, समता आणि बंधुभाव यांच्यावर आधारलेले आणि अन्यायाचे निराकरण करणारे असे राज्य निर्माण होईल आणि त्या दिशेने या देशाची प्रगती होईल अशी अपेक्षा होती. दुसरी अपेक्षा होती ती ही, की परकीयांच्या अमलाखाली भारतात जी एक आर्थिक बाबतीत गति-रोधाची स्थिती निर्माण झाली होती, ती थांबून, औद्योगिक व इतर आर्थिक विकास झपाट्याने घडून, या देशातील सर्व भागात, आणि लोकसंख्येच्या सर्व स्तरात माजलेले दारिद्र्य हे कमी होईल. थोड्या वर्षांत दारिद्र्याच्या खुणाही राहणार नाहीत आणि आर्थिक विकासाप्रमाणेच समता व बंधुभाव ही उद्दिष्टे लक्षात घेऊन विषमता कमी करण्यासाठी देशामध्ये आर्थिक, सामाजिक समता नांदविण्याचा अटोकाट प्रयत्न होईल, अशीही अपेक्षा होती.

## अपेक्षाभंग

आता स्वातंत्र्याला ४२ वर्षे झाली आणि नवीन घटना १९५० साली आपण मान्य केली त्यालाही जवळ जवळ ४० वर्षे झाली. अशा काळामध्ये या अपेक्षा कितपत फळाला आलेल्या आहेत ? जर आज मूलभूत आर्थिक चित्र काय आहे, हे लक्षात घेतलं तर हे स्पष्ट आहे की आधी जो आर्थिक गतिरोध झाला होता, तो संपला आहे. आर्थिक विकास, औद्योगिक विकास, हा चालू झाला आहे. उत्पादनात अनेक तऱ्हेची वाढ झाली आहे. विशेषत: जे मूलभूत, यंत्रसामग्री बन-विण्यासारखे, धंदे या देशात जवळ जवळ मुळीच विकास पावलेले नव्हते ते वसविले गेले, वाढले आणि त्यामुळे आज भारताच्या अर्थव्यवस्थेचे चित्र काही दृष्टीने १९४७ सालच्या तुलनेने पूर्णपणे बदललेले आहे. पण जरी या बाबतीत १९८९ मधील भारताची आर्थिक स्थिती १९४७ पेक्षा वेगळी आणि प्रगत असली तरीसुद्धा ही प्रगती काही अपेक्षेप्रमाणे झाली आहे, असे म्हणता येणार नाही. जे इतर देश दुसऱ्या महा-युद्धाच्या नंतरच्या काळामध्ये स्वतंत्र झाले आणि आपापल्या पद्धतीने विकास करण्याचा प्रयत्न करू लागले त्या देशांशी तुलना करता, आणि विशेषत: भारतासारखा दुसरा जो खंडप्राय देश चीन, जवळ

* टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे आयोजित लोकमान्य टिळक व्याख्यानमालेतील अकरावे पुष्प, संबंधितांच्या सौजन्याने येथे प्रसिद्ध करीत आहोत. --संपादक








जवळ त्याच काळात आपल्या मानेवरची अनेक प्रकारची जोखडे बाजूला टाकून आपल्या पद्धतीने वाटचाल करायला लागला, त्या चीनशी तुलना करता भारताची आर्थिक विकासाची गती कमी पडते असं कोणाही अभ्यासकाला दिसून येतं. मूलभूत धंद्यांचा निर्देशक म्हणून पोलादाच्या उत्पादनाचे आकडे घ्या किंवा लोकांच्या गरजा भागविण्याचे निर्देशक म्हणून अन्न-धान्याचे आकडे घ्या; या दोनहीमध्ये चीनने १९५० च्या सुमारास आपल्या नियोजित आर्थिक विकासाला सुरवात केली, तेव्हापासूनची त्याची प्रगती या अशा मूलभूत बाबतीत भारताच्या मानाने अतिशय झपाट्याने आणि स्थिर पायावर झालेली आहे. भारताच्या विकासाचा वेग चीनच्या मानाने बराच कमी राहिलेला आहे. जागतिक बँकेच्या गणतीप्रमाणे १९६२ ते १९८३ या काळात दरवर्षी विकासाचा सरासरी वेग भारतात १·८ होता तर चीनमध्ये तो ५·०० होता. जास्त तपशीलात न जाता असे म्हणता येईल की, भारताचा आर्थिक विकास अपेक्षेप्रमाणे आणि गरजां-प्रमाणे झाला नाही.

१९५५–५६ साली जेव्हा दुसरी पंचवार्षिक योजना मान्य केली आणि अंमलात आणली गेली, त्या वेळी ज्या कल्पना केलेल्या होत्या, त्यांत देशातले मूलभूत उद्योगधंदे वाढविण्याचा एक निर्देशक असा होता की दरवर्षी या देशात पोलादाचे उत्पादन दशलक्ष टनांनी वाढवू. अशी कल्पना होती की भारतात लोखंड आहे, कोळसा काळजीने वापरला तर बराच आहे, आणि भारतासारख्या खंडप्राय देशात विकासासाठी पोलादाची अतिशय आवश्यकता आहे. तेव्हा त्या दृष्टीने योजना आखण्यात आलेल्या होत्या. पण स्थिती आता प्रत्यक्षात काय आहे ? १९६० सालापासून आतापर्यंत पोलादाच्या उत्पादनाची वाढ ही केवळ एक कोटी टनांची आहे. जे ठरवलं त्याच्या एकचतु-र्थांश ते एकपंचमांश इतकीच वाढ पोलादाच्या उत्पा-दनात झाली. दुसरी कल्पना अशी मांडण्यात आली होती की, १९७५ मध्ये म्हणजे योजना सुरू झाल्या-पासून २५ वर्षांमध्ये दरडोई सरासरी खरे उत्पन्न १९५० सालच्या दुप्पट होईल. प्रत्यक्षात १९८५–८६ पर्यंतसुद्धा, म्हणजे १९७५ सालच्या पुढे १० वर्षे, देशाच्या सरासरी उत्पन्नाच्या निर्देशकाप्रमाणे बघितले तर ही वाढ केवळ ७१ टक्के झाली, १०० टक्के नाही. एवढेच नाही तर आर्थिक विकासाचा केवळ वेगच कमी पडला असे नाही तर विषमताही रुंदावली. विषमता अजूनही मोठ्या प्रमाणावर चालू आहे, त्याला खीळ पडलेली नाही, हे आकडेवारीवरून दिसते. उदा., १९७५ सालचे जे आकडे जागतिक बँकेने दिलेले आहेत, त्यावरून असे दिसून येते की भारतातील व्यक्तीव्यक्तींत उत्पन्नातील तफावत फार मोठी आहे. सगळ्यांत गरीब २० टक्के लोकांना राष्ट्रिय उत्पन्नाचा केवळ ७ टक्के भाग मिळतो, त्या नंतरच्या २० टक्के लोकांना ९ टक्के भाग मिळतो, त्या नंतरच्या २० टक्के लोकांना १३ टक्के भाग मिळतो, आणि सगळ्यांत जास्त उत्पन्नवाले जे २० टक्के आहेत त्यांना देशाच्या राष्ट्रिय उत्पन्नाचा जवळ जवळ निम्मा भाग मिळतो. जे अगदी सगळ्यांत वरचे १० टक्के आहेत त्यांना राष्ट्रिय उत्पन्नाचा जवळजवळ १/३ भाग मिळतो. अर्थात जर वरचे १–२ टक्के यांच्या उत्पन्नाचे आकडे आपल्याला मिळू शकले तर असे दिसेल की, त्यांना राष्ट्रिय उत्पन्नाचा फार मोठा भाग मिळतो. दुसरी काही आकडेवारी या बाबतीत उपलब्ध होते. एक अन्नधान्याची उपलब्धता; १९५१ मध्ये जी सरासरी उपलब्धता दर माणशी ३३४ ग्रॅम्स होती, ती १९८८ मध्ये ४०८ ग्रॅम्स होती. दिवसाला सरासरी ४०८ ग्रॅम्स म्हणजे जितकं अन्न खाणं हे आरोग्याला किमान आवश्यक मानलं जातं तितकंही अन्नधान्य आज सरा-सरी दरडोई मिळू शकत नाही. आणि ही सरासरी झाली; काही थोड्यांना यापेक्षा खूपच जास्त मिळते, आणि अनेकांना कमीच मिळते. दुष्काळात तर आण-खीच कमी मिळते. भारताची शेतीव्यवस्था व अन्न-धान्याचा पुरवठा हे अजून खूपसं पाऊसपाण्यावर अवलंबून आहे. डाळींची उपलब्धता ही १९५१ सालच्या मानाने कमी झालेली आहे. सामान्य लोकांना ज्यां-मधून प्रथिने मिळू शकतात, त्या डाळींची उपलब्धता १९५१ मध्ये दरडोई ६१ ग्रॅम्स होती, ती १९८८ मध्ये ३३ ग्रॅम्स आहे.

## विपन्नावस्था

एकूण देशात दारिद्र्य किती आहे ते समजण्यासाठी अर्थशास्त्री मंडळी दारिद्र्यरेषा म्हणून एका संकल्प-नेचा उपयोग करतात. जर कुटुंबातील सर्व माणसांना शरीराचं जितकं किमान पोषण आवश्यक आहे तितकं पोषण मिळायचं असेल तर ते पोषण मिळविण्यासाठी








किती उत्पन्न असले पाहिजे ? जर तेवढे उत्पन्न नसेल तर ते कुटुंब दारिद्रयरेषेखाली असं मानलं जातं. आज साधारणपणे अर्थशास्त्राच्या अभ्यासूंमध्ये एकमत आहे की दारिद्रयरेषेखाली किमान भारताची एकतृतीयांश लोकसंख्या आहे. आणि हे प्रमाण काही वर्षांपूर्वी जवळ जवळ एकद्वितीयांश होतं. त्यानंतर लोकसंख्या वाढत असल्यामुळे दारिद्रयरेषेखालच्या मंडळींची संख्या ही १९८९ मध्ये १९६० पेक्षा जास्त आहे. तेव्हा भारताची आर्थिक उन्नती, प्रगती, विकास अपेक्षिला तितका तर झाला नाहीच पण जी विपन्नावस्था ब्रिटिश अमदानीत भारतात फार मोठ्या प्रमाणात होती, आणि ज्यामुळे आपण ब्रिटिश राज्य उखडून टाकण्याचा विचार स्वातंत्र्यापूर्वी सतत मांडत होतो, ती विपन्नावस्था अजूनही नाहीशी झालेली नाही.

काही वेळा असा मुद्दा मांडला जातो की, देशाची आर्थिक स्थिती कशी आहे हे ठरविण्यासाठी, आणि विशेषत: दारिद्र्यात बुडून गेलेल्या लोकसंख्येचे प्रमाण ठरविण्यासाठी, कुटुंबाच्या उत्पन्नाचे आकडे ज्या तऱ्हेने वापरले जातात, तीत अनेक दोष आहेत. खेडेगावांमध्ये हिंडले तर राहणी मागच्यापेक्षा सुधारल्याच्या अनेक खुणा दिसतात. पूर्वी जी सर्वच मातीची घरे असत, त्याऐवजी आता विटांची घरे दिसू लागली आहेत. शिवाय सरकारकडून पंचवार्षिक योजनेखाली अनेक सेवा व सुविधा उपलब्ध करून दिल्या गेल्या आहेत. शिक्षणाचा सार्वत्रिक फैलाव आणि आरोग्यरक्षणाच्या सोयी यांना अशा सेवांमध्ये मोठे स्थान आहे. आणि या सार्वजनिक सेवांमुळे कुटुंबाच्या खऱ्याखुऱ्या उत्पन्नात निश्चितच वाढ होते. असा विचार मांडण्यामध्ये अध्याहृत धरले जाते ते हे, की सरकार या वेगवेगळ्या सेवांसाठी जो खर्च करते त्या खर्चाचा फायदा त्या सेवांच्या मार्फत सर्व उत्पन्नांच्या कुटुंबांना सारखाच मिळतो. पण प्रत्यक्ष अनुभव आणि अभ्यासावर आधारलेले अनेक अहवाल असे दर्शवितात की अशी वस्तुस्थिती नाही. सरकारी खर्च होत राहतो पण नागरिकांना या सुविधां-सेवांमार्फत जो आणि जितका फायदा मिळावा अशी कल्पना असते, तितका तो मिळत नाही. सर्व जातींना आणि सर्व उत्पन्नातील स्तरांना सार्वजनिक अगर सरकारी सेवांपासून जवळ जवळ समानच फायदा होतो असे मानणे चुकीचे होईल. जी कुटुंबे गरीब आहेत, दलित व वन्य समाजांतील आहेत, त्यांना हा फायदा मिळण्यात अनेक अडचणी असतात. दारिद्रयरेषेबाबतचा विचार आणि त्या संदर्भात गोळा केली जाणारी आकडेवारी यांमध्ये अनेक दोष आहेत यात शंका नाही. पण त्यातील दोषांवरच भर देणारी मंडळी, किंवा सरकारी खर्च काही सेवांवर झाला आहे तेव्हा त्याचे फायदे सर्व कुटुंबांना मिळाले असलेच पाहिजेत, असं धरून चालणारी मंडळी यांना रस असतो तो दारिद्रय झपाट्याने कमी होते आहे असे दाखविण्यात. दारिद्रयरेषेखालील लोकसंख्येचे आकडे हे काही प्रमाणात राजकारणाच्या खेळीतील एक प्यादे झाले आहे, ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

### भाववाढ

सामान्य नागरिकांच्या आर्थिक स्थितीवर विशेष परिणाम ज्यामुळे होतो अशी एक आर्थिक घटना म्हणजे भाववाढीची. भारताच्या योजनाकालामध्ये जरी सुरवातीपासूनच तुटीच्या आर्थिक व्यवस्थापनाची परंपरा चालू झाली असली तरी जमा आणि खर्च यामधील तूट जास्त वाढू द्यावयाची नाही आणि त्यामुळे होणारी भाववाढ ही मर्यादित राहील असे प्रयत्न करावयाचे हे योजनाकारांचे सूत्र होते. भाववाढीचा निर्देशांक भारतात ५–६ टक्क्यांहून जास्त वर न जाऊ देण्याबद्दलचा अभिमान भारताचे आर्थिक शासनकर्ते मानीत होते. पण गेल्या काही वर्षांत याही बाबतीत भारताचे आर्थिक व्यवस्थापन दुबळे झालेले आहे. सरकारी जमाखर्चातील तूट इतकी वाढत चालली आहे की त्यामुळे चलनवाढ होऊन भावांची घोडदौड आता प्रतिवर्षी १० टक्क्यांच्या जवळपास आली आहे. अशा तऱ्हेची भाववाढ होऊ लागली म्हणजे संघटित कामगार महागाई भत्त्याची मागणी ही सहजच पुढे आणतात. राहणीमानाचा नवीन निर्देशांक योग्य आहे की अयोग्य यावरही बराच वाद माजला आहे. परंतु या वादात न शिरता असे म्हणता येईल की भाववाढीची घोडदौड १० टक्क्यांच्या आसपास या वेगाने आता चालू आहे. अशा स्थितीत महागाई भत्त्याच्या सवलतीमुळे संघटित वर्ग आपले राहणीमान फार कमी होऊ न देण्यात काहीसे यशस्वी होतात. हाल होतात ते असंघटित कामगार, आणि ज्या छोट्या शेतकऱ्यांना स्वत: पिकविलेले धान्य पुरत नाही असे शेतकरी, या वर्गाचे.

## कर्जाचे सापळे

तुटीची अंदाजपत्रके सादर करण्यामधून भारताची अर्थव्यवस्था एका तऱ्हेच्या अंतर्गत कर्जाच्या सापळ्यात सापडण्याचा धोका निर्माण झाला आहे. जमा आणि खर्च यांतील तफावत वाढत राहिली म्हणजे ती भरून काढण्यासाठी कर्जे काढावी व उभारावी लागतात. या कर्जांचे प्रमाण वाढले की त्यावर द्यावयास लागणाऱ्या व्याजाचा बोजाही वाढत रहातो. हळूहळू अशी स्थिती होते की जुनी कर्जे फेडण्यासाठी आणि त्यावरील व्याज देण्यासाठी नवीन कर्जे काढावी लागतात. असे दुष्टचक्र चालू होणे यासच काही वेळा कर्जाचा सापळा अशी संज्ञा देण्यात येते. अशा तऱ्हेच्या सापळ्यात भारत सापडत चालला आहे असे गेल्या काही वर्षांच्या आकडेवारीवरून दिसते. याहीपेक्षा धोक्याची घटना म्हणजे भारत बहिर्गत कर्जाच्याही सापळ्यात सापडत जाण्याची चिन्हे आहेत. देशाच्या निर्यातीपासून पुरेसे परदेशी चलन उपलब्ध झाले नाही, आणि जितके उपलब्ध होईल त्यापेक्षा जास्त परदेशी चलन खर्च करणे आवश्यक वाटले, तर त्यासाठी परदेशी मदत घ्यावी लागते अगर कर्जे उभारावी लागतात. परदेशांकडून आर्थिक विकासाला अगर अडीअडचणीत मदत म्हणून जो पैसा उपलब्ध होतो त्याचा थोडाच भाग मदत म्हणून येतो; बराचसा भाग कर्जाच्या स्वरूपात मिळतो. परदेशी सरकार अगर आंतरराष्ट्रिय संस्था यांमार्फत जी कर्जे मिळतात त्यांवरील व्याजाचे दर–निदान कागदोपत्री तरी– माफक असतात. पण अशा कर्जांमधून मिळणाऱ्या एकूण रकमेत वाढत्या आयातीला पुरी पडेल इतकी वाढ होत नाही. मग परदेशातील व्यापारी बँका अगर तत्सम इतर संस्थांकडून कर्जे मिळविण्याचा प्रयत्न केला जातो. परकीय भांडवलवाल्यांनी आपल्या देशात भांडवलाची गुंतवणूक करावी म्हणूनही आवाहन केले जाते आणि त्यासाठी अमिष म्हणून अनेक सवलती दिल्या जातात. गेल्या दोन दशकांमध्ये परकीय मदतीवर अवलंबून राहण्याची भारताची प्रवृत्ती वाढते आहे. जागतिक बँकेसारख्या संस्था अशा तऱ्हेची कर्जे उभारून आयात-निर्यातीमधील तूट भरून काढण्यात फारशी चूक नाही असा भारताला अनेक वर्षे उपदेश करीत आले आहेत. १०–१२ वर्षांपूर्वी भारताच्या बाह्य कर्जाचे प्रमाण माफकसे होते. निर्यातीपासून मिळणाऱ्या परदेशी चलनातील १०–१२ टक्के इतकाच भाग आधी घेतलेल्या कर्जाच्या निवारणासाठी वापरावा लागत होता. हे गुणोत्तर कर्ज-व्यवस्थापन चांगले चालले आहे की नाही याचा चांगला निर्देश करणारे समजले जाते. हे गुणोत्तर १०–१२ टक्के इतके कमी असल्यामुळे जागतिक बँकेसारख्या संस्थांनी भारताला सल्ला दिला की आर्थिक विकासासाठी परदेशी भांडवल उभारण्यास भारताला भरपूर वाव आहे. त्याचबरोबर परदेशी भांडवलही येऊ द्यावे, आयात व्यापारावरही विशेष बंधने घालू नयेत; अंतर्गत नियंत्रणेही वरीचशी दूर करावीत अशा धोरणातूनच भारतातील उद्योगधंद्यांची आणि एकूण अर्थव्यवहारांची क्षमता वाढू शकेल, असा हा सल्ला होता.

अशा तऱ्हेचे धोरण भारताने विशेषतः १९७५-७६ सालापासून अंगीकारण्यास सुरवात केली. गेल्या पाच वर्षांत तर हे धोरण विशेषच अंमलात आले आहे. याचा परिणाम म्हणजे आयात खूपच वाढली आहे; आणि त्यावर अवलंबून असणारी निर्यात भराभर वाढू शकेल ही कल्पना मात्र प्रत्यक्षात उतरलेली नाही. आणि म्हणून निर्यात आणि कर्जनिवारण यांचे गुणोत्तर आता २५ अगर २६ टक्क्यांइतके झाले आहे. या तऱ्हेचे गुणोत्तर चालू राहणे धोक्याचे आहे हे स्पष्ट आहे. ज्या इतर देशांमध्ये अशाच गुणोत्तराची परिस्थिती आहे तेथे अनेक अडचणी उभ्या राहिल्या आहेत. परदेशी चलनाबाबतची स्थिती सुधारावयाची तर निर्यात वाढविली पाहिजे आणि परदेशी चलन मिळवण्यासाठी हरतऱ्हेचे प्रयत्न केले पाहिजेत. भांडवल–विशेषतः परदेशी चलनामधील–मिळावे म्हणून परकीय भांडवलाला सवलती दिल्या पाहिजेत. मग असे भांडवल पुरविणाऱ्या संस्था, देश आणि उद्योगसमूह यांच्या सल्ल्याने देशाचे आर्थिक धोरण ठरविले पाहिजे. म्हणजे देशाच्या आर्थिक धोरणाला परकीयांच्या सोयीप्रमाणे आणि कल्पनेप्रमाणे मुरड घातली पाहिजे. लॅटिन अमेरिकेमध्ये अनेक देशांचा अनुभव हाच आहे की, या तऱ्हेचे धोरण स्वीकारलेला देश कर्जबाजारी होतो. आर्थिक विकासाचा वेग काही काळ वाढला तरी त्यात सातत्य राहात नाही आणि मुख्यतः अयोग्य दिशेने आर्थिक विकास घडत जाण्यामुळे आणि सरकारी खर्चात मोठी छाट करण्याची आवश्यकता झाल्यामुळे सामान्य नागरिकांचे हाल होतात. यामधून राजकीय असंतोष निर्माण होण्याचा

धोका असतो. आणि अशा धोरणामुळे एखादा देश कर्जाच्या सापळ्यात सापडला की त्यातून बाहेर पडणे अवघड जाते. भारत अशा स्थितीत सापडण्याची धोक्याची चिन्हे आता स्पष्ट दिसू लागली आहेत.

## आत्मनिर्भरता ?

एकूणच परकीय भांडवलाबाबत जे धोरण अंगीकारावयाचे ते धोरण जेव्हा पंडित नेहरूंनी १९४९ मध्ये घालून दिले, तेव्हाच स्वातंत्र्यापूर्वीच्या कल्पनांपासून स्वतंत्र भारत लांब गेल्याची चिन्हे दिसू लागली होती. पण विशेषतः दुसरी पंचवार्षिक योजना तयार करताना आणि तिच्या सुरवातीच्या अंमलबजावणीच्या काळात आत्मनिर्भरतेवर जास्त भर देण्यात आला होता. परकीय भांडवलाने देशाच्या महत्त्वाच्या उद्योगधंद्यांवर पगडा बसवू नये, भांडवलाच्या बरोबर देशाचा अंतर्गत कारभार आणि राजकारण यांत प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष ढवळाढवळ करण्याची परकीयांना संधी मिळू नये, याबद्दल कटाक्षाने लक्ष देण्याला महत्त्व दिले गेले होते. परंतु १९५८-५९ मध्ये परकीय चलनाची चणचण भासू लागली, आणि अन्नधान्याच्या टंचाईमुळे मोठ्या प्रमाणावर आयात करण्याची आवश्यकता निर्माण झाली तेव्हाच भांडवलशाही संरचना असणाऱ्या परकीय देशांकडून मदत मागण्याची परंपरा सुरू झाली. जागतिक बँकेच्या मदतीने संपन्न देशांकडून मदत आणि कर्जे मिळविण्याची पद्धती रूढ झाली. त्याचाच परिणाम म्हणून अनेक उद्योगक्षेत्रांत परकीय भांडवलाच्या कंपन्यांना वाव देण्यात आला आणि तंत्रज्ञान आयात करण्यासाठी परकीय कंपन्यांशी करारमदार करून सहयोग साधण्याची पद्धती रूढ झाली.

तरीही अशा सहयोगाचे करार मर्यादित काळापुरते असावेत, तंत्रज्ञान थोड्याच काळात आत्मसात करून भारतीय कंपन्यांनी स्वतःच्या पायावर उभे राहावे, आणि पुढे तंत्रज्ञानाचा विकास स्वतःच करत राहावे, असे धोरण होते. आणि हे धोरण यशस्वी झाल्याची अनेक उदाहरणे आहेत. उदा., बजाज ऑटो या कंपनीने स्कूटर गाड्यांच्या उत्पादनासाठी पियाजीओ या इटालियन कंपनीशी सहयोग केला, पण हा सहयोगकरार पाच वर्षांपुरताच होता. सहयोग संपताच बजाज ऑटोने स्वतःच्या बळावर आत्मसात केलेल्या तंत्रज्ञानात हळूहळू थोडी भर टाकून भारताला या महत्त्वाच्या धंद्यात आत्मनिर्भर बनवण्यास मदत केली; इतकेच नव्हे तर काही प्रमाणात परदेशी बाजारपेठांमध्येसुद्धा पियाजीओशी चढाओढ करण्यात यश मिळविले. टेल्को या कंपनीचे उदाहरण तसेच आहे. मर्सिडिज बेन्झ या कंपनीकडून सहभागाच्या बळावर मिळविलेले तंत्रज्ञान उत्तम रीतीने आत्मसात करून या कंपनीने स्वतःच्या ट्रक आणि बसगाड्या यांच्या उत्पादनाबद्दल भारतात लौकिक तर मिळविलाच पण काही प्रमाणात परदेशी बाजारपेठेतसुद्धा यश मिळविले. अशी उदाहरणे पुढे असूनसुद्धा गेल्या काही वर्षांत सरकारने या बाबतीत धोरण सैल सोडले असून परकीय कंपन्यांशी सहयोग करण्याची आणि सर्व तऱ्हेच्या उत्पादनासाठी परकीयांच्या ओंजळीने पाणी पिण्याची जणू काही चढाओढच भारतातील औद्योगिक कंपन्यांमध्ये आता लागलेली आहे. मोटारीच्या धंद्यावरून हा फरक सहज लक्षात येईल. प्रीमिअर ऑटोची पद्मिनी गाडी आणि हिंदुस्थान मोटर्सची ॲम्बेसडर गाडी या जरी परदेशातील मोटारगाड्यांइतक्या तंत्रज्ञानात पुढारलेल्या नसल्या, या कंपन्यांनी तंत्रज्ञान सुधारून अद्ययावत करण्याकडे विशेष लक्ष दिले नसले, तरी निदान सुरवातीस मिळविलेल्या तंत्रज्ञानाच्या बळावर जवळ जवळ ९९% उत्पादन त्यांनी आता संपूर्ण एतद्देशीय केले होते. याउलट मारुती गाडीची स्थिती आहे. मारुती गाडीच्या बनावटीमध्ये इतकी वर्षे झाली तरी फार मोठा परदेशी चलनाचा वापर लागतो. कारण ३५ ते ४०% भाग आयात करावे लागतात; आणि या प्रमाणात लौकर घट होईल असे दिसत नाही. तंत्रज्ञ ज्याला 'स्क्रू ड्रायवर टेक्नॉलॉजी' म्हणतात असे खूपसे आयातीवर अवलंबून असलेले तंत्रज्ञान अनेक उद्योगधंद्यांमध्ये आज स्वीकारले जाऊ लागले आहे. याचा उघडच परिणाम आयात वाढण्यात झाला आहे.

## समुचित उत्पादनतंत्र व रोजगार

भारतात ब्रिटिश अमदानीमध्ये औद्योगिक विकास जरूर तसा झाला नाही अशी टीका करण्यामागे आणिक एक महत्त्वाचा मुद्दा होता; तो हा की शेतीधंद्यात पुरेसे काम वाढत्या लोकसंख्येला मिळू शकत नाही. सर्वांना काम मिळावयाचे आणि राहणीचे मान वाढावयाचे तर औद्योगिक विकासाशिवाय तरणोपाय नाही, ही कल्पना औद्योगिक विकासावर भर देताना महत्त्वाची मानली जात होती. पण गेल्या ४० वर्षांमध्ये जरी भारताचा औद्योगिक विकास काही दृष्टीने नेत्रदीपक झाला असला तरी बेकारी कमी करण्यास त्याचा






फारसा उपयोग झालेला नाही. याचे महत्त्वाचे कारण हे आहे की, बऱ्याचशा आधुनिक औद्योगिक धंद्यांच्या विकासाचे तंत्रज्ञान परदेशातून जसेच्या तसे आणून वापरण्याची प्रवृत्ती भारतातील उद्योगपतींमध्ये दिसून येते. बरेचसे उद्योगपती व्यापारी आणि पैशाच्या उलाढाली करणारे असल्यामुळे नव्या तऱ्हेचे तंत्रज्ञान येथे निर्माण करण्यात अगर परकीय तंत्रज्ञानामध्ये बदल घडवून आणण्यात त्यांना विशेष रस नसतो, त्यांचा तो वकूबही नसतो, हे त्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणता येईल. खरे म्हणजे भारताची गरिबीची आर्थिक स्थिती लक्षात घेता ज्या तंत्रज्ञानामुळे त्याच उत्पादनासाठी कमी भांडवल आणि जास्त श्रमशक्ती यांचा मिलाफ करता येईल, असे तंत्रज्ञान भारताला जास्त उपयोगी ठरेल. राष्ट्रिय उत्पन्न कमी असल्यामुळे भारताला भांडवलाची टंचाई भासते आणि यापुढेही काही दशके ती भासत राहणार. याउलट, भारतात श्रमशक्तीचा पुरवठा भरपूर आहे आणि केवळ अकुशल श्रमशक्तीचाच नव्हे; कुशल आणि शिक्षित श्रमशक्तीबाबतही तशीच स्थिती आहे. तेव्हा आपल्या औद्योगिक विकासाचे धोरण असे असले पाहिजे की, जेथे जेथे आणि जितके शक्य असेल तितके श्रमप्रधान तंत्र वापरले पाहिजे; जेथे अशी शक्यताच नसेल अशाच उद्योगात भांडवलप्रधान तंत्र वापरले पाहिजे. महात्मा गांधींच्या खादीग्रामोद्योगावर भर देण्यात मूलतः दृष्टिकोण हाच होता.

आम्ही जरी गेली ४० वर्षे महात्मा गांधींचे नाव घेत असलो आणि त्यांचे पुतळे जागोजागी उभारत असलो तरी त्यांच्या या मूलभूत विचारांकडे भारत सरकारने जवळ जवळ पूर्णपणे काणाडोळा केला आहे. खादी व ग्रामोद्योगात साहाय्य करण्याची विशिष्ट पद्धती आहे हे खरे. काही छोट्या धंद्यांना संरक्षण देऊन त्यांची वाढ करण्याचा प्रयत्न होत राहिला आहे, हेही खरे. पण मूलतः औद्योगिक तंत्रांबाबत श्रमप्रधान तंत्रास प्राधान्य देण्याची आणि भांडवलप्रधान तंत्र जेथे जेथे शक्य तेथे बाजूस ठेवण्याची काळजी घेतली जात नाही. त्याचा परिणाम असा होतो की, देश गरीब असल्यामुळे जे काही तुटपुंजे भांडवल विकासासाठी उपलब्ध होते, त्यातून उत्पादनही पुरेसे निघत नाही आणि रोजगारीही फारशी निर्माण होत नाही. शिवाय व्याजाचे दर कृत्रिम रीत्या कमी ठेवल्याने–आणि शिवाय आतासारखी १० टक्क्यांच्या आसपास भाववाढ होत असताना–बचत करण्यास उत्तेजनही कमी मिळते. त्याचबरोबर अनेक तऱ्हेच्या चुकीच्या आर्थिक घटनांना उत्तेजन मिळते. उदा., प्रचंड मोठ्या शहरांची वाढ हाही एक भांडवलप्रधान विकासाचा भाग कळत नकळत भारताने अंगीकारला आहे. अशा शहरांचा विकास झाला म्हणजे त्या शहरांतील व्यवहार सुव्यवस्थित चालू राहण्यासाठी अमर्याद भांडवली खर्च करावा लागतो आणि असे करूनही त्या शहरांतील सामान्य मनुष्याचे आयुष्य जिकिरीचे व कष्टाचे होते. सर्व तज्ज्ञांनी त्याविरुद्ध सूचना केल्या असूनसुद्धा मुंबईसारखे शहर प्रचंड वाढू देण्यात येते. नरिमन पॉइंटसारखी शहराच्या एका टोकाला समुद्र मागे हटवून वसती करण्याची योजना पार पाडली जाते. आणि अशा अदूरदर्शी धोरणामुळे वाहतुकीच्या आणि इतर सर्व सुखसोईंवर प्रचंड खर्च होऊनसुद्धा सामान्य नागरिकांच्या हालांना सीमा राहात नाही. शिवाय अशा शहरांच्या वाढीमुळे राहत्या घरांच्या किंमती अवास्तव वाढतात आणि बेकायदा व्यवहारांना आणि काळा पैसा वापरण्याला उत्तेजन मिळते.

## काळा पैसा आणि भ्रष्टाचार

काळ्या पैशाचा प्रचंड प्रमाणावर वापर हा भारताच्या अर्थव्यवस्थेचा गेल्या काही वर्षांमध्ये स्थायीभावच होऊन गेला आहे. करचुकवेगिरी आणि त्यातून वाचविलेला पैसा रोखीच्या व्यवहारांसाठी वापरणे ही पद्धती विशेषतः दुसऱ्या महायुद्धाच्या काळापासून भारतात वाढलेली होतीच. पण स्वातंत्र्योत्तर काळात या वृत्तीत वाढच झालेली आहे. आणि गेल्या काही वर्षांत तर भारतात अशी स्थिती झाली आहे, की देशाच्या एकूण आर्थिक व्यवहारात काळ्या पैशातील व्यवहारांचा भाग वाढता झालेला आहे. साधेपणाने राहण्याचे उदाहरण स्वातंत्र्यपूर्व नेतृत्व घालून देत होते. ती पद्धती नेतृत्वानेच आता सोडून दिल्यामुळे भोगवादास वाढते उत्तेजन मिळत आहे. यामुळे गरीब देशाने पोट बांधून बचत करावी, भांडवल जमवावे, आणि त्याचा सुयोग्य वापर करून झपाट्याने आर्थिक विकास करण्यास बघावे, ही कल्पना मागे पडत आहे. येनकेनप्रकारेण पैसा मिळवावा; त्यासाठी सूक्त–असूक्त कशाही मार्गांचा वापर करावा; लाच घेण्यास व देण्यास, फसवाफसवी करण्यास अगर दुसरा मार्गच न सापडला तर गुन्हेगारीने संपन्न होण्यास मागेपुढे पाहू नये, अशी वृत्ती समाजात वाढत आहे. भ्रष्टाचाराने सर्व राजकीय संस्था आणि अर्थव्यवहार ग्रासून टाकले आहेत. एका



बाजूने परदेशी चलन वाचविण्यासाठी आयातीवर नियंत्रणे ठेवली जातात; उलट दुसऱ्या बाजूने चैनीचा परदेशी मालसुद्धा तस्करी व्यापाराच्या मार्गे सहज उपलब्ध होतो, असे दिसते. आणि अशा मालाचा वापर करण्यात आणि भ्रष्टाचारात भाग घेण्यात जवळ जवळ कोणासही काही शरम वाटत नाही अशी वाढती स्थिती आहे.

अर्थव्यवस्था योजनेबरहुकूम चालावी, योजनेत घालून दिलेल्या प्राधान्यांप्रमाणे साधनसामग्रीचा वापर व्हावा, या हेतूंनी वेगवेगळे कायदे करून नियंत्रणाचे अधिकार सरकारकडे देण्यात आले आहेत. पण आता अनेक वर्षांचा अनुभव असा आहे की, नियंत्रणांच्या अधिकारांचा वापर सत्ताधारी वर्ग—मग त्यात राजकारणीही येतात आणि सरकारी नोकरही येतात—जास्त करून आपल्या वैयक्तिक फायद्यासाठी करून घेतो. नियंत्रणे म्हणजे टोलनाकी; जे राजकारणी सत्ताधारी अगर सरकारी नोकर अशा टोलनाक्यांवर बसलेले असतील त्यांना "टोल" द्यावा म्हणजे नियंत्रणातून सुटका होऊ शकते हे आता सर्वांना माहीत आहे.

## आर्थिक खंड आणि विषमता

औद्योगिक विकास भांडवलप्रधान तंत्रावर आधारून होत असल्यामुळे महत्त्वाच्या औद्योगिक क्षेत्रात मक्तेदारी निर्माण झाली आहे. अशा धंद्यांमध्ये नेमले गेलेले कामगार संख्येने थोडे आणि संघटित असल्यामुळे त्यांना आपली मजुरी वाढून घेणे तितकेसे अवघड जात नाही. परिणाम असा होतो की, अवाजवी उत्पन्न मिळवणाऱ्यांच्या संख्येत थोडीशी भर पडते. पुण्याच्या जवळपासच्या मक्तेदारी कारखान्यांमध्ये अगदी अकुशल कामगारसुद्धा आता रु. २,००० ते २,५०० पर्यंत मासिक उत्पन्न मिळवितात. सरकारी क्षेत्रातील अगर शासनातील शिपायालासुद्धा रु. १,४०० ते १,५०० मासिक मिळू शकतात. पण याउलट, अशाच कामगारांचे भाऊबंद बेकारीत तडफडत असतात किंवा रोजकामाचे मजूर म्हणून दिवसाला १०–१२ रुपये मिळाले तरी त्यांना धन्य वाटते, अशी परिस्थिती आहे. शिवाय ज्या व्यक्तींना वरच्या जागा—सरकारी अगर निमसरकारी, उद्योग, व्यापार अगर शासन—कोणत्याही क्षेत्रात मिळतात त्यांचे उत्पन्न तर सामान्य माणसापेक्षा कितीतरी जास्त असते. भारतातील सर्वव्यापी दारिद्र्याचा आणि अतिशय कमी असलेल्या दरडोई उत्पन्नाचा या संख्येने लहान वर्गाच्या उत्पन्नावर विशेष काही परिणाम होत नाही. स्थिती अशी दिसते की, या वर्गाच्या उत्पन्नात आर्थिक खंड (Rent) ज्याला म्हणता येईल, अशा स्वरूपाचे उत्पन्न महत्त्वाचे असते. संपत्ती आणि उत्पन्न यांतील विषमता ही या तऱ्हेच्या आर्थिक व राजकीय संरचनेमध्ये नुसती कायम राहात नाही तर वाढत राहते.

## राजकीय मक्तेदारी व केंद्रीकरण

राजकीय क्षेत्रातील भारताची परिस्थिती पाहता भारताने स्वातंत्र्यानंतर थोड्याच काळात आपली लोकशाही घटना बनवून अमलात आणली. एवढेच नव्हे तर गेली ४० वर्षे लोकशाही टिकून राहिली. सातत्याने देशव्यापी निवडणुका झाल्या आणि सर्व वयात आलेल्या नागरिकांना मतप्रदर्शनाचा हक्क बहुतकरून खराखुरा बजावता आला, या भारताला अभिमानास्पद घटना आहेत यात शंका नाही. पण याचबरोबर राजकीय परिस्थिती दिवसेंदिवस बिघडत चालली आहे आणि धोक्याचा इशारा देणाऱ्या अनेक घटना घडत आहेत, हेही विसरून चालणार नाही. एक तर १९४६ पासून आजतागायत—मधली ३-४ वर्षे सोडता—मध्यवर्ती सत्ता एकाच पक्षाकडे किंबहुना त्यातील एकाच गटाकडे राहिलेली आहे. इतकेच नव्हे तर पंतप्रधानकी जवळ जवळ या सर्व काळात एकाच घराण्यातील तीन व्यक्तींकडे राहिलेली आहे. हे काही उत्तम लोकशाहीचे लक्षण मानता येणार नाही. आता हे खरे की, ही मक्तेदारी लोकांच्या मतांच्या पाठिंब्यावरच आणि बहुतांशी खुल्या निवडणुकींवर आधारलेली आहे. पण असे असले तरी कोणत्याही मक्तेदारीतून ज्या विषप्रवृत्ती निर्माण होतात, त्या या क्षेत्रातही वाढत्या प्रमाणात दिसू लागल्या आहेत. राजकारणात आणि शासनात सरंजामशाहीतील दरबारासारखी स्थिती निर्माण झालेली आहे, तोंडपुजेपणास उत्तेजन मिळत आहे; आणि स्वतंत्र प्रज्ञेच्या मंडळींना राजकारणात भाग घेणे अशक्य झाले आहे. भारताचे पहिले पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांच्या पंतप्रधानकीच्या अमदानीतच या प्रवृत्ती दिसू लागल्या होत्या, हे श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या आत्मचरित्रावरून आपल्याला दिसते. पुढच्या इंदिरा गांधींच्या अमदानीत या प्रवृत्ती आणखी वाढल्या आणि राजीव गांधी यांच्या कारकीर्दीत तर या प्रवृत्तींना ऊत आला आहे. सत्तेच्या मक्तेदारीमुळे केंद्रीकरण प्रचंड प्रमाणात वाढते, सरकारी नोकर स्पष्ट सल्ला देण्यास कांकू करतात. सर्व सत्ता पंतप्रधानांच्या कार्यालयात केंद्रित झाल्यामुळे दिरंगाई माजते आणि भ्रष्टाचारालाही उत्तेजन मिळते.










**सर्वत्र घसरण**

लोकशाही पद्धती योग्य तऱ्हेने चालवावयाची तर वेगवेगळ्या राजकीय पक्षांनी काही किमान नियम राजकारणात वावरण्याबाबत पाळले पाहिजेत. त्यांनी कितीही वादविवाद केले तरीही अखेर आपणा सर्वांना एकाच देशात राहावयाचे आहे, एकाच देशाचा विकास साधावयाचा आहे, याचा त्यांना विसर पडता कामा नये, हे आवश्यक आहे. पण गेल्या १५ वर्षांत याबाबतची परिस्थिती फारच बिघडत चाललेली आहे. आता तर असे दिसते की, एकमेकांना राष्ट्रद्रोही आणि भ्रष्ट ठरविण्याची चढाओढच वेगवेगळ्या राजकीय पक्षांमध्ये व त्यांच्या नेत्यांमध्ये लागली आहे. एका बाजूने आता जवळ जवळ कोणत्याही पक्षात अंतर्गत लोकशाही कारभार चालत नाही; तर दुसऱ्या बाजूने पक्षांचे हिशेब–विशेषत: निवडणुकीच्या कामासाठी खर्चण्यात आलेल्या पैशाचा हिशेब–जाहीर करण्याची पद्धतीच उरलेली नाही. मुख्यत: १९७० नंतरच्या काळात काळ्या पैशाचा प्रचंड प्रमाणात वापर होतो आहे, हे सर्वांसच स्पष्ट दिसते. एकदा निवडून आले की, पाच वर्षे सामान्य नागरिकांच्या स्थितीकडे लक्ष देण्याची गरज नाही अशी भावना बहुतेक लोकप्रतिनिधींची दिसते.

महात्मा गांधींच्या शिकवणुकीप्रमाणे भारताची लोकशाही ही विकेंद्रित असली पाहिजे. पंचायती राज्य या छोट्या घटकापासून वरपर्यंत लोकांचा कारभारात सहभाग असला पाहिजे, हे तत्त्व वरवर पाहता सर्वमान्य झाले आहे. पण प्रत्यक्षात केंद्रीकरणाची प्रवृत्ती प्रचंड दिसते. संविधान बनवितानाच भारतासारख्या खंडप्राय देशात खरेखुरे संघराज्य स्थापले पाहिजे अशी काळजी घेतली गेली नाही. घटकराज्ये कशी असावीत; भारतात आपापले स्वतंत्र इतिहास आणि समृद्ध भाषा असणारी अनेक राष्ट्रिके आहेत, त्यांना खूपशी स्वायत्तता दिली पाहिजे; त्यातूनच आर्थिक विकास आणि लोकशाही शासन ही दोनही उद्दिष्टे साधू शकतील. घटना बनविताना ही कल्पना अमलात आणण्यात मोठी कसूर झाली. घटनेन्वये केंद्राला दिलेल्या अधिकारांचाही वाढता गैरवापर झाला, याची अनेक उदाहरणे केंद्र-राज्यसंबंधीचा अभ्यास करून सरकारिया आयोगाने दिलेली आहेत. शिवाय संविधान बनविताना कल्पना नव्हती अशा तऱ्हेचे केंद्रीकरण योजना आयोगामार्फत आणि अखिल भारतीय सेवांचा वापर करून आता वाढत्या प्रमाणात करण्यात येत आहे. आता जरी ग्रामपंचायती, नगरपालिका इ. संस्थांना स्वायत्तता भोगता यावी म्हणून घटनादुरुस्ती करण्याची मोहीम चालू असली तरी अनेक राज्यांमध्ये नगरपालिका, जिल्हा परिषदा यांच्या निवडणुका वर्षानुवर्षे पुढे ढकलण्यात आल्या आहेत, हे जगजाहीर आहे. त्यामुळे इतर अनेक क्षेत्रांप्रमाणेच राजकीय व शासकीय संरचनेतही भाषा एक बोलावी, प्रत्यक्षात वेगळेच काही करावे, ही प्रवृत्ती वाढती असलेली दिसत आहे.

राजकीय क्षेत्रातील या सर्व घटनांमुळे राजकारणात भ्रष्टाचार माजला आहे. राजकारण हा धंदा होऊ पाहात आहे. आणि गुन्हेगारी आणि राजकारण यांमध्ये घनिष्ठ संबंध निर्माण होत आहेत. देशाच्या अनेक भागांत वेगवेगळ्या तऱ्हेची गुन्हेगारी वाढत असून गुन्हेगारांना राजकीय पुढारी आणि वेगवेगळ्या स्तरांवरचे शासन यांच्याकडून संरक्षण मिळते अशी जनतेमध्ये भावना आहे.

भारताच्या स्वातंत्र्य-चळवळीचे एक अंग म्हणजे भारताच्या जुन्या परंपरेतील अस्पृश्यता, आणि स्त्रीवर्गावर होणारा जुलूम, यांसारख्या प्रवृत्तींचा नायनाट करणे हे होते. त्या दृष्टीने भारताच्या संविधानात अस्पृश्यता रद्दबातल होण्याबाबत स्पष्ट तरतूदही करण्यात आली.

पण आज असे दिसून येते की, देशाचे अनेक ग्रामीण भाग असे आहेत की जेथे अजूनही अस्पृश्यांवर अन्याय होत राहतात आणि त्यांचे निवारण शासन व राजकारणी नेतृत्व यांच्याकडून होत नाही. जाती, धर्म अगर लिंग यांवर आधारून कोणाही नागरिकाला कमी लेखले जाणार नाही, सर्व नागरिकांना सारखेच अधिकार असतील, असे आम्ही संविधानामार्फत ठरविले असले तरी ते प्रत्यक्षात आणणे या ४० वर्षांत विशेष जमलेले नाही. उलट, जातिद्वेष वाढतो आहे. त्याचा आणि धर्मवेडाचा राजकारणासाठी वापर करण्याची प्रवृत्तीही वाढत आहे, असे दिसते. अशा सर्व चुकीच्या प्रवृत्तींचा आणि अडचणींचा पाढा वाचावा तितका थोडाच आहे. यातून देशाला वाचविले पाहिजे, ही चुकीची दिशा बदलून भारताची नौका योग्य दिशेला वळविली पाहिजे, तरच ती टिकून राहील आणि योग्य दिशेने वाटचाल करू लागेल हे सर्वांना पटते.

प्रश्न असा आहे की, हे कसे होणार? कोण करणार? मांजराच्या गळ्यात घंटा कोण बांधणार?







अनुक्रमणिका

## राजकीय पक्षांची स्थिती

आजचे पक्ष, उपपक्ष या दृष्टीने विशेष उपयोगी पडतील असे दिसत नाही. स्वातंत्र्य-काळापूर्वीची काँग्रेस हा पक्ष नव्हताच; ती एक राष्ट्रिय आघाडी होती. स्वातंत्र्यानंतर तो पक्ष झाला, पण तरीही तऱ्हेतऱ्हेच्या मतांची मंडळी त्यात असल्यामुळे त्या पक्षास काहीसे आघाडीचे स्वरूपच राहात गेले. १९५०, किंबहुना १९५५ पर्यंतसुद्धा त्या पक्षात काहीतरी धोरणात्मक वाद होत असत, थोडीतरी अंतर्गत लोकशाही नांदत असे. पण विशेषतः १९७० पासून तशी स्थिती राहिलेली नाही. १९७८ पासून तर एका व्यक्तीच्या नावानेच अधिकृत काँग्रेस पक्ष ओळखला जातो; आणि आधी इंदिरा गांधी आणि आता राजीव गांधी यांच्याशी पूर्ण निष्ठा असणारे हाच त्या पक्षाचा स्थायीभाव मानला जातो. पक्षांतर्गत लोकशाही १९७० पासून संपुष्टात आलेली आहे. काँग्रेसला प्रतिस्पर्धी म्हणून जो जनता पक्ष १९७७ मध्ये पुढे आला त्याचे स्वरूप तसेच आघाडीचे होते; आणि आता जे जनता दल निर्माण झाले आहे त्याचे स्वरूप तसेच आहे. पूर्वीचा समाजवादी पक्ष जनता पक्षात विलीन झाला. साम्यवादी पक्षात फाटाफूट झाली असून त्याचे दोन पक्ष झाले आहेत; आणि त्यांचा प्रभाव मुख्यतः बंगाल, त्रिपुरा, आणि केरळ याच राज्यांत विशेष आहे. इतरत्र काही थोड्या तालुक्यांत अगर जिल्ह्यांत त्यांचा प्रभाव आहे. औद्योगिक शहरांमध्येही या डाव्या म्हणवणाऱ्या पक्षांचा फारसा प्रभाव राहिलेला नाही. केवळ कलकत्ता यास अपवाद आहे. पूर्वीचा जनसंघ आता भारतीय जनता पक्ष म्हणून काम करीत आहे. आजवर कोणत्याही राज्यात त्याने पुरेशी आघाडी मारलेली नाही. पण उत्तर भारतात, राजस्थान, मध्य प्रदेश, हिमाचल आणि उत्तर प्रदेश यांत त्याचा काही भागात प्रभाव आहे. या संदर्भात एक नवीन घटना घडून येत आहे. ती म्हणजे प्रादेशिक पक्षांचा विकास. केंद्रीकरणाच्या प्रवृत्तीला उत्तर म्हणूनच की काय तामिळनाडू, आंध्र, आसाम अशा काही राज्यांत प्रादेशिक पक्षांनी जोर धरला आहे. पक्ष-उपपक्षांची अशी स्थिती असल्यामुळे भारताचे राजकीय भवितव्य कसे घडेल, वर उल्लेखलेले अतिशय अवघड प्रश्न सोडविण्याची कुवत असलेला राजकीय पक्ष केंद्रात सत्तेवर येऊ शकेल की नाही याबद्दल दाट शंका येण्यास जागा आहे. सत्ताधारी काँग्रेसशिवाय कोणत्याही एका पक्षाला राष्ट्रव्यापी स्थान नाही, आणि अधिकारात असल्यामुळे हाती असलेल्या सत्तेचा सूक्तासूक्त वापर करण्याची पद्धती काँग्रेस पक्षात वाढत आहे. त्यामुळे त्या पक्षाकडे असलेली सत्तेची मक्तेदारी मोडून काढता येईल अशी खात्री वाटण्यासारखी परिस्थिती नाही.



## राजकीय मक्तेदारी मोडणे आवश्यक

पण अशी मक्तेदारी चालत राहण्यात देशाच्या लोकशाहीला आणि प्रगतीला धोका आहे, जे आता जास्तजास्त स्पष्ट होत आहे. पक्षांतर्गत लोकशाही तर नाहीच, पण शासनातही सर्व सत्तासाधनांचा आणि न्यायालये, निवडणूक आयोग, राज्यपाल किंवा राष्ट्रपती यांसारख्या महत्त्वाच्या संस्थांचासुद्धा गैरउपयोग करण्याची वाढती प्रवृत्ती या मक्तेदारीतून निर्माण होताना दिसते; आणि त्यावर कोणताही धरबंध राहात नाही. तेव्हा ही एका पक्षाची मक्तेदारी मोडणे हे निरोगी लोकशाहीच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. जरी दुसरा जो पक्ष उभा राहील त्याचेही स्वरूप आघाडी सारखेच असले. राजकीय व आर्थिक तत्त्वज्ञानाची त्याला विशेष चाड नसली, आणि सत्ता मिळाल्यावर थोड्याच काळात तोही पक्ष सत्तेचा गैरवापर करू लागेल अशी भीती बाळगण्यास जागा असली, तरीसुद्धा निदान दोन राष्ट्रव्यापी पक्ष अथवा आघाड्या उभ्या राहाणे आता आवश्यक आहे. आपल्या हातून सत्ता ४-५ वर्षांत जाऊ शकते, मतदारसुद्धा दुसरा पक्ष निवडून देऊ शकतात या काळजीमुळे तरी सत्ताधाऱ्यांवर काही वचक राहण्याची आशा असते. जरी अमेरिकेतील डेमोक्रॅटिक आणि रिपब्लिकन या दोन पक्षांसारखीच भारतातील पक्षांची स्थिती काही काळ राहिली तरी सत्तेच्या या मनमानी वापरावर काहीसा वचक राहील. या दृष्टीने काँग्रेस पक्षाच्या विरोधी राजकीय पक्ष अगर आघाडी निर्माण होणे आणि तिच्याकडे सत्ता जाऊ शकेल अशी परिस्थिती निर्माण करणे हे लोकशाही-वाद्यांचे कर्तव्यच म्हणता येईल. अर्थात याही आघाडीची अगर पक्षाची मक्तेदारी राहणार नाही अशी काळजी घेणे महत्त्वाचे आहे.

आपणास हे विसरता येणार नाही की, भारतात लोकशाही राज्याची परंपरा नाही. एवढ्या मोठ्या भूभागावर एकच राज्य आणि तेही लोकशाहीचे असणे हे अगदी नवीन आहे. युरोप खंडातील राष्ट्रांनी अनेक शतके एकमेकांशी युद्ध करण्यात घालविल्यानंतर आता आपले काही बाबतीत एकत्रीकरण असावे, बाजारपेठ सर्वांची एक असावी, हळूहळू सर्वांचे मिळून विधिमंडळ

असावे, कायदे बनवावेत, असा विचार युरोपात वाढता आहे. ब्रिटिश अंमलामुळे इतिहासाने भारताला हा एकत्रीकरणाचा वारसाच मिळवून दिला आहे. पाकिस्तानात सामील झालेला भाग सोडून द्या, पण बाकीचाही एवढा मोठा भूभाग एकछत्री संघराज्याखाली असण्याचे सर्वच भारतीय जनतेच्या विकासाच्या आणि हिताच्या दृष्टीने अनेक फायदे आहेत. तेव्हा हा एकत्रितपणा आणि लोकशाही ही प्राणपणाने जतन करणे महत्त्वाचे आहे. सामान्य जनतेचा उद्धार व्हावयाचा तर तो हा जो मूलभूत पाया १९४७ नंतरच्या काळात संघराज्य आणि लोकशाही या स्वरूपात घालण्यात आला आहे, तो टिकवूनच होणार आहे. हे खरे की, ज्या गटांच्या हातात १९४७ साली सत्ता आली, आणि गेल्या ४० वर्षांत ज्या गटांनी आपली सत्ता वाढवली व टिकवली आहे त्यांच्या घोडचुकांमुळे देशाची एकता व लोकशाही दोनही हळूहळू धोक्यात आलेली स्पष्ट दिसतात. त्यांची ठळक उदाहरणे म्हणजे देशाच्या ईशान्य भागातील बंडाळीचे प्रश्न, पंजाबातील आततायींचा प्रश्न, आणि जम्मू आणि काश्मिर या राज्यातील वाढता दहशतवाद आणि फुटीर वृत्ती. गेल्या १० वर्षांत काहीसा समजूतदारपणा दाखवून ईशान्येकडील राज्यांमध्ये थोडी शांतता निर्माण करता आली आहे हे खरे, पण ही शांतता स्थिर आहे असे आसाममधील घटनांवरून खात्रीने म्हणता येत नाही. जो शीख-समाज भारताच्या स्वातंत्र्य-चळवळीत आणि स्वातंत्र्योत्तर काळात–विशेषत: भारत-पाक युद्धांमध्ये–सतत आघाडीने सहभागी राहिला त्या समाजाला केंद्रातील सत्ताधाऱ्यांच्या अदूरदर्शी धोरणामुळे आम्ही संशयात लोटले आहे. तसेच काश्मिर खोऱ्यातील जी जनता १९४६–४७ मध्ये हिंदू-मुसलमान दंगे मोठ्या प्रमाणावर झाले असतानासुद्धा राष्ट्रवादी म्हणून भारताच्या बाजूने उभी राहिली ती आज भारतात राहावे का नाही अशी शंका घेऊ लागली आहे. हेही दिल्लीतील सत्ताधाऱ्यांच्या चुकीच्या धोरणाचे फळ आहे. लोकशाहीवर विश्वास दाखविणाऱ्या भारताला काश्मिरमध्ये खऱ्याखुऱ्या नि:पक्षपाती निवडणुका कधीही होऊ न देणे योग्य वाटले; आणि त्यामुळे भारताची लोकशाही बेगडी आहे अशी भावना तेथील जनतेत झाली आहे. राज्याला कागदोपत्री स्वायतत्ता असली तरी राज्यातील सत्ताधाऱ्यांना केंद्राच्याच ओंजळीने पाणी प्यावे लागते आणि त्यांनी यास विरोध दर्शविला तर कोणत्या ना कोणत्या मार्गाने त्यांची उचलबांगडी होते, अशी तेथील लोकांची भावना झाली आहे यात तथ्य नाही असे म्हणणे शक्य नाही. तेव्हा भारतातील एकी आणि लोकशाही याला मोठे धोके निर्माण झाले आहेत हे स्पष्ट आहे.

भारत निधर्मी राष्ट्र आहे. सर्व धर्मांच्या, वंशांच्या, जातींच्या, भाषांच्या, व्यक्तींना–स्त्री-पुरुष दोघांनाही–भारताचे नागरिक म्हणून समान स्थान आहे. पण क्षुल्लक धार्मिक तंटयाबखेडयांवरून देशाच्या अनेक भागांत अजूनही दंगे होतात, मालमत्तेची नुकसानी होते, प्राणहानी होते आणि अविश्वास वाटत राहतो. भारताच्या लोकशाहीवर्धनात आणि आर्थिक विकासात हाही एक मोठा अडथळा आहे.

## संरचनेतच बदल हवेत

मग ही सर्व परिस्थिती बदलण्यासाठी काय केले पाहिजे ? एक तर भारताच्या लोकशाही राज्याची संरचना भारत हा यू. एस्. एस्. आर्., चीन, किंवा युगोस्लाव्हीया यांसारखा बहुराष्ट्रिक देश आहे हे स्पष्टपणे समजून घेऊन खऱ्याखुऱ्या संघराज्यास आवश्यक असे बदल संविधानात घडवून आणले पाहिजेत. सरकारिया आयोगाने केलेल्या शिफारशींच्याही पुढे जाऊन राज्यशासन खूपसे विकेंद्रित केले पाहिजे. काही घटकराज्येसुद्धा अवाढव्य पसरलेली आहेत त्यांची पुर्नघटना करून साधारण सारखी सर्व घटकराज्ये करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. केंद्र किंवा संघ-राज्य, घटकराज्ये, आणि नगरपालिका अगर जिल्हा परिषदा या तीनही स्तरांना एकूण शासनाची क्षेत्रे आणि त्यासाठी लागणारे अधिकार अशा रीतीने वाटून दिले पाहिजेत की सामान्य नागरिकाचा कारभारातील सहभाग वाढू शकेल. असे केले तरच शासन लोकानुवर्ती होऊ शकेल आणि लोकशाहीच्या वर्धनात आणि आर्थिक विकासात सामान्य नागरिकांचा पुरा सहभाग होऊ शकेल.

या बदलाचाच दुसरा भाग म्हणजे प्रत्येक राज्यातील सर्व कारभार त्या राज्यातील मुख्य प्रादेशिक भाषेत होईल अशी काळजी घेतली पाहिजे. स्वातंत्र्यानंतर ४० वर्षे होऊन गेली तरी अजून भारतातील महत्त्वाची सर्व कार्ये इंग्रजी भाषेतून चालतात. ही केवळ शरमेचीच गोष्ट नव्हे तर यामुळे देशातील जवळ जवळ ९५ टक्के लोकांना आपण महत्त्वाच्या सर्व कामांमधून बाहेर ठेवतो हे विसरता येणार नाही.

जोपर्यंत महत्त्वाचे सर्व काम–मग ते राजकीय, शासकीय, आर्थिक, शास्त्रविषयक अगर तंत्रज्ञानविषयक कोणतेही असो–इंग्रजीतून चालते तोवर या देशातील प्रत्येक नागरिकाला समान संधी आहे असे म्हणणे फोल आहे. इंग्रजीवर प्रभुत्व असणारे अल्पसंख्य विरुद्ध बाकी सर्व, आणि यातील पहिल्या गटाचे प्राबल्य, अशी आजची स्थिती आहे. ही बदलत नाही तोवर सामान्यांना देशातील सत्तेत आपला खराखुरा समभाग नाही अशीच भावना वाटणार हे उघड आहे.

## खरा समाजवाद म्हणजे काय ?

भारताची अर्थव्यवस्था समाजवादी दिशेने नेण्याची घोषणा संसदेने १९५५ मध्ये केली, आणि १९७६ मध्ये तर हे शब्द संविधानातही घालण्यात आले. पण आधी सांगितल्याप्रमाणे कोणताही निकष लावला तर असे म्हणता येत नाही की, १९८९ मध्ये भारत १९५५ पेक्षा समाजवादी रचनेच्या जास्त जवळ आहे. केवळ शासकीय नियंत्रणे आणि काही क्षेत्रांतील सरकारी मालकी वाढली म्हणजे समाजवाद येतो ही कल्पना भ्रामक आहे, हे आजवरचा आपला अनुभव आणि इतरही वेगवेगळ्या देशांचा अनुभव लक्षात घेता आपल्याला समजले पाहिजे. देशांत समाजवाद आणावयाचा म्हणजे उत्पादन-साधनांच्या मालकीमध्ये मूलभूत फरक घडून आला पाहिजे. जी साधने मोठ्या भांडवलावरच अवलंबून असतील त्यांची मालकी आणि नियंत्रण हे कोणत्याही खासगी व्यक्तींच्या, कुटुंबांच्या अगर खासगी गटांच्या हातात असता कामा नये. उलट, ज्या उत्पादन-साधनांमध्ये भांडवल कमी प्रमाणात लागते असे छोटे उद्योगधंदे अगर शेती यांवरील मालकी व्यक्ती अगर कुटुंबे यांजकडे असण्यास हरकत नाही. मुख्य निकष असा की, सर्व नागरिकांचे बहुतांशी उत्पन्न हे श्रमांचा मोबदला म्हणून मिळाले पाहिजे. उत्पादन-साधनांच्या मालकीमुळे, इतर कामकऱ्यांचे शोषण करून मिळवलेले असे, ते असता कामा नये. याचा उघडच असा परिणाम म्हणून संपत्ती व उत्पन्नांतील विषमता खूपशी कमी झाली पाहिजे. नवीन नवीन शिक्षणास आणि जास्त चांगले काम करण्यास उत्तेजन म्हणून जितकी विषमता आवश्यक, तितकीच राहिली पाहिजे. शिवाय प्रत्येक क्षेत्रातील कामकऱ्यास तो ज्या उत्पादन-संघटनेत काम करतो त्याच्या व्यवस्थापनात काहीसा भाग घेता आला पाहिजे. एवढेच नव्हे तर त्याच्यात तसे गुण असतील तर त्या संघटनेतील वरिष्ठ स्थान मिळविण्याची संधी त्याला खरीखुरी असली पाहिजे. ही खऱ्या समाजवादाचीलक्षणे आहेत.

नियोजन ही आपण आपला आर्थिक व सामाजिक विकास घडवून आणण्यासाठी योग्य प्रक्रिया म्हणून स्वातंत्र्यपूर्व काळापासूनच मान्य केली होती. पण नियोजित अर्थव्यवस्थेचा व्यवहार व्यवस्थित चालावा म्हणून आपण शासनाकडे नियंत्रणाचे अधिकार फार मोठ्या प्रमाणावर देऊन ठेवले. यामध्ये सत्तेवर असणाऱ्या, राजकारणी आणि नोकरशाहीतील व्यक्ती यांच्या हातात फार सत्ता केंद्रित झाली, आणि त्यामुळे दिरंगाई आणि भ्रष्टाचार या दोन्हींची वाढ होऊन अर्थव्यवस्थेच्या विकासास आणि व्यवहारात मोठ्या अडचणी निर्माण झाल्या. हा अनुभव लक्षात घेऊन आता नियोजित व्यवस्थेत स्वेच्छाधीन (discretionary) नियंत्रणे कमी करणे, आणि नियोजन हे मुख्यतः मार्गदर्शक (indicative) स्वरूपाचे करणे यावर भर दिला पाहिजे. समाजामधल्या वेगवेगळ्या घटकांमध्ये संपत्ती आणि उत्पन्न यांतील आजची अवाजवी विषमता कमी झाली म्हणजे बाजारपेठ, त्यातील मागणी–पुरवठा आणि त्यावर आधारलेले किंमतमान यांचा वापर करणे चांगल्या कार्यक्षम अर्थव्यवहारास उपयोगी राहील. नियोजनास याचे वावडे असता कामा नये, हे ओळखणे जरूर आहे. विकेंद्रीकरणाचा एक भाग म्हणूनच शासकीय मालकीचे उद्योगधंदे कार्यक्षम होण्याच्या दृष्टीने त्यांच्या व्यवस्थापनाकडे पुरेसे अधिकार सोपविणे आणि त्यांच्या कार्यक्षमतेबरहुकूम त्यांना उत्तेजन देणे हे ओघानेच येईल. आधी सांगितल्याप्रमाणे अजून काही दशके तरी भारतात भांडवलाची टंचाई आणि श्रमशक्तीचे वैपुल्य अशी स्थिती राहणार. तेव्हा ही जोडगोळी लक्षात घेऊन इतरत्र वाढलेली उत्पादनतंत्रे आपल्या परिस्थितीस सुयोग्य अशी करून घेणे, त्यांत आवश्यक ते बदल घडवून आणणे अगर नवीन तंत्रज्ञान वाढविणे, याची जरुरी पडेल. याच धोरणाचे एक अंग म्हणून, विशेषतः आपला देश खंडप्राय असल्यामुळे, आत्मनिर्भरतेवर भर द्यावा लागेल. परकीय भांडवल आणि तंत्रज्ञान अगदी काटेकोरपणे जेवढे आणि जितके आवश्यक तितकेच येऊ देण्याची काळजी घ्यावी लागेल.

भारताचा आर्थिक विकास व्हावयाचा तर लोकसंख्येची वाढ ज्या झपाट्याने होते आहे, तीस काहीतरी प्रतिबंध घातला पाहिजे, हे उघड आहे. पण लोकसंख्या






नियंत्रणाची साधने ही व्यक्तींच्या खासगी जीवनाशी फार निगडित असल्यामुळे या बाबतीत पावले टाकताना विशेष काळजी घेतली पाहिजे. सर्व जगातील याबाबतचे अभ्यास असे दर्शवितात की कोणत्याही देशात जशा शिक्षण आणि आरोग्य यांच्या सोई वाढतात, स्त्रियांना त्यांचे अधिकार आणि स्वातंत्र्य मिळते, आणि सामान्यांचे जीवनमान उंचावते, तेव्हा आपोआपच कुटुंबातील मुलांची संख्या कमी राखण्याकडे प्रवृत्ती होते. समाजवादी उद्दिष्टे आणि पद्धती लौकर अमलात आणून, विषमता कमी करून, सामान्यांचे जीवनमान वाढविण्याची व त्यांना मूलभूत सुविधा लौकर उपलब्ध करण्याची आवश्यकता या दृष्टिकोणातूनही मोठी आहे.

## नेतृत्व कोणत्या वर्गाचे ?

आजवरची धोरणे अशा तऱ्हेने मूलभूत रीत्या बदलणे आणि एक नवीनच संरचना बनविण्याच्या दृष्टीने झपाट्याने प्रगती करणे यासाठी नवीनच नेतृत्व निर्माण झाले पाहिजे. आज देशात जे पक्ष, उपपक्ष अस्तित्वात आहेत त्यांची कोणाची अशी ताकद नाही, हे स्पष्ट आहे. लोकशाही टिकून राहणे हे मात्र कोणते बदल घडून आले पाहिजेत याबद्दल विचारमंथन होत राहण्याला आणि मग त्यासाठी आवश्यक त्या संघटना निर्माण होण्याला आवश्यक आहे. ज्या वर्गांना अगर गटांना आजवर जे धोरण भारताच्या शासनसंस्थेने अमलात आणले त्यामुळे फायदाच झाला, ते वर्ग अगर गट अशा मूलभूत बदलांना आणि ते बदल मागणाऱ्या पक्षांना अगर संघटनांना फारसे उचलून धरणार नाहीत हे उघड आहे. असे मूलभूत बदल ज्या बहुसंख्याकांना फायद्याचे ठरतील, जे लोकगट आज शोषित आहेत, दारिद्र्याने पीडलेले आहेत, बेकारीने खचून जात आहेत त्यांच्या हिताच्या दृष्टीनेच हे मूलभूत फरक घडवून आणले पाहिजेत. भारतातला जो खराखुरा श्रमजीवी वर्ग आहे, ज्याच्याजवळ स्वत.च्या श्रमाशिवाय उत्पादनाचे साधन जवळ जवळ नाही, त्याला संघटित करणे महत्त्वाचे आहे. भारताची जातिविषयक विभागणी लक्षात घेता या श्रमजीवी वर्गात प्रामुख्याने पूर्वास्पृश्य, वन्य जाती, भटक्या जमाती आणि इतर मागासलेल्या जाती की ज्यांना आजच्या आर्थिक व सामाजिक रचनेत मानाचे स्थान नाही त्यांचा अंतर्भाव केला पाहिजे. उद्योगधंद्यांमध्ये काम करणारे, अगर बँका, विमा कंपन्या, अशा मोठ्या सेवा मंडळांत काम करणारे यांचा जो आजचा वर्ग आहे तो भारतातील वरच्या उत्पन्नाच्या ५–७ टक्क्यांत मोडतो. त्यामुळे या वर्गाला आजतरी संरचनेत मूलभूत बदल घडवून आणण्यात रस नाही. महागाईचे, बेकारीचे वगैरे चटके त्यांना बसतात, तेव्हा ते लढे देतात आणि समाजवादाच्या घोषणा करतात. पण आज तरी स्थिती अशी दिसते की, खरीखुरी समाजवादी संरचना या देशात येण्यात त्यांना रस नाही. देशातला सत्ताधारी वर्ग उत्पादनातील आधिक्याचा (surplus) काहीसा वाटा या गटांना देऊन त्यांना खूष ठेवतो. शिक्षित मध्यम वर्गातील बहुसंख्यही अशाच गटात मोडतात.

## नवीन विचार हवा

तेव्हा दूरदृष्टीने विचार करून भारतीय संविधानात सांगितल्याप्रमाणे समाजवाद, निधार्मिकता आणि लोकशाही यांवर आधारलेली संरचना येथे निर्माण करावयाची तर त्यासाठी कोणत्या मार्गाने गेले पाहिजे, कशा तऱ्हेची संरचना भारताला योग्य ठरेल, याचा पुरा मूलभूत विचार पुन्हा होणे आवश्यक आहे. ब्रिटिश अंमलाचा, आणि त्यानंतरही इंग्रजी भाषेवरल्या अवलंबनाचा आणि विशेषतः आधुनिक ज्ञान हे केवळ पाठांतर व पंडितगिरी या मार्गाने मिळविले जात असल्याचा, एक परिणाम असा झाला आहे की, आम्हाला सर्वांनाच केवळ दुसरीकडून आलेल्या विचारांची फैलावण करण्याची सवय झाली आहे. परक्या देशात विकास झालेले ज्ञान मग ते कोणत्याही क्षेत्रात असेल, ते खरेखुरे आत्मसात केल्याची खूणगाठ अशी की ते ज्ञान येथील भूमीत, इथल्या परंपरांत, इथल्या परिस्थितीत कशा तऱ्हेने लागू पडते याचा विचार झाला पाहिजे. जसे चीनमध्ये माव्त्सेतुंगने मार्क्सिस्ट तत्त्वज्ञानाशी चिनी विचारपद्धतीची जोड घालणे आवश्यक मानले तसे आमच्याकडच्या मार्क्सिस्टांनीच काय पण इतरही कोणी फारसे केलेले नाही. आणि त्यामुळेच आज रशियातच त्यांनी ज्या तऱ्हेने बदल घडवून आणले त्याबद्दल संदेह निर्माण होऊन आमच्याकडचे मार्क्सिस्ट विचाराचे तज्ञ गोंधळून गेलेले दिसतात. इतर अनेक क्षेत्रांत आपली परंपरा अशीच परभृत ज्ञानाची झाली आहे. यात बदल होऊन सर्व जगातल्या विचारधारा शिकून पण मग त्या या भूमीत कशा वापरता येतील, इथल्या ज्ञानपरंपरांशी त्यांची जोड कशी होऊ शकेल, याचा विचार करणारे विचारवंत पुढे यावयास हवेत. आणि असे विचार पुढे येतानाच त्यावर आधारून, खऱ्याखुऱ्या शोषित वर्गाच्या संघटना बांधल्या गेल्या पाहिजेत. यातूनच








संरचनेत मूलभूत बदल घडवून आणणे आणि समाजवादी, निधार्मिक आणि लोकशाही पायावर नवीन भारत निर्माण करणे शक्य होईल.

## विचारवंतांची जबाबदारी

हे काम कोण करणार ? कोणत्याही समाजात हे काम सुशिक्षित विचारवंतांचे असते. पण भारतात जे असे गट आहेत त्यांनी स्वातंत्र्योत्तर काळात केवळ स्वतःचे व स्वतःच्या कुटुंबाचे हित पाहावे, अशी वृत्ती स्वीकारली आहे. या बाबतीत देशाच्या पारतंत्र्याच्या काळात ज्या अनेक व्यक्तींनी आणि गटांनी देशाच्या भवितव्याची काळजी वाहिली, त्यांचे उदाहरण लक्षात ठेवावयास हवे. लोकमान्य टिळकांनी, चिपळूणकर आणि आगरकर यांच्या सहकार्याने, जेव्हा राष्ट्रिय वृत्तीचे शिक्षण देण्यासाठी संस्था काढली तेव्हा त्यांनी युरोपातील जेसुइटांचे उदाहरण डोळ्यापुढे ठेवले होते. नजीकच्या काळात त्यांच्या प्रयत्नातून स्वातंत्र्य मिळू शकेल अशी आशा त्यांना वाटण्यासारखी मुळीच परिस्थिती नव्हती. तरीसुद्धा ज्या देशाने आपणांस वाढविले, शिकविले त्याचे आपण देणे लागतो, अशी त्यांची भावना होती. स्वातंत्र्योत्तर काळातही काही स्वयंसेवी संघटना आणि काही पक्ष संघटना अशा आहेत की ज्यांमध्ये शिस्तबद्ध राहून समाजाच्या उन्नतीसाठी कार्य करणे हे महत्त्वाचे मानले जाते. अर्थात आज ज्या काही थोड्या संघटना किंवा पक्ष अशी शिस्त पाळणारे आहेत, त्यांच्यात प्रमुख दोष हा दिसतो की, स्वतंत्र प्रज्ञा वापरून देशाच्या प्रगतीस योग्य अशा कल्पना आणि तत्त्वज्ञान वाढविणे आणि फैलावणे त्यांना शक्य झालेले नाही. त्यांतल्या काही मंडळींचे विचार आणि कल्पना अशास्त्रीय, आणि जुन्यापुराण्या, संकुचित वृत्तीच्या, धर्मवादावर अवलंबून असलेल्या अशा आहेत, आणि काही मार्क्स, लेनीन, स्टॅलीन, अगर माओ यांच्या विचारांची हुबेहूब नक्कल करणाऱ्या आहेत. अशामुळेच या गटांचे महत्त्व आणि सामर्थ्य अनेकांनी अनेक वर्षे मोठा स्वार्थत्याग करूनही विशेष वाढलेले नाही. वर म्हटल्याप्रमाणे या देशाला आवश्यक असे तत्त्वज्ञान व विचार वाढविण्याची आणि त्या पायावर शोषितांच्या संघटना वाढविण्याची जरुरी आहे आणि हे काम अखेर विचारवंतांनाच करावे लागेल. हे काम त्यांनी अंगीकारल्याशिवाय देशाच्या उन्नतीला सुरवात होणार नाही.

या आठवड्यात फ्रेंच राज्यक्रांतीचा २०० वा वाढदिवस साजरा होत आहे. या राज्यक्रांतीचे चांगले, वाईट, अनेक परिणाम अभ्यासले गेले. पण त्या क्रांतीच्या इतिहासावरून जर एक गोष्ट स्पष्ट होत असेल तर ती ही की, एखाद्या देशातील सत्ताधारी वर्ग क्रूर आणि अप्पलपोटा असा वर्षानुवर्षे वागत राहिला तर केव्हातरी सामान्यजन उफाळून उठतात आणि त्या संरचनेला उखडून टाकतात. १७९० ते ९४ या काळात झालेले प्रचंड हत्याकांड हे दाखवून देते की, अशा लोकक्षोभानंतर ताबडतोब लोकांचे अगर लोकहितकारी शासनच पुढे येते, असे नाही. रशियन राज्यक्रांतीनंतर काही वर्षांनी स्टॅलिनची झोटिंगशाही सुरू झाली आणि त्यातून बाहेर पडून योग्य संरचनेकडे जाण्याचा प्रयत्न आताकुठे रशियात व्यवस्थित चालू झाला आहे. क्रांती आणि प्रतिक्रांती अशा घटनांमधून मोठे ऐतिहासिक बदल घडून येत असतात हे खरे ; पण त्यात हजारो किंवा लाखो जनसामान्यांना हाल सोसावे लागतात. हे टाळावयाचे असेल तर सत्ताधाऱ्यांनी इंग्लंड अगर काही स्कॅन्डीनेव्हीयन देशांप्रमाणे लोकशाही पद्धती खरीखुरी चालू ठेवून शोषितांच्या दृष्टीने आवश्यक त्या बदलास वाव दिला पाहिजे. आपले आजचे शासन—नेते इतपत शहाणपणा दाखवितात की नाही ते भविष्यकाळच ठरवेल.

पण असे घडवून आणण्यासाठी आवश्यकता असते ती ही की, समाजातील काही थोड्यातरी व्यक्तींनी आपला स्वार्थ बाजूस ठेवून देशोन्नतीच्या कामास वाहून घेतले पाहिजे. लोकमान्य टिळकांनी आगरकरांवरील आपल्या मृत्युलेखात जे म्हटले होते ते या दृष्टीने फार उद्‌बोधक आहे. लोकमान्यांनी लिहिले होते : "कोणत्याही राष्ट्रात आपल्या विद्येचा, अकलेचा, हुशारीचा आणि कर्तबगारीचा म्हातारपणी नव्हे तर भर उमेदीत लोकोपयोगी कामाकडे इमानाने व नेकीने उपयोग करणारे शेकडा नाही तरी हजारी तरी काही गृहस्थ निघत नाहीत ते राष्ट्र जिवंत असून मेल्यासारखे आहे." ही शिकवण आपणांस आताच्या काळात महत्त्वाची आहे.










# संघटनात्मक संघर्ष : एक व्यवस्थापनशास्त्रीय मीमांसा

ज. सु. चौधरी

कोणत्याही संस्थेत अगर संघटनेत काम करणाऱ्या व्यक्तींमध्ये एक निश्चित रचनात्मक संबंध असतो. त्यांचे उद्दिष्ट समान असते व सर्वांनी एकत्रितपणे परस्परसहकार्याने उद्दिष्ट साध्य करण्यासाठी काम करावयाचे असते. संघटना यशस्वी होण्यासाठी व्यक्तींची उद्दिष्टे आणि संस्थेची उद्दिष्टे यांत संपूर्ण एकरूपता असणे आवश्यक असते. संपूर्ण एकरूपता असल्यामुळे मतभेदांना अशा संघटनेत फारसा वाव नसतो. परंतु वस्तुस्थिती मात्र वेगळी असते. अनेकदा अनेक कारणांमुळे संघटनेत काम करणाऱ्या व्यक्तींमध्ये मतभेद व संघर्ष निर्माण होतात व संघटनेत तणावपूर्ण असे वातावरण असल्याचे जाणवते.

वर्तनवादी शास्त्रज्ञांच्या मते संघर्ष हा संघटनात्मक संबंधांचा एक महत्त्वाचा भाग असून तो संघटनेच्या जिवंतपणाचे लक्षण आहे. सुप्रसिद्ध व्यवस्थापन शास्त्रज्ञ मार्च व सायमन यांच्या मते जेव्हा निर्णय घेण्याच्या प्रक्रियेमध्ये सर्वोत्तम पर्याय निवडताना व्यक्तींमध्ये मतभेद होतात तेव्हा संघटनेत मतभेदाची बीजे पेरली जातात. तर श्री. रॉबीन्स यांच्या मते 'संघर्ष ही एक प्रक्रिया असून तीत एखादी व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीला अगर व्यक्तींना त्यांची उद्दिष्टे साध्य करीत असताना हेतुपूर्वक अडविण्याचा किंवा रोखण्याचा प्रयत्न करीत असते.' संघटनेचे घटक असलेल्या व्यक्तींनी संघटनेशी संबंधित कारणामुळे एकमेकांच्या विरोधात भूमिका घेऊन दुसऱ्यांच्या उद्दिष्टांना विफल करण्यासाठी जाणून-बुजून प्रयत्न करण्याची प्रक्रिया म्हणजेच संघटनात्मक संघर्ष होय. असा संघर्ष व्यवस्थापन व कर्मचारी, वरिष्ठ व कनिष्ठ किंवा कर्मचाऱ्यांत निर्माण होऊ शकतो.

संघटनात्मक संघर्ष ही संकल्पना व्यवस्थापन शास्त्रज्ञांनी तपासली असून त्याबाबत त्यांनी आपली निश्चित मते व्यक्त केलेली आहेत. प्रामुख्याने या संदर्भात दोन विचारप्रवाह दिसून येतात. सनातनी शास्त्रज्ञांच्या मते संघटनेत संघर्ष निर्माण होणे ही एक भयावह घटना असून तिचे अत्यंत विपरीत असे परिणाम संघटनेवर होऊ शकतात. संघटनेत बेशिस्त निर्माण करणारी, कामकाजात अडथळे आणणारी व अनेक नकारात्मक व विघातक परिणामांना जन्म देणारी अशी ही प्रक्रिया असल्यामुळे व्यवस्थापनाने ती टाळण्याचा किंवा प्रसंगी ती दडपून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. संघर्षाच्या मुळावरच घाव घालून पुन्हा कोणत्याही परिस्थितीत संघर्ष निर्माण होणार नाही याची दक्षता घेतली पाहिजे. हुकुमशाही किंवा एकतांत्रिक व्यवस्थापनशैलीने संघटना चालवणाऱ्या व्यवस्थापनाची याहून भिन्न मते असणे शक्य नाही. कारण अशा व्यवस्थापकांना आपल्या बुद्धिसामर्थ्यावर व प्रशासनकौशल्यावर अवास्तव विश्वास असतो व संघटनेवर परिपूर्ण नियंत्रण ठेवण्याची जबर इच्छा व महत्त्वाकांक्षा असते, तर आपल्या कनिष्ठांच्या क्षमतेबाबत अनास्था व कर्मचारी संघटनांबद्दल तिरस्काराची भावना असते.

आधुनिक व्यवस्थापन शास्त्रज्ञांना हा दृष्टिकोण मान्य नसून त्यांच्या मते संघर्ष हा संघटनात्मक संबंधांचा अपरिहार्य परिणाम असून त्याला भिण्याचे कारण नाही. संघटनेमध्ये अनेक कारणांमुळे तणाव निर्माण होणे शक्य असते व त्याची परिणती संघर्षात होणे स्वाभाविक असते. संघटनात्मक बदल घडून येत असताना असा संघर्ष अंतर्भूत असतो व तो अनेकदा संघटनेच्या दृष्टीने हितकारक ठरू शकतो. मतभिन्नतेचा किंवा संघर्षाचा अभाव हे मृतवत् संघटनेचे लक्षण मानावे लागेल. सूज्ञ व्यवस्थापनाने अशा संघर्षाचे स्वागत केले पाहिजे व त्याला योग्य वळण देऊन निर्णयप्रक्रियेत त्याचा उपयोग करून घेतला पाहिजे.

संघटनात्मक संघर्ष विधायक व विघातक अशा दोन स्वरूपांचा असू शकतो. संघटनेत निर्माण होणाऱ्या संघर्षामुळे जेव्हा संघटनेची कार्यप्रवणता, गतिशीलता व परिणामकारकता वाढते व व्यक्ती अधिक जोमाने काम करण्यासाठी सिद्ध होतात आणि संघटनेची









उद्दिष्टे साध्य होण्यासाठी अनुकूल परिस्थिती निर्माण होते तेव्हा त्या संघर्षाला विधायक किंवा रचनात्मक संघर्ष असे म्हणता येते. अशा संघर्षामुळे संघटनेला निश्चित स्वरूपाचे फायदे होऊ शकतात. अशा संघर्षामुळे अनेक प्रश्नांकडे व्यवस्थापनाचे लक्ष वेधले जाते व संघटनेचे होणारे संभाव्य नुकसान टाळण्यास मदत होते. मतभिन्नता किंवा संघर्ष नसेल तर व्यवस्थापन एकतांत्रिक पद्धतीने बहुतेक निर्णय घेते व असे निर्णय अनेकदा चुकीच्या गृहीतावर अवलंबून असल्याने ते परिणामकारक व उपयुक्त ठरत नाहीत. संघर्षामुळे विशिष्ट प्रश्नाच्या सर्व बाजू तपासून घेतल्या जातात व प्रश्न सोडविण्यासाठी सर्वोत्तम पर्याय शोधण्याचा प्रयत्न होतो. एखाद्या बाबीवर पुन्हा पुन्हा विचार केला जातो व निर्णयाचे पुनरावलोकन करण्याची संधी प्राप्त होते. संघर्षामुळे संघटना गतिमान होते व संभाव्य अडचणीवर मात करण्यास तत्पर राहते. व्यवस्थापनापुढे काही आव्हाने निर्माण होतात व ती स्वीकारण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करणे क्रमप्राप्त ठरते. काही व्यवस्थापकांना तर अशी आव्हाने स्वीकारण्यातच समाधान लाभत असते. संघटनात्मक संघर्षामुळे काही नावीन्यपूर्ण असे निर्णय घेतले जाऊन संघटनेचा विकास जलद गतीने होण्यास मदत होते. भिन्न विभागांत काम करणाऱ्या व्यक्तींत किंवा त्यांच्या समूहामध्ये ऐक्य निर्माण होण्यास अनेकदा असा संघर्ष कारणीभूत ठरतो. व्यक्तींना आपले मतभेद मनमोकळेपणाने व्यक्त करता येत असल्याने एकमेकांबद्दलची द्वेषभावना कमी होऊन संघटनेतील तणाव मोठ्या प्रमाणावर कमी होऊ शकतो.

याउलट, संघटनात्मक संघर्षामुळे जेव्हा संघटनेची कार्यक्षमता व परिणामकारकता लक्षणीय रीत्या घटते तेव्हा त्यास विघातक संघर्ष असे म्हणणे क्रमप्राप्त ठरते. अशा संघर्षामुळे कोणत्याही प्रश्नाची उकल न होता एकमेकांबद्दलची द्वेषाची व असहकाराची भावना वाढते. संस्थेच्या उद्दिष्टांकडे दुर्लक्ष होऊन गौण अशा प्रश्नांचे महत्त्व वाढते व संघटनेचे प्रचंड नुकसान होते. कर्मचाऱ्यांत अविश्वासाचे व संशयाचे वातावरण निर्माण होऊन बेशिस्त वाढते, त्यांचे नीतिधैर्य कमी होते व ऐक्याची भावना संपुष्टात येते. अशा परिस्थितीत अत्यंत कार्यक्षम व पात्र व्यक्ती संघटनेला रामराम ठोकतात. संपूर्ण संघटना खिळखिळी होऊन उत्पादन घटते, उत्पादनाचा खर्च वाढतो व या सर्वांचा परिणाम म्हणून संघटनेचे अस्तित्वही धोक्यात येते.

### संघर्षप्रक्रिया

सुरुवातीला संघटनेत काही प्रश्नासंबंधी किंवा निर्णयासंबंधी मतभेद होतात. विशिष्ट कल्पना किंवा निर्णय संबंधित व्यक्तींना जेव्हा स्वीकारार्ह वाटत नाही तेव्हा त्याची प्रतिक्रिया म्हणून निर्णय घेणारांना ते रुचत नाही व त्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलतो. असे पुन्हा पुन्हा होऊ लागले तर ते व्यवस्थापनाला तिरस्करणीय वाटते व शक्य झाल्यास त्याला आव्हान देण्याचा प्रयत्न होतो. तावडतोब बंदोबस्त न केल्यास त्याचे पर्यवसान खुल्या संघर्षात होते. अनेकदा संघर्षाला खतपाणी मिळेल अशी परिस्थिती निर्माण होते व संबंधितांना संघर्षाची चाहूल लागते, ते मतभेद व्यक्त करू लागतात व त्याबद्दल उघड चर्चा सुरू होते. संघटनेत सुसंवाद नसेल तर गैरसमज निर्माण होण्यास वेळ लागत नाही व त्याचे पर्यवसान संघर्षात होते. संघर्ष करणारे दोन्ही पक्ष एकमेकाला सामोरे जाण्यासाठी आपली भूमिका निश्चित करतात. काहीही तडजोड न झाल्यास एखाद्या पक्षाला बचावात्मक भूमिका घेणे भाग पडते. अशी बचावात्मक भूमिका घेतलेला किंवा हार पत्करलेला पक्ष नंतर होणाऱ्या हल्ल्याला सामोरे जाण्यासाठी सज्ज होण्याच्या प्रयत्नाला लागतो. व्यवस्थापन व कर्मचारी यांच्यात परस्परसहकार्य, आदर व समजूतदारपणा असेल तर अशा संघर्षामधून मार्ग काढणे शक्य होते. अन्यथा असा संघर्ष टोकाला व अत्यंत हीन अशा पातळीवर जाऊन पोचतो. त्यामुळे केवळ संघटनेचेच नुकसान होते असे नव्हे तर संघटनेच्या जनमानसातील प्रतिमेला तडे जातात.

संघटनात्मक संघर्ष पुढील तीन कारणांमुळे निर्माण होतो. एक तर निर्णय घेताना जो पर्याय निवडला जातो तो सर्व संबंधितांना स्वीकारार्ह वाटत नाही. दुसरे असे की जो पर्याय निवडला जातो त्याच्या परिणामाबद्दल एक प्रकारची अनिश्चितता असते व तिसरे म्हणजे असे पर्याय एका वेळी उपलब्ध न झाल्यामुळे किंवा ते क्रमाने उपलब्ध होत असल्याने त्यांचे तुलनात्मक दृष्टीने मूल्यमापन करणे कठीण जाते. या तीनपैकी कोणत्याही परिस्थितीत व्यक्तीचा स्वतःशी किंवा इतरांशी संघर्ष संभवतो.

संघटनात्मक संघर्ष व्यक्तिगत विशिष्ट समूहाच्या किंवा संघटनेच्या पातळीवर निर्माण झालेला दिसून

अनुक्रमणिका

येतो. जेव्हा एखादी व्यक्ती संघटनेत प्रवेश करते तेव्हा तिच्या आर्थिक तसेच मानसशास्त्रीय गरजा असतात. या गरजा भागविण्याचा प्रयत्न करीत असतानाच संघटनेची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी तिला काम करावे लागते. संघटनेत प्रवेश करताना त्या व्यक्तीची विशिष्ट वैचारिक बैठक असू शकते व काही आदर्श अशा जीवनमूल्यांना प्राधान्य देण्याची तिची तयारी असते. परंतु जेव्हा व्यक्ती संघटनेत प्रत्यक्ष कामाला सुरुवात करते तेव्हा तिला संघटनेतील आपल्या वर्तनामध्ये काही अपरिहार्य बदल करणे भाग पडते. व्यक्तिगत व सतत बदलणाऱ्या गरजा भागवीत असताना दुसऱ्या बाजूला संघटनात्मक संबंधांच्या व संघटनेतील अटी व शर्ती यांच्या जाळ्यात व्यक्ती अडकते. स्वतःच्या आशाआकांक्षा, कल्पना व उद्दिष्टे यांचा मेळ संघटनेच्या उद्दिष्टांशी घालणे हळूहळू जड जाऊ लागते. उदा., संघटनेत समन्वय राखण्यासाठी व्यक्तीला आपल्या व्यक्तिगत स्वातंत्र्याला मुरड घालावी लागते. अशा रीतीने व्यक्तिगत उद्दिष्टे व संघटनेची उद्दिष्टे यांमधील एकरूपता कमी होऊ लागल्यास व्यक्तिगत पातळीवरील संघर्षाला प्रारंभ होतो. व्यक्तीची ध्येये व प्रत्यक्ष प्राप्ती यांच्यात फारकत झाल्याने व्यक्ती असमाधानी होऊन असा संघर्ष संभवतो. कित्येकदा व्यक्ती-व्यक्तींमध्ये निर्माण होणारा संघर्ष हा व्यक्तिगत पातळीवरील संघर्षाचा परिणाम असू शकतो.

कोणत्याही संघटनेत औपचारिक व अनौपचारिक असे कर्मचाऱ्यांचे विविध गट किंवा समूह असतात. व्यक्ती वेगवेगळ्या कारणांसाठी विविध व्यक्तिसमूहांची सभासद होत असते. अशा एकाच व्यक्तिसमूहातील सभासदांत अनेकदा संघर्ष निर्माण होणे शक्य असते. विशेषतः जेव्हा व्यक्तींच्या समूहाला नवीन अशा समस्येला सामोरे जावयाचे असते व बदलत्या परिस्थितीमुळे नवीन मूल्ये व्यक्तींवर लादली जातात किंवा व्यक्तींचे समूहाबाहेरील वर्तन व महत्त्व आणि समूहातील वर्तन व महत्त्व यांच्यात फारकत होते तेव्हा व्यक्तिसमूहात संघर्ष उद्भवतो. अशा संघर्षामुळे एका समूहाचे अनेक छोटे गट पडणे शक्य असते. सामूहिक पद्धतीने निर्णय घेण्याची गरज व उद्दिष्टांची भिन्नता व एखादा प्रश्न समजावून घेण्यातील फरक या तीन कारणांमुळे विविध व्यक्तिसमूहांत संघर्ष संभवतो.

संघटनेच्या पातळीवरील संघर्ष संघटनांतर्गत व विविध संघटनांतर्गत अशा दोन प्रकारचा असू शकतो. एकाच संघटनेतील कर्मचाऱ्यांत, विविध विभागांत किंवा समूहांत निर्माण होणारा संघर्ष हा संघटनांतर्गत संघर्ष असून तो वरिष्ठ व कनिष्ठ यांचे संबंध, कार्यात्मक मतभिन्नता, व्यवस्थापन व कर्मचारी यांच्यातील मतभेद या स्वरूपांत व्यक्त होत असतो. विविध संघटनांमध्ये निर्माण होणाऱ्या संघर्षाला सभोवतालची परिस्थिती, बाह्य घटकांचा दबाव व व्यवस्थापनाचे धोरण कारणीभूत होतात.

## संघर्षाचे व्यवस्थापन : एक आव्हान !

वरील विवेचनावरून हे लक्षात येईल की संघटनात्मक संघर्ष आधुनिक व लोकशाहीप्रधान संस्थांमध्ये अपरिहार्य असून त्याचे कार्यक्षम व्यवस्थापन करणे आवश्यक आहे. जेव्हा संघर्ष संघटनांतर्गत असतो तेव्हा तो हाताळण्याची जबाबदारी संघटनेच्या प्रमुखाची असते. संघर्ष टोकाला गेल्यानंतर हाताळण्यापेक्षा तो निर्माण होताच हाताळणे सोपे असते. सुरुवातीच्या काळात योग्य दिशेने केलेल्या अत्यल्प प्रयत्नांनी असा संघर्ष मिटू शकतो. संघर्ष निर्माण झाल्यानंतर कोणती भूमिका घ्यावयाची व विशिष्ट परिस्थितीत संघर्ष कसा हाताळावयाचा हे त्या संघर्षाच्या स्वरूपावर व व्यवस्थापनाच्या कौशल्यावर अवलंबून असते.

सुरुवातीला असा संघर्ष कशाबद्दल आहे, तो निर्माण होण्याची कारणे कोणती आणि तो किती मर्यादेपर्यंत ताणला गेलेला आहे याचा शोध घेणे आवश्यक आहे. संघटनेची उद्दिष्टे, कार्यपद्धती, व्यवसायमूल्ये यांबाबत मतभेद व परस्परविश्वासाचा अभाव या गोष्टी बहुतेक संघर्षांच्या मुळाशी असल्याचे दिसेल. व्यक्तिमत्त्वांतील फरक व पार्श्वभूमी, तसेच आकलनशक्ती, जीवनमूल्ये आणि जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण यांबाबत मतभेद झाल्याने व्यक्तिगत पातळीवर संघर्षाला प्रारंभ होतो.

विशिष्ट प्रकारचा संघर्ष हाताळण्यासाठी एकमेव व योग्य अशी पद्धत सांगणे कठीण आहे. जेव्हा व्यवस्थापनाला संघर्ष मिटविण्यात अपयश येते तेव्हा चुकीची पद्धत वापरल्यामुळे असे झाले असे बोलले जाते. व्यवस्थापनाला त्यासाठी दोष देणे जेवढे सोपे आहे तेवढे विशिष्ट परिस्थितीत संघर्ष हाताळण्यासाठी अगदी तयार असा फॉर्म्युला सुचवणे सोपे नाही. असे

असते तर सर्व संघटनात्मक संघर्ष चुटकीरशी मिटवता आले नसते काय ? परिणामी प्रत्येक व्यवस्थापकाला त्यासाठी आपली भूमिका व कार्यपद्धती निश्चित करणे क्रमप्राप्त असते.

कोणतीही कार्यपद्धती निर्दोष असणे शक्य नाही. तरीही व्यवस्थापनाला मार्गदर्शन होईल अशा संघर्ष हाताळण्याच्या पद्धती सुचविणे शक्य आहे. एक तर असा संघर्ष अगदी किरकोळ स्वरूपाचा असेल तर त्याकडे दुर्लक्ष करणे उत्तम. विशेषतः कर्मचाऱ्यांचा आपल्या व्यवस्थापकावर संपूर्ण विश्वास असतो व कर्मचारी ठरावीक मर्यादेबाहेर जाण्याची शक्यता नसते तेव्हा संघर्ष अस्तित्वातच नाही असे मानणे सोईचे असते. राजकीय व धार्मिक संघटनांमध्ये शुल्लक स्वरूपातील मतभेदांकडे दुर्लक्ष करणेच पसंत केले जाते.

संघर्ष हाताळण्याची दुसरी पद्धत म्हणजे संघटनेत संघर्ष निर्माण होऊ न देणे. मतभेद व्यक्त करणारा संघटनेचा शत्रू मानून त्याला शिक्षा करणे व व्यवस्थापनाशी एकनिष्ठ असलेल्याला शाबासकी देऊन व त्याचे कौतुक करून संघर्ष टाळण्याचा प्रयत्न केला जातो. येथे जे कर्मचारी उपद्रवी असतात त्यांना चार हात दूर ठेवणे पसंत केले जाते. संघर्षाची चाहूल लागताच संबंधितांना होणाऱ्या गंभीर परिणामांची कल्पना दिली जाते व मतभेद ताबडतोब मिटवावेत असा आदेश देण्यात येतो. किंवा व्यवस्थापक आपल्या वरिष्कठांडे ही बाब सोपवतो. अशा रीतीने संघर्ष दडपून टाकणे व तो दृष्टोत्पत्तीस न येईल याची खबरदारी व्यवस्थापन घेत असते. संघर्ष हाताळण्याची ही पद्धत धोकादायक मानावी लागेल. होणाऱ्या अन्यायाला वाचा फोडता येत नसेल व कर्मचाऱ्यांच्या भावना दडपून टाकल्या जात असतील तर त्यामुळे संघटनेच्या कामकाजावर विपरीत परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही.

जेव्हा संघर्ष करणारांची भूमिका लवचीक असते तेव्हा व्यवस्थापन मध्यस्थाची भूमिका घेऊन संघर्ष मिटविण्यासाठी प्रयत्न करू शकते. या पद्धतीत व्यवस्थापन संघर्ष करणाऱ्यांना एकत्र आणून त्यांच्यात तडजोड घडवून आणण्याचा व त्यांच्यातील मतभेद कमी करण्याचा प्रयत्न करीत असते. अनेकदा संघर्ष करणारे पक्ष स्वतः ही बाब आपल्या वरिष्ठांकडे सोपवतात व वरिष्ठांचा निर्णय स्वीकारून त्या वादावर पडदा टाकतात. परंतु त्यामुळे प्रत्येक किरकोळ मतभेद वरिष्ठाकडे नेण्याची प्रवृत्ती वाढते व परिणामतः व्यवस्थापकाचा महत्त्वाचा वेळ अशा किरकोळ बाबींसाठी खर्च होत राहतो.

जेव्हा संघर्ष करणारे पक्ष अतिशय ताठर व टोकाची भूमिका घेतात व कोणत्याही तडजोडीस तयारी दर्शवीत नाहीत तेव्हा त्यांना त्यांचे सामर्थ्य व कुवत अजमावण्याची संधी व्यवस्थापनाने उपलब्ध करून देणे श्रेयस्कर असते. संघर्ष करीत असताना जेव्हा परस्परताकद दोन्ही पक्षांच्या लक्षात येते तेव्हा ते पक्ष तडजोडीस तयार होण्याची शक्यता असते. अशा वेळी ज्यांची सौदाशक्ती कमी असते ते आपला दुराग्रह बाजूला ठेवून मतभेद मिटविण्याची तयारी दर्शवितात. तथापि हार पत्करलेल्या पक्षाच्या मनात पराभवाची भावना सलत राहते व वरकरणी जरी मतभेद मिटल्याचे दिसले तरी अंतर्गत किंवा छुप्या विरोधाचीभावना तशीच राहते. या पद्धतीत संघर्ष करणारांचा आपल्या व्यवस्थापनावरील विश्वास उडण्याची शक्यता आते व त्याचे संघटनेवर दूरगामी स्वरूपाचे परिणाम संभवतात याचे भान व्यवस्थापनाने ठेवणे आवश्यक आहे.

संघटनात्मक संघर्ष हाताळण्यासाठी वरीलप्रमाणे जरी कोणतीही पद्धत वापरली तरी संघटनेत सर्व स्तरांवर सुसंवाद व परस्परसामंजस्य राहील व संदेशवहनात अडथळे निर्माण होणार नाहीत याकडे लक्ष देणे गरजेचे आहे. अनेकदा अशा परिणामकारक सुसंवादाच्या अभावामुळे संघटनात्मक संघर्ष व दुरावा यांची व्याप्ती वाढत राहते व त्याचे संघटनेवर प्रतिकूल परिणाम होतात. थोडक्यात, संघटनेच्या कार्यपद्धतीत सुधारणा करून ती अधिक कार्यरत करण्याचा प्रयत्न करणे, शक्य झाल्यास अधिक कार्यक्षम यंत्रणा निर्माण करणे आणि संघर्षाची मुळे नष्ट करण्यासाठी संघटनेच्या ढाच्यात मूलगामी स्वरूपाचे बदल करणे हे उपाय संघटनात्मक संघर्षाचे आव्हान पेलण्यासाठी व्यवस्थापनाने योजले पाहिजेत. अशा उपायांच्या परिणामकतेवरच व्यवस्थापनाचे यश अवलंबून राहील असा विश्वास वाटतो.



# राधा-कृष्णावरील नाटके : दोन प्रवाह

अरुण प्रभुणे

राधा-कृष्णाबद्दल अगदी पूर्वीपासून तो आजतागायत भारतीय समाजमनात गाढ आकर्षण आहे. भारतीयांच्या आदराचा व श्रद्धेचा तो विषय राहात आला आहे. म्हणूनच तर आजवर अनेक ललितकलांत व कथा-कीर्तनांत त्यांना स्थान मिळत आले आहे. मराठी पौराणिक नाटककारांनाही या विषयाने आकर्षित केले असल्यास नवल नाही.

साधारणपणे १९३० ते ४० पर्यंत पौराणिक नाटके विपुल प्रमाणात लिहिली गेलेली दिसतात. इब्सेनी नाट्यतंत्राची वास्तववादी सामाजिक नाटके १९३० नंतर मोठ्या प्रमाणावर येऊ लागली. यानंतर मग स्वाभाविकच पौराणिक नाटकांची पीछेहाट झाली. अगदी आज जरी वि. वा. शिरवाडकर, विद्याधर पुंडलिक, रत्नाकर मतकरी, 'कौंतेय', 'माता द्रौपदी', 'आरण्यक' अशी पौराणिक नाटके लिहीत असले तरी इतर नाटकांच्या तुलनेत त्यांची संख्या अत्यल्प आहे, शिवाय १९३० पूर्वीच्या पौराणिक नाटकांपेक्षा या नाट्यनिर्मितीमागील प्रेरणा व त्यांतून व्यक्त होणाऱ्या जाणिवाही अगदी वेगळ्या आहेत. म्हणून ज्या काळात पौराणिक नाटकांची मोठ्या प्रमाणात व बरीचशी सारख्या प्रेरणांनी निर्मिती झाली अशा साधारण १९३० पूर्वीच्या काळातील राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांच्यावरील पौराणिक नाटकांचा इथे विचार केला आहे.

या काळात पुष्कळ पौराणिक नाटके लिहिली गेली, पण राधा-कृष्णावरील नाटकांचा वेगळा विचार करावा लागतो. कारण राधा-कृष्णाच्या पुराणकथेकडे दोन अगदी परस्परविरोधी दृष्टिकोणांनी बघून ही नाटके लिहिली गेली आहेत. म्हणून या नाटकांत दोन प्रवाह स्पष्टपणे आढळून येतात. या काळातील इतर बहुतांश पौराणिक नाटकांप्रमाणे प्राचीन मराठी आख्यान-काव्याला अनुसरणारा एक प्रवाह. या प्रवाहातील नाटके शृंगारचेष्टांच्या वर्णनातून रंजनाच्या दृष्टीने राधा-कृष्णकथा स्वीकारतात. दुसऱ्या प्रवाहाचे वेगळेपण हे, की तो प्राचीन मराठी आख्यान-कवितेकडे पूर्णपणे पाठ फिरवितो. इतकेच नाही, तर राधा-कृष्णाच्या शृंगारचेष्टा नाकारून त्यांच्या नात्याला उच्च दर्जाचे नैतिक अधिष्ठान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करतो. रंजनाच्या ऐवजी नैतिक अर्थ सूचित करतो. यामुळेच या काळातील एकूण पौराणिक नाटकांमध्ये ही नाटके वेगळी व लक्षणीय ठरतात.

या नाटकांच्या दोन्ही प्रवाहांना त्यांचे म्हणून जे काही अनन्यसाधारण रूप प्राप्त झाले, ते का झाले हे लक्षात घेण्यासाठी राधा-कृष्णकथेची झालेली वाटचाल, भारतीयांचे तसेच ख्रिश्चन मिशनऱ्यांचे या कथेकडे बघण्याचे दृष्टिकोण, राष्ट्रवादी चळवळ इत्यादी गोष्टी लक्षात घेणे आवश्यक ठरते.

कृष्णचरित्रात रंगलेल्या श्रीमद्भागवतात राधेचा उल्लेखही जरी नसला, तरी अनेक शतकांपासून राधा-कृष्ण यांची कथा रूढ आहे. भारतीयांच्या आदराचा, भक्तीचा व श्रद्धेचा तो विषय राहात आला आहे. विविध पुराणे, वल्लभ संप्रदाय, निंबार्क संप्रदाय, राधा-वल्लभ संप्रदाय यात राधेला आनंदाची पूर्णशक्ती, कृष्णाची स्वकीया, आनंदस्वरूप असे मानले गेले आहे. संतसाहित्यातील गौळणी व शृंगारवर्णने ही मधुरा-भक्तीचा आदर्श नमुनाच आहे.

मराठी साहित्यात ज्ञानेश्वरांपासून शाहीरांपर्यंत अनेक कवींनी राधा-कृष्ण यांचा शृंगार वर्णन केला आहे. नामदेव, एकनाथ यांचा 'राधाविलास' मधुरा-भक्तीच्याच प्रेरणेने जन्मला आहे. शृंगारवर्णनामागील मधुराभक्तीचे सूत्र पंडितकवींपासून हळूहळू मागे पडत जाऊन केवळ शृंगारवर्णनाच्या अतिरेकाला प्राधान्य मिळत गेले. इतके, की वामनपंडिताच्या 'राधाविलास', 'राधाभुजंग', 'जलक्रीडा' या आख्यानांतील शृंगार-वर्णने कामशास्त्रातील शोभावीत. शाहीरांच्या लावण्यांचा जन्मच मुळात शृंगारवर्णनासाठी, तेच त्यांचे

प्रयोजन. परशराम, रामजोशी इत्यादी शाहीरांनी राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांचा अत्यंत उत्तान शृंगार त्यांच्या लावण्यांतून लोकांसमोर आणला, प्रसंगी तो बीभत्सतेच्याही पातळीवर नेला. याप्रकारे मुळात मधुराभक्तीच्या वर्णनासाठी आलेली राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांची शृंगारवर्णने केवळ रंजनार्थ केली जाऊ लागली. असे असले, तरी कृष्णाचे ईश्वरपण कलंकित मानले जात नव्हते. ईश्वरी अवतार मानला जाणारा कृष्ण भारतीयांच्या गाढ श्रद्धेचाच विषय होता.

या श्रद्धेला पहिल्यांदा तडा देण्याचा प्रयत्न केला, तो ख्रिश्चन धर्मोपदेशकांनी. ख्रिश्चन धर्माचा त्यांनी जेव्हा भारतात प्रचार सुरू केला, तेव्हा केवळ स्वधर्माचा प्रचार करूनच ते थांबले नाहीत, तर तो पुरेसा प्रभावी होण्यासाठी त्यांनी हिंदूंच्या देवदेवतांवर टीका करायला व हिंदू धर्मातील दोष दाखवायला सुरुवात केली. यातीलच एक भाग म्हणजे 'व्यभिचारी कृष्णावर' त्यांनी टीका करणे हा होता. ही टीका या प्रकारची होती.

१) कृष्ण पापी होता. यास्तव तो ईश्वर नव्हता.[२]

२) देव पवित्र आहे, कृष्ण पवित्र नाही. यास्तव कृष्ण देव नाही.

३) ज्याच्या पदरी पाप आहे तो ईश्वर नाही. कृष्णाच्या पदरी पाप आहे यास्तव कृष्ण ईश्वर नाही.

या उताऱ्यात ख्रिश्चन धर्मोपदेशकांनी कृष्णाला जे 'पापी' म्हटले आहे ते फार महत्त्वाचे आहे. कृष्ण 'पवित्र' नाही किंवा 'पापी' आहे, असे परधर्मीयांना वाटायला लावणारे वाङ्मय वामनपंडितादी पंडित कवींनी किंवा परशराम, रामजोशी इत्यादी शाहीरांनी विपुल प्रमाणात लिहिले. त्याचा परिणाम म्हणून कृष्णावर व हिंदू धर्मावर निंदाव्यंजक टीका करून ख्रिश्चन धर्माचे श्रेष्ठपण त्या धर्माचे धर्मोपदेशक उघड शब्दांत दाखवून देऊ लागले.

या निंदेची प्रतिक्रिया अर्थातच मग हिंदूंमध्ये उमटली. मोरभट दांडेकर, भाऊ महाजन, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादींनी हिंदू धर्माची तरफदारी करण्याचा प्रयत्न केला. यातूनच मग 'सद्धर्मदीपिके' (१८५८) सारखी नियतकालिके सुरू झाली. शिवाय विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यांसारख्यांनी ख्रिश्चन धर्माविरुद्ध जाहीर व्याख्यानेही दिली.

या सर्व गोष्टी एकोणिसाव्या शतकात जरी घडलेल्या दिसत असल्या, तरी या शतकात अजून राष्ट्रवादी भावना मात्र भारतीयांत निर्माण झालेली नव्हती. 'इंग्रजांचे ते सर्व चांगले आणि भारतीयांचे ते सर्व वाईट, मागासलेले' अशी भावना या शतकात होती. इंग्रजी राज्य हे तत्कालीनांना ईश्वरी वरदानच वाटत होते. 'इंग्लिश राज्याची आवश्यकता' यासारख्या लोकहितवादींच्या पत्रातून ही भावना जणू प्रातिनिधिक स्वरूपातच व्यक्त झाली आहे.

विसाव्या शतकात मात्र इंग्रजी राज्याकडे बघण्याची भारतीयांची दृष्टी बदलली होती. इंग्रजी राज्याचा खरा अर्थ हळूहळू विचारवंतांच्या लक्षात येऊ लागला होता. टिळकांचा इंग्रजविरोधी लढा या काळात उत्तरोत्तर अधिक तीव्र होत चालला होता. राष्ट्रवादी विचारसरणी जन्माला आली होती. म्हणूनच मग भारतीय संस्कृती, भारतीय इतिहास, हिंदू धर्म, हिंदू देवदेवता कशा श्रेष्ठ आहेत याची जाणीव सर्वसामान्यांना करून देऊन स्वदेशाभिमान जागृत करण्याचा प्रयत्न जाणीवपूर्वक केला जाऊ लागला होता.

एवढी सगळी पार्श्वभूमी लक्षात घेतल्यानंतरच राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांच्यावरील नाटकांचे वेगळेपण, त्यातील दोन प्रवाह, त्यांचे अनन्यसाधारणत्व, ते कसे व का निर्माण झाले हे लक्षात येते. ते असे :

एकोणिसाव्या शतकात जेव्हा मराठीत नाट्यनिर्मिती होऊ लागली, तेव्हा पौराणिक नाटककारांनी राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांच्या कामक्रीडांची अत्यंत उत्तान व रसभरीत वर्णने रंजनाच्या प्रेरणेने करून कृष्णाला अधिकच व्यभिचारी रूपात उभे केले. या नाटकांचे वैशिष्टच हे, की या नाटकांना कोणतीही एकच एक सलग अशी पुराणकथा नाही. 'कृष्णाने गोपींशी रासक्रीडा केली' किंवा 'राधेच्या घरी कृष्ण मोठा होऊन तिला कामसुख देतो' हीच एका अर्थाने या नाटककारांची पुराणकथा. मूळ पारंपरिक पुराणकथा स्थूल मानाने स्वीकारून तिचा मूळचा शृंगारिक अर्थ काल्पनिक गोष्टींची भर घालून अधिक वर्धित करायचा, अशी यांची नाट्यलेखनाची पद्धती आहे. परिणामत: मूळच्या कथेतील शृंगारवर्णनाला अत्यंत उत्तान, भडक रूप दिले गेले. या नाटककारांनी अर्थातच या पुराणकथांचा वापर धंद्यासाठी करून घेतला. नाटक पौराणिक असल्याने या [illegible]राला कृष्ण-

चरित्राची म्हणजे भक्तीची जोड आहे. त्यामुळे या कामक्रीडांचे आपोआपच उदात्तीकरण झाले आहे. तेव्हा, राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांच्या या कथांचा या नाटककारांनी अत्यंत 'कुशलतेने' वापर करून घेतला आहे. अर्थातच केवळ रंजनावर डोळा ठेवून केलेली ही नाट्यनिर्मिती सामान्य दर्जाची बनली आहे.

प्राचीन मराठी आख्यान-कवितेतील पारंपरिक राधा-कृष्णकथा सांगणारी ही सर्व नाटके केवळ एकोणिसाव्या शतकातच आढळतात. याच शतकातील ख्रिचनांच्या कृष्णविरोधी टीकेचा किंवा हिंदुधर्माभिमान्यांच्या वाङ्मयाचा कोणताही परिणाम या शतकातील या नाटककारांवर झालेला दिसत नाही. उलट, कृष्णचरित्राला अधिक भडकपणे सादर करून त्याचा रंजनार्थ उपयोग या शतकातील पौराणिक नाटककार करून घेताना दिसतात. कारण, अजून राष्ट्रवादी भावना निर्माण झालेली नव्हती. 'इंग्रजांचे ते सर्व चांगले व भारतीयांचे ते सर्व वाईट' अशी भावना होती.

राधा-कृष्ण, गोपी-कृष्ण यांच्या नाटकांमध्ये दुसरा स्पष्ट प्रवाह दिसतो तो विसाव्या शतकात. जेवढी पौराणिक नाटके या शतकाच्या पूर्वार्धात या कथांवर लिहिली गेली, त्यांतून नाना क्लृप्त्यांच्या योजना करून कृष्णाच्या डागाळलेल्या व्यक्तिमत्त्वाला उजळण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. राधा-कृष्ण यांच्या संबंधांचा नवा अर्थ लावून कृष्णाची प्रतिमा उज्ज्वल करण्याचा या नाटककारांचा प्रयत्न आहे. यासाठी पारंपरिक राधा-कृष्ण त्यांनी नाकारले व राधा-कृष्णाची नव्याने निर्मिती केली. त्यांच्या संबंधांना, नात्यांना नवा अर्थ प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला.

असा प्रयत्न केवळ विसाव्या शतकातच आहे. भारतीयांची इंग्रजी राज्याकडे बघण्याची बदललेली दृष्टी हे एक याचे अत्यंत महत्त्वाचे कारण आहे. लो. टिळकांमुळे राष्ट्रवादी विचारसरणीचा या शतकात जन्म झाला होता. भारतीय संस्कृती, भारतीय इतिहास हा कसा श्रेष्ठ आहे याची जाणीव सर्वसामान्यांना करून देऊन स्वदेशाभिमान जागृत करण्याचा प्रयत्न केला जाऊ लागला होता. जे राधा-कृष्णसंबंध बदनाम झाल्यासारखे वाटत होते, कृष्णाची जी प्रतिमा मलिन स्वरूपाची वाटावी अशा प्रकारे एतद्देशीय शाहीरांसारखे कवी व ख्रिश्चन धर्मीय उभे करीत होते, ती प्रतिमा जाणीवपूर्वक पुसून टाकण्याचा प्रयत्न यामुळेच या काळात होऊ लागला होता. 'आमची संस्कृती व्यभिचाराची पूजा करणाऱ्यांची संस्कृती नाही. आमच्या धर्मातील देव-देवता व्यभिचारी नाहीत, तर पाहणाऱ्यांची दृष्टीच वाईट आहे' असे लोकजागृतीसाठी लोकांना पटवले जाऊ लागले होते. यामुळे विसाव्या शतकात राधा-कृष्णसंबंधावरील बव्हंशी नाटकांतून कृष्णाची व्यभिचारकथा उभी केली जात नाही.

इंग्रजी रोमँटिक वाङ्मयातून आपल्याकडे आलेल्या 'अशरीरी प्रेम' या कल्पनेचे एक आदर्श उदाहरण म्हणूनही राधा-कृष्णसंबंधाकडे या काळात बघितले गेले. शिवाय 'कृष्णाविषयीची भक्ती' ही प्रेरणाही या नाटकांच्या मुळाशी आहे, त्यामुळे आपल्या दैवतावरील काही मानहानिकारक, चारित्र्यहानिकारक आक्षेप दूर करण्याचा या लेखकांचा प्रयत्न आहे. म्हणून राधा-कृष्णसंबंधांना जो नवा अर्थ या लेखकांना प्राप्त करून द्यायचा आहे त्यामागे भक्तीची प्रेरणाही आहे व नीतीचीही प्रेरणा आहे. नैतिक दृष्टया कृष्णाचे श्रेष्ठत्व सिद्ध करून कृष्णविषयक भक्तीत या लेखकांना वाढ करायची आहे. राष्ट्रवादी चळवळीच्या प्रभावामुळे अनैतिक आदर्श ठेवण्यापेक्षा नैतिक आदर्श, राधा-कृष्णसंबंधांचे नैतिक पातळीवरून केलेले उदात्तीकरण या लेखकांना समाजापुढे ठेवायचे आहे. म्हणून भक्तिनीतीच्या प्रेरणेतूनच नवा अर्थ स्वीकारण्याची या लेखकांची वृत्ती आहे.

राधा-कृष्णसंबंधातील पावित्र्य, नैतिकता प्रस्थापित करण्याचा पौराणिक नाटककारांचा हा प्रयत्न मूलतः नवीन मात्र मुळीच नाही. कारण, 'एक भक्त' या नात्यानेच राधेचे नाव कृष्णाबरोबर सुरुवातीपासून जोडले गेलेले होते. देव-भक्ताचे ते आध्यात्मिक पातळीवरचे नाते होते. देवीभागवतात असलेली राधा तर प्रत्यक्ष विष्णुरूप कृष्णालाही वंद्य आहे. कारण ती त्याची गुरू आहे. म्हणून देवीभागवतात ठिकठिकाणी श्रीकृष्णाने केलेल्या राधापूजेचे वर्णन येते. या प्रकारे राधा-कृष्णसंबंधाकडे देवीभागवत एका वेगळ्याच दृष्टिकोणातून पाहते. मधल्या काळात या नैतिक नात्याला नगण्य स्थान मिळत गेले व या संबंधांना व्यभिचारी प्रेमाचे अर्थ मिळत गेले. पुढे हेच व्यभिचारी प्रेमाचे अर्थ अधिकाधिक प्रधान बनत गेले. विसाव्या शतकातील या नाटककारांनी राधा-कृष्णनात्याचा मुळात नैतिक स्वरूपाचा पण नंतर अंधुक बनत गेलेला अर्थ अधिक प्रभावी बनवण्याचा प्रयत्न केला.

विसाव्या शतकातील विशिष्ट अशा सामाजिक व राजकीय परिस्थितीत राधा-कृष्णसंबंधाचा हा नैतिक अर्थ अगदी नवा अर्थ वाटतो. पूर्वेतिहासाबद्दलच्या अभिमानावर आधारित असलेल्या राष्ट्रवादाने झपाटलेली या शतकातील भारतीय जनता पाहिल्यावर या नव्या अर्थामागील सहेतुकता अधिकच लक्षात येते. या नव्या अर्थाने भक्तीपेक्षाही नैतिकतेला अधिक महत्त्व दिलेले दिसते. म्हणूनच यात गुरु-शिष्य, भाऊ-बहीण, देव-भक्त हे सर्व प्रकार येतात.

राधा-कृष्णसंबंधांना हा नवा नैतिक अर्थ प्राप्त करून देणाऱ्या पौराणिक नाटककारांनी प्रामुख्याने श्रीधराच्या हरिविजयातील अनेक छोटचा छोटचा सुटचा कृष्णकथा एकत्र आणून नाटचनिर्मिती केली आहे. कृष्णाच्या खोडचा, रासक्रीडा व कालियामर्दन या वेगवेगळचा कृष्णकथांचे संकलन करीत असताना या नाटककारांनी काही काल्पनिक कथांचीही त्यात भर घातली आहे. काही प्रातिनिधिक नाटचकृतींच्या अभ्यासामुळे या विवेचनाला अधिक पुष्टी मिळू शकेल.

इ. स. १९०८ साली रंगभूमीवर आलेल्या भा. वि. वरेरकरांच्या ' सं. कुंजविहारी ' (१९१४) मध्ये राधा-कृष्णसंबंधांच्या उदात्तीकरणाचा पहिला प्रयत्न दिसतो. या नाटकाचा थोडक्यात कथाभाग असा :

राधेचा पती रमण हा राधेला कृष्णाच्या छातीवर डोके ठेवून झोपलेली पाहतो. त्यामुळे मूळचा त्याचा संशय बळावतो. त्याला ही बदनामी असह्य होते. नंदराजाकडे फिर्याद करायला तो जातो. पुढे कृष्णाला दोषी ठरवले जाते. गोकुळ सोडून जाण्याची शिक्षा त्याला दिली जाते. ' आपण गेल्यावर तुला पश्चात्ताप होईल ', असे शिक्षा होऊन जायला निघालेला कृष्ण रमणला म्हणतो. कृष्णाच्या अलौकिकत्वाबद्दल रमणच्याही कानावर आलेले असतेच. त्यामुळे थोडासा संभ्रमित झालेला रमण कृष्णाला ' थांब थांब ' म्हणतो. इतक्यात मोठा प्रकाश पडून कृष्ण नाहीसा होतो. त्याबरोबर रमणचा संशय दूर होऊन तो कृष्णभक्त बनतो. राधा-कृष्ण निरपराधी आहेत, असे त्याला पटते.

वास्तविक अशा तऱ्हेची कथा कोणत्याही पुराणात नाही, पण ' राधेची कृष्णावरील श्रेष्ठ भक्ती सर्व लोकापवादांतूनही कायम टिकली ' ही या संदर्भातील मूळ घटना श्रीमद्भागवत वगळता कृष्णचरित्रविषयक सर्व पुराणे, मराठी संत व पंतकाव्ये यांत प्रतिपादन केलेली आहे. या मूळ घटनेचाच इथे विकास केला आहे. तो करताना काही काल्पनिक व्यक्ती व प्रसंग मदतीला घेतले आहेत, आणि भक्तीबरोबरच भक्तीच्या या संबंधांना एक नैतिक अर्थ हेतुतः प्राप्त करवून देण्याचा प्रयत्न केला आहे.

राधा-कृष्णसंबंधाकडे आणि खुद्द कृष्णाकडे लोकांनी कोणत्या दृष्टीने पाहिले पाहिजे ते जागोजाग व अनेक व्यक्तींच्या मुखाने या नाटकात वदवले गेले आहे. उदा., वरेरकरांचा कृष्ण स्वतःच एके ठिकाणी म्हणतो : " तुमची मनेच अशुद्ध, त्यामुळे माझे शुद्ध विचारही तुम्हाला अशुद्ध दिसतात "[२] किंवा राधा विचारते, " ... केवळ शुद्ध प्रेम असणे शक्य नाही का ?... "[३] अर्थातच हा प्रश्न राधेचा नसून लेखकाचा आहे व तो त्याने सरळ जनतेलाच विचारल्याचे सहज लक्षात येते. लेखकाची भूमिका मांडताना नाटकातील सुबल एके ठिकाणी म्हणतो, " स्वतःच्या हातून काहीसुद्धा होत नाही. पण श्रेष्ठ पुरुषांच्या थोर वृत्तींना नावे ठेवण्यात मग तत्पर... तुमच्या दृष्टीला त्याचे वर्तन शृंगारिक दिसते, याला कारण तुमची विषयलोलुपता... सर्व जगताच्या पित्याच्या ठायी व्यभिचार संभवेल तरी कसा ? काय तुमची दृष्टी ही ? "[४]

शिक्षा झालेला कृष्ण गोकुळ सोडून जातो. मग कृष्णविरोधक रमण त्याचा भक्त बनतो. यानंतर मग खुद्द रमणलाच असे वाटू लागते, की (राधा-कृष्णाचे) " ...हे विलास नव्हेत, हा विहार आहे, ती मदनबाधा नव्हे, ती शुद्ध प्रेमाची लहरी आहे. "[५]

याशिवाय राधाच खरेखुरे शुद्ध प्रेम करणारी भक्त आहे, हेही वरेरकरांना सिद्ध करायचे आहे. पुराणातील ' कालियामर्दन ' या कथाभागावर आधारलेला पण काल्पनिक स्वरूपाचा एक प्रसंग त्यांनी यासाठी नाटकात घातला आहे. ' कालियाडोहात कृष्ण गेला, त्यामुळे सर्व गोकुळवासी शोकग्रस्त झाले, पण शेवटी कृष्ण परत आला. ' पुराणकथेतील ही मूळ घटना कायम ठेवून राधेचे शुद्ध प्रेम सिद्ध करण्यासाठी त्यांनी मूळ कथेत बदल केला. बदललेली कथा अशी :

अनेक आरोपांनी गांजून शेवटी कृष्ण गोकुळ सोडून सरळ कालियाकडे यमुनेत निघून जातो. मग सर्व गोकुळवासी नदीकिनारी उभे राहून त्याला हाका मारतात. तेव्हा त्यांना नारद येऊन सांगतात, की ' ज्याची भक्ती खरी असेल त्याच्या हाकेने कालियामर्दन केलेला








कृष्ण डोहातून बाहेर येईल.' सर्व नगरवासी कृष्णाला हाका मारतात पण फक्त राधेच्या हाकेनंतरच कृष्ण डोहाच्या बाहेर येतो. यामुळे मग सर्वांना राधा-कृष्णाचे अकृत्रिम प्रेम व राधेची आदर्श व उत्कट भक्ती भावते.[६] आणि ती भक्ती पाहून खुद्द तिचा पती रमणच तिचा भक्त बनतो.

सर्व संवाद, घटना, प्रसंग, व्यक्ती यांच्या द्वारा वरेरकरांचा दृष्टिकोण स्वच्छपणे जाणवतो. तो असा : सर्वसामान्य लोकच विषयलोलुप आहेत आणि म्हणून त्यांना राधा-कृष्णांत व्यभिचारी नाते दिसते. पण मुळात 'कृष्णावर शुद्ध प्रेम करणारी एक भक्त म्हणजे राधा' आणि 'अशरीर प्रेम, शुद्ध, सात्त्विक, उच्च दर्जाचे प्रेम म्हणजे राधा-कृष्णांतील प्रेम.' ही या नाटकाची समीकरणे आहेत व ती सिद्ध करण्यासाठी नाटकाच्या सर्व घटकांमध्ये आवश्यक त्या सर्व तडजोडी वरेरकर करतात. कारण, या साध्यासाठीच नाटचनिर्मिती झाली आहे.

य. ना. टिपणीस यांच्या 'राधामाधव' (१९१४) या नाटकामध्ये राधा-माधवांच्या संबंधांना विशुद्ध मैत्रीचे रूप देण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो.

आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेमध्येच टिपणीस यांनी त्यांची ही भूमिका स्पष्ट केली आहे. "... अपवित्र कल्पना व लोकांची श्रीकृष्णावरील–राधा-कृष्णावरील भक्ती यांचा मेळ कसा घालावा?... राधा-कृष्णावर लोकांची जी एवढी भक्ती आहे, तिच्या मुळाशी हा दैवी पांघरुणाखाली दडपून ठेवलेला व्यभिचार, खास नाही... जगामध्ये अनेक स्त्री-पुरुषांमध्ये निर्मळ प्रेम, आदर, भक्ती ही असू शकते, व याच तत्त्वावर ह्या नाटकात राधा-कृष्णाच्या चरित्राची उभारणी केली आहे... नाटचाच्या दृष्टीने कथानकाला सुसंगत असा मूळ पौराणिक कथेमध्ये माझ्या अल्प समजुतीप्रमाणे थोडा फरक केला आहे."[७] प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे 'पौराणिक कथेत थोडा फरक केला आहे.' पण प्रत्यक्षात मात्र केवळ पौराणिक व्यक्ती व काल्पनिक कथानक एकत्र करून राधा-माधव यांच्या विशुद्ध मैत्रीचे नव्यानेच चित्रण केले आहे.

या नाटकाचे थोडक्यात कथानक असे : राधा व तिचा पती अनय, अनयाची बहीण कामिनी व तिचा पती पेंद्या अशा दोन जोडचा यात येतात. कामिनी आपल्या भावाचे म्हणजे अनयाचे राधेच्या चारित्र्याबद्दल कान भरवीत असते. त्यामुळे अनय राधेला टाकतो.

लंबोदर हा एक ढोंगी साधू असतो. त्याचे राधेवर लक्ष असते. कृष्णाला डोहात बुडवण्याविषयी तो नंदाला भरवतो. कारण, कृष्ण हा जारकर्मी आहे असे बोलले जात असते. त्याप्रमाणे जारकर्माची शिक्षा म्हणून कृष्णाला यमुनेच्या डोहात बुडवले जाते. पण, कालियामर्दन करून कृष्ण वर येतो व राधेचे तसेच कृष्णाचे पावित्र्य सर्वांना पटते.

'राधा विवाहित होती' ही जी समजूत जनमानसात हरिविजयासारख्या ग्रंथामुळे रूढ आहे तीच इथे गृहीत धरली आहे. याच पौराणिक मूळ घटकाचा विकास म्हणून मग कोणत्याही खाष्ट नणंदेप्रमाणे राधेचीही खाष्ट नणंद इथे दाखवली आहे. मग अशा नणंदेच्या वारंवार सांगण्याने अनयाचे संशयग्रस्त होणे, या काल्पनिक गोष्टीची निर्मिती झाली आहे. याच मूळ घटकाचा अधिक विकास म्हणून राधेविषयी अनयाची संशयनिवृत्ती होणे, हा कथाभाग नव्याने जोडून राधेचे पावित्र्य म्हणजेच पर्यायाने कृष्णाचे पावित्र्य सिद्ध केले गेले आहे. यासाठी पुष्कळ दिव्य व अद्भुत दृश्यांची निर्मिती केली गेली आहे. ती अशी :

अनयाकडे एकदा कृष्ण आलेला असताना अनय त्याला सरळपणे राधेबद्दल जाब विचारतो. व्यभिचाराचा आरोप कृष्ण अर्थातच अमान्य करतो. पण 'खात्री करून दे' असे अनय म्हणतो. यासाठी राधेशी कृष्णाने प्रणयचेष्टा कराव्यात व अनयाने त्या चोरून पाहाव्यात आणि खात्री पटवून घ्यावी असे ठरते. त्याप्रमाणे मग स्वतःच्याच घरी अनय लपून बसतो. राधा बाहेरून आल्यावर तिच्याशी लगट करण्याचा प्रयत्न कृष्ण करतो. राधेला हे अनपेक्षित असते व तिला ते आवडतही नाही. ती याचा तीव्र शब्दांत धिक्कारही करते. पण मग कृष्ण तिला चमत्कार दाखवून कमळाच्या नावेत, मेघांच्या विमानात व चंद्रकोरीच्या पलंगावर नेऊन शृंगारार्थ आवाहन करतो. तेव्हा मग चिडून कृष्णाचा धिक्कार करीत तीव्र शब्दांत राधा त्याला शाप देते. "आपल्या पापी स्पर्शाने मला दूषित करू नकोस. माझा तो रत्नखचित पलंग तुझ्या दिव्य मंचाइतका मूल्यवान नसला तरी अनयराजांच्या स्पर्शाने मला तो स्वर्गाच्या मोलाचा वाटतो ... पाप्या, का माझा असा छळ करतोस? तू जरी परमेश्वर

असलास तरी या जड देहावर माझ्या नाथावाचून कुणाचीही सत्ता नाही...पाप्या, घे-घे शाप– जर माझ्या पतीवर मी एकनिष्ठ प्रेम केले असेल, जर माझे पातिव्रत्य मी उज्ज्वल राखलं असेल, जर माझी परमेश्वरावरची निष्ठा अढळ असेल तर ... " (देखावा बदलून पुन्हा महाल होतो. अनय धावत येऊन राधेला आलिंगन देतो. माधव गुप्त होतो.) ८

हा कल्पित पण अद्‌भुतरम्य व दिव्य चमत्कार-प्रसंग निर्मिण्यामागच्या प्रेरणा स्पष्ट आहेत. एक म्हणजे, कृष्ण साक्षात परमात्मा असल्यानेच केवळ तो ह्या अतर्क्य व अद्‌भुत गोष्टी करू शकतो. दुसरी म्हणजे अशा परमेश्वरालाही न भुलणारी महान पतिव्रता म्हणजे केवळ एक राधाच आहे. तिसरी म्हणजे, राधा-कृष्णावरील कलंक दूर करायचा, तर राधेला पतिनिष्ठ व महान पतिव्रता दाखवले की झाले. मग कृष्ण आपोआप निष्कलंक ठरतो. अशी टिपणिसांची साधी अटकळ आहे. म्हणूनच या नाटकात ते राधेचे केवळ पातिव्रत्यच सिद्ध करून थांबले नाहीत, तर ती सावित्री–दमयंतीच्या तोडीची पतिव्रता होती असाही त्यांचा दावा आहे आणि म्हणूनच ती प्रत्यक्ष परमात्म्यालाही आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावाने शाप द्यायला निघते. या प्रसंगाने आणखीही एक गोष्ट साध्य झाली, ती म्हणजे बहुचर्चित राधेला जे अनयाने स्वीकारले ते विविध प्रकाराने तावूनसुलाखून घेऊनच. व्यभिचारिणी म्हणून बदनाम झालेल्या बायकोचे पातिव्रत्य खुद्द नवऱ्याला पटल्यानेच त्याने तिचा स्वीकार केला असेही सिद्ध करता आले आणि शिवाय कृष्ण निर्दोष ठरून त्याच्यासह राधेचे जनमानसातील स्थान उंचावण्यास आपोआपच मदत झाली.

राधेविषयी निःशंक झालेल्या अनयाच्या मनात त्याची बहीण कामिनी पुन्हा विष पेरते. दृष्टिभ्रमामुळे त्याला पत्नीचे खरे अनैतिक संबंध समजू शकले नाहीत असे पटवते. हे पटल्याने मग तो राधेला घरातून हाकलून देतो. वनात गेलेल्या परित्यक्ता राधेच्या पातिव्रत्याची ग्वाही मग वारा, निर्झर व मेघ यांच्या करवी साक्षात निसर्गच देतो. अशा वेळी मग भोंदू साधू लंबोदर तेथे जाऊन राधेचे प्रियाराधन करतो. हातही धरतो. राधा त्याला झिडकारते. अगदी त्याच वेळी नंदाच्या दरबारात राधेविषयीच्या व्यभिचाराच्या आरोपावरून कृष्णाला उभे केलेले असते. अंतर्ज्ञानाने कृष्णाला राधेवरील संकट कळते व तेथूनच तो राधेला न घाबरण्याविषयी दिलासा देतो. कृष्ण मदतीला येत असल्याचे लंबोदराला ऐकू येते व तो पळून जातो.

नाटककाराच्या साध्याच्या दृष्टीने हा प्रसंग महत्त्वाचा आहे. दैवी सामर्थ्य असलेला कृष्ण स्वतः तर राधेला भ्रष्ट करणे शक्य नाही, पण त्याच्या या पतिनिष्ठ निस्सीम भक्ताला कोणी भ्रष्ट करू लागला तर आपल्या भक्ताचे पावित्र्यरक्षण श्रीकृष्ण करीलच करील, हे दाखवून देण्याच्या प्रेरणेतून हा प्रसंग आला आहे. द्रौपदीप्रमाणेच राधाही कृष्णाची अनन्य भक्त होती व तिच्याप्रमाणेच राधाही स्वतःला कृष्णाची बहीण समजत होती. अगदी द्रौपदीप्रमाणेच कृष्णही राधेला अनन्य भक्त व भगिनी मानत होता. म्हणून मग द्रौपदीप्रमाणेच राधेवरही पावित्र्यभंग होण्याचा जीवघेणा प्रसंग येतो व द्रौपदीप्रमाणेच राधाही कृष्णाला शरण जाते, तेव्हा अर्थातच द्रौपदीप्रमाणेच राधेचेही लज्जारक्षण कृष्णाकडून केले जाते.

एवढ्यावरही टिपणिसांचे समाधान झाले नसावे म्हणून मग सर्व गोकुळवासीयांची राधेबद्दलची दृष्टी कशी साफ झाली हे दाखवणारा एक चमत्कारप्रसंग त्यांनी निर्माण केला. तो असा :

नंदराजाच्या दरबारात कृष्णाला व्यभिचारी ठरवले जाते व त्याला कालिया डोहात ढकलण्याची शिक्षा सुनावली जाते. 'तीन दिवसांनी येईन' असे म्हणून कृष्ण डोहात उडी घेतो. कृष्ण गेल्यावर मग भर दिवसाही अंधार पडतो. याचे कारण व उपाय नंदराजा लंबोदराला विचारतो. तेव्हा राधेवर चिडलेला लंबोदर राधेला डोहार्पण करणे हा उपाय सुचवतो. त्याप्रमाणे राधेला डोहात ढकलणार, तोच कालियावर उभा राहून मुरली वाजवताना कृष्ण दिसतो. मग राधेच्या पावित्र्याबद्दल सर्व गोकुळवासीयांची खात्री पटते.

वरेरकरांच्या 'सं. कुंजविहारी'मध्ये आणि टिपणिसांच्या या 'राधामाधव'मध्ये राधा-कृष्णाचे पावित्र्य सिद्ध करण्यासाठी 'कालियामर्दन' हाच एकमेव प्रसंग निवडलेला दिसतो. कारण सर्वच नागरिक एकत्र जमणे व त्यांना एकदमच विस्मित व्हावे लागणे अशा दोन महत्त्वाच्या गोष्टी या प्रसंगात आहेत. 'कृष्णाने कालियाला मारणे व सर्व नागरिकांना विस्मित करणे' या मूळ घटना वरेरकर व टिपणीस या दोघांनीही कायम ठेवल्या आहेत. पण कालिया-

मर्दनाची सांगड राधा-कृष्णाच्या पावित्र्याशी त्यांनी घालून दिली आहे. त्यामुळे सर्वच गोकुळवासीयांसमोर एकदमच राधा व कृष्ण या दोघांचेही पावित्र्य सिद्ध झाले. एकान्तापेक्षा लोकान्तात हे पावित्र्य सिद्ध होणे आवश्यक होते. असा 'आदर्श लोकान्त' फक्त याच प्रसंगात मिळू शकणारा होता. म्हणून 'कृष्णाने कालियाला मारले व सर्वांना आनंद झाला' ही या पुराणकथेतील मूळ सूत्रे कायम ठेवून बाकी सर्व तपशील हेतुतःच साध्यानुकूल भरला गेला आहे.

विठ्ठल सीताराम गुर्जर यांच्या 'सं. नंदकुमार' (१९२५) मध्येही राधा-कृष्णाचे नाते हे अनैतिक नव्हते, तर बहीण-भावाचे, गुरु-शिष्याचे उच्च नैतिक नाते होते हे सूत्र सिद्ध करण्याचा प्रयत्न दिसतो. त्या पोटीच त्याची निर्मिती झालेली दिसते. या नाटकाचा महत्त्वाचा कथाभाग थोडक्यात असा :

राधा व कृष्ण यांचे अनैतिक संबंध असावेत असा तिच्या पतीचा म्हणजे अनयाचा संशय असतो. सर्व गोकुळवासीयांचाही तोच समज असतो.

कृष्ण हा एक प्रखर राष्ट्रवादी विचाराने भारलेला तरुण असतो. अन्याय्य पद्धतीने उग्रसेनाला दूर सारून मथुरेचे सिंहासन कंसाने बळकावले व जनतेला गुलामगिरीत टाकले म्हणून कंसावर कृष्ण चिडलेला असतो. माता यशोदा व गुरु राधा यांचे त्याला आशीर्वाद असतात.

सूडाने पेटलेला अनय कृष्णाविरुद्ध फिर्याद द्यायला मथुरेला जातो. कृष्ण हा नंदाचा मुलगा नसून वसुदेवाचा असल्याचे रहस्य तो उघड करतो. परिणामतः वसुदेवाला कंस कैदेत टाकतो.

पुढे राधेला पकडून कंस तळघरात कोंडतो. राधेला भ्रष्ट करून कृष्णावर सूड उगवण्याचा त्याचा विचार असतो. पण कंसाने राधेचा हात धरल्याबरोबर कृष्ण व अनय तेथे पोहोचतात. अनयाचा राधा-कृष्णाबद्दलचा संशय दूर होतो.

आपले अवतारकार्य हे जगदुद्धारासाठीच होते आणि यशोदा व राधा या केवळ दोन गुरूंच्या कृपेमुळे, मार्गदर्शनामुळे जगन्मंगलाच्या दिव्य मंदिराची उभारणी करणे शक्य झाले असे गुर्जरांना या नाटकातून सुचवायचे आहे. म्हणूनच मग कृष्णाने या दोघींचा गौरव करून स्वतःकडे कमीपणा घेणे पुष्कळदा येते. उदा., अक्रूराने मथुरेला नेण्याच्या प्रसंगी कृष्ण अक्रूराला म्हणतो, "अक्रूरजी, माझ्यामध्ये कर्तव्याची काही जाणीव कुणी उत्पन्न केली असेल, तर ती माझी वंद्य मातुश्री आणि माझा सदगुरू यांनी ... माझ्या राधामाईच्या या प्रचंड आत्मत्यागाची जगाला कधी यथार्थ कल्पना येईल की नाही, याबद्दल मला शंका वाटते. होय, मला तर अशी भीती वाटते, की कदाचित राधामाईच्या शुभ नावाला जग कायमचाच कलंक लावून बसेल" [९] म्हणजे वास्तविक पाहता राधेला कृष्ण मोठी बहीण व गुरू मानत होता, पण सर्वसामान्य माणसांची दृष्टीच कोती, पापी. द्रष्टया कृष्णाला हे आधीच जाणवलं होतं, की त्यांच्या पवित्र, नैतिक व उच्च संबंधांकडे समाज अपवित्र, अनैतिक व नीच नाते समजून बघेल. आणि म्हणून स्वतःच्या मनातील ही खंतच जणू कृष्णाने व्यक्त केली आहे असे दाखवण्याचा इथे प्रयत्न दिसतो. याच प्रकारची खंत राधाही व्यक्त करते. सर्व लोकापवादाचे निरसन करताना ती म्हणते, "शिव शिव ! काय बोलतेस हे चंद्रिके ? त्या निर्मल, निष्पाप कृष्णाविषयी असले घाणेरडे उद्‌गार तू तरी काढू नकोस. खरोखर, श्रीकृष्ण म्हणजे त्रिभुवनात जे मंगलातलं मंगल, निष्पापातलं निष्पाप, त्याचं केवळ सार आहे... खरंच चंद्रिके, जगात जी अत्यंत दुष्कर कर्मे आहेत त्यांत दुर्जनांचं तोंड बंद करणं हे सर्वांत कठीण आहे...... श्रीकृष्ण मला आपली भगिनी समजून माझ्यापाशी आपलं अंतःकरण उघड करून दाखवतो." [१०]

नाट्यौचित्याकडे दुर्लक्ष करून राधेचे गुरुपण व भगिनीत्व आणि कृष्णाचे सत्‌शिष्यत्व व बंधुत्व सिद्ध करण्यासाठी हास्यास्पद वाटावेत असे प्रसंग या नाटकात येतात. उदाहरणार्थ,

कृष्णाच्या दोन्ही बाजूंनी चाणूर व मुष्टिक यांना कंस कृष्णावर सोडतो. इतक्यात राधा चाणूराच्या कटारीच्या प्रहारासमोर येऊन त्याचा वार आपल्या हातावर सावरून म्हणते, "कृष्णा, उजवी बाजू सांभाळ, वज्रमुष्टी हाण..." आणि मग एकेका वज्रमुष्टीने चाणूर, मुष्टिक व कंस मूर्च्छित पडतात. मग राधेला कृष्ण म्हणतो, "गुरो ! राधामाई, काय हे अपूर्व शिष्यवात्सल्य !" त्यावर मग गुरुराधा शिष्यकृष्णाला आशीर्वाद देते, "जगन्मंगलाच्या मार्गात पहिलं पाऊल टाकण्यात विजयी झालेल्या श्रीकृष्णा, तुझा सदासर्वदा असाच विजय होईल, असा माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे." [११]






या हास्यास्पद व रंजक प्रसंगाला कोणताही पौराणिक आधार नाही. 'चाणूर व मुष्टिक यांना कृष्णाने मारले' इतक्या बीजभूत घटनेला काल्पनिक कथाभागाची जोड दिली गेली आहे. कारण, राधेने स्वतः चाणूराच्या प्रहारासमोर येऊन आपल्या सच्छिष्याचा प्राण वाचवण्यातून तिचे शिष्योत्तमावरील प्रेम व्यक्त झालेले दाखवायचे आहे आणि नंतर तिच्या तोंडून भरघोस आशीर्वादही कृष्णाला द्यायचा आहे. म्हणजे मग राधा-कृष्णाचे गुरु-शिष्यसंबंध कसे दृढ आहेत हे सिद्ध करता येते. प्रत्यक्ष जगदवंद्य श्रीकृष्णाला जी आशीर्वाद देते तिचा अधिकार केवढा मोठा असला पाहिजे याची सूचना देण्याच्या प्रेरणेतून सदर प्रसंग आला आहे.

एकदा शिष्याचे प्राण गुरू वाचवतो, तर दुसऱ्यांदा शिष्य गुरूचे प्राण वाचवतो ! हिंदी चित्रपटात शोभावा असा प्रसंग तो याप्रमाणे आहे :

तळघरात कोंडलेल्या राधेला भ्रष्ट करुन कृष्णाचा सूड घेण्याचा डाव कंसाचा असतो. कंस आपल्या जवळ येत आहे हे पाहिल्यावर राधा त्याला म्हणते, "माझे पतिदेव माझे परमेश्वर असून श्रीकृष्ण माझा पाठीराखा बंधू आहे." आणि आता कंस तिचा हात धरणार, इतक्यात राधा स्वतःवर जंबिया मारून घेऊ लागते. तोच त्याच वेळी कृष्ण, अनय व चंद्रिका येतात. अनय राधेच्या हातून जंबिया काढून घेतो नंतर कंसाला वज्रमुष्टी मारून कृष्ण त्याला खाली पाडतो व म्हणतो, "दुष्टा, राधेचा पाठीराखा भाऊ, कृष्ण, हा पहा तुझा काळ उभा आहे... जा इथून काळे कर." कंस थोडं गुरगुरत निघून गेल्यावर मग राधा-कृष्णाविषयी झालेल्या अकारण गैरसमजाबद्दल अनय त्यांची माफी मागतो."[१२]

या प्रकारे नाट्यौचित्याचा जराही विचार न करता राधा-कृष्णाचे गुरु-शिष्य, बहीण-भाऊ हे नवे नाते नाटकात प्रस्थापित करण्याचा प्रयत्न आहे. जनमानसात 'पापी कृष्ण', 'व्यभिचारी कृष्ण' म्हणून कृष्णाची प्रतिमा उभी करण्याच्या प्रयत्नाला खोडून काढण्याचा हा प्रयत्न आहे.

कृष्णाने राधेला गुरू मानणे, असे गुर्जरांनी दाखवण्यावरून त्यांच्या समोर देवीभागवत असावे याला काही पुरावा नाही. पण तत्कालीन अनेक नाटककारांसमोर असणारे कृ. प्र. खाडिलकर मात्र गुर्जरांच्या समोर असावेत. कारण पूर्ण नाटक जरी नसले तरी हीच कल्पना खाडिलकरांच्या 'सं. स्वयंवर' (१९१६) मध्ये चौथ्या अंकात या प्रकारे आली आहे :

रुक्मिणीच्या प्रेमव्याकुळ मनाची परीक्षा पाहण्याचा एक काल्पनिक प्रसंग या नाटकात खाडिलकरांनी घातला आहे. 'शिशुपालाशी रुक्मिणीचे लग्न ठरले' असा निरोप रुक्मिणीच्या सांगण्यावरून कृष्णाला पाठवला जातो. मग गोपाच्या वेषात खुद्द कृष्ण रुक्मिणीकडे जातो. आपण द्वारकेहून आलो असून, नवऱ्या मुलीच्या अंगी दोन गुण असण्याची अट कृष्णाने घातली असल्याचेही तो सांगतो. कारण कृष्णाला लग्न करायचे असून त्याला नवरीमुलगी रुक्मिणीएवढी सुंदर हवी आहे ही पहिली अट. दुसरी कृष्णाची नसून राधेची अट असते. कारण, कृष्ण हा राधेच्या अर्ध्या वचनात नेहमी असतो. वृद्ध गोपाल पुढे म्हणतो, "राधा श्रीकृष्णाची गुरू कुमारावस्थेची जोपासना करून, तारुण्यात कल्याणप्रद वळण देणारी गुरू" आहे. म्हणून रुक्मिणीने नुसते सासूबाई म्हणून नव्हे, तर गुरू म्हणून राधेच्या पायावर डोके ठेवले पाहिजे."[१३] अशा संवादांतून रुक्मिणीच्या कृष्णावरील एकनिष्ठ व निस्सीम प्रेमाची खात्री वृद्ध गोपाळाला पटते व तो मूळ रूपात प्रकट होतो.

राधा ही कृष्णाची गुरू होती, ही कल्पना एकूण नाट्यकथावस्तूशी तसा कसलाही संबंध ठेवणारी नाही. तरीही खाडिलकरांनी देवीभागवतातील ही कल्पना स्वीकारून तिचा विकास केला आहे. यातूनच हा प्रसंग व अटीचा भाग नव्याने आला आहे. राधा-कृष्णाच्या संबंधावरील चर्चेमुळे रुक्मिणीचा गैरसमज झाला असल्यास तो दूर करावा म्हणून कृष्णाने योजिलेली ही जणू युक्तीच आहे. ही एक प्रेमकथा आहे हे लक्षात घेतल्यावर मग 'एका प्रेमिकाने एका प्रेमिकेजवळ स्वतःविषयीचे लोकापवाद दूर करण्याचा प्रयत्न करणे' असे स्वरूप या प्रसंगाला प्राप्त होते. म्हणून हा भाग या नाटकातील प्रेमकथेशी सुसंगत ठरतो. प्रेमकथेचा एक भाग बनतो.

'लोकजागृती हे कलेचे प्रयोजन आहे' असे मानणाऱ्या खाडिलकरांनी या प्रसंगाचा दुसऱ्याही एका अर्थाने विचार केला आहे. लो. टिळकांच्या राजकारणाचे खाडिलकर हे प्रचारक होते. टिळकांच्या राजकीय धोरणाच्या दृष्टीने कृष्णासारख्या राष्ट्रिय महापुरुषाचे लोकोत्तर चरित्र जनमानसासमोर आणून त्यांचा







राष्ट्राभिमान जागृत करणे आवश्यक होते. त्यासाठी पुराणे, संत, पंत आणि शाहिरी वाङ्मयातील कृष्णाला दूर सारणे तसेच ख्रिश्चन धर्मप्रचारातून उभी केली जात असलेली कृष्णाची मलिन प्रतिमा बदलवणे लोक-जागृतीच्या दृष्टीने अत्यावश्यक बाब होती. मूळच्या कृष्णचरित्रावर दुराचाराचे हे जे किटण चढले होते ते साफ करून शूर, वीर, तेजस्वी कृष्ण जनमानसावर बिंबवणे आवश्यक होते. हा मुळी त्यांच्या राष्ट्रवादी राजकारणाचा एक भागच होता.

'राधेला कृष्ण गुरू मानत होता' या मूळ घटकाला विकसित करून हा वरवर नैतिक वाटणारा पण मूलतः राजकीय अर्थ, कृष्णाच्या या उदात्ती-करणातून सुसंगत रीत्या प्राप्त करून दिला आहे. कारण, हा नवा अर्थ स्वतंत्रपणे आपल्याला जाणवत नाही, प्रेमकथेचा मूळ भाग बनवूनच खाडिलकरांनी तो उभा केला आहे. कला व प्रचार यांना एकजीव केले आहे.

लेखात उदाहरणादाखल घेतलेल्या किंवा न घेत-लेल्या विसाव्या शतकातील या नाटकांतून कृष्णाचे उदात्तीकरण करण्याच्या अनेक क्लृप्त्यांचा नाटक-कारांनी उपयोग करून घेतलेला दिसतो. राधेला पतिव्रता तरी दाखवणे, कृष्णाची भगिनी दाखवणे, गुरू दाखवणे, राधा व गोपी यांना कृष्णकथेतून वगळूनच टाकणे, नाटकातील इतर पात्रांकरवी नैतिक दृष्टीने राधा-कृष्णांची स्तुती करणे वा त्या दोघांनी स्वमुखानेच स्पष्टीकरण देणे आणि 'कालिया मर्दन'-सारख्या पौराणिक घटकाचा राधाकृष्णांची उच्च नैतिकता सिद्ध करण्यासाठी उपयोग करणे.

राधा-कृष्णकथेकडे राष्ट्रवादाचे साधन म्हणून पाहिल्याने अर्थातच 'स्वयंवर' सारखा अपवाद वगळता सर्व नाटके कलाविहीन व सामान्य दर्जाची ठरली आहेत. तरीही १९४० पूर्वीचा पौराणिक नाट्य वाङ्मयाचा इतिहास लक्षात घेताना या वैशिष्ट्यपूर्ण व वेगळ्या प्रवृत्तीचा विचार करणे महत्त्वाचे ठरते.

## संदर्भ–टीपा

१. श्रीनिवास मधुसूदन पिंगे : युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा; श्री. म. पिंगे, औरंगाबाद १९६०; पृ. २६०–२६१.
२. विठ्ठल भार्गवराम वरेरकर : सं. कुंजविहारी; नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई; १९५६; पृ. ४१.
३. कित्ता : पृ. ५१
४. कित्ता : पृ ५९; ६०; ६१
५. कित्ता : पृ. ७४
६. कित्ता : पृ. ७६–८७
७. यशवंत नारायण टिपणीस : राधा-माधव; नरहर शंकर जोशी; १९१४ प्रस्तावना.
८. कित्ता : पृ ५३–५४
९. विठ्ठल सीताराम गुर्जर : संगीत नंदकुमार; वि. सी. गुर्जर; १९२५; पृ. ५३.
१०. कित्ता : पृ. २–३
११. कित्ता : पृ. ५९
१२. कित्ता : पृ. ६३–६४
१३. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर : संगीत स्वयंवर; १९१६; पृ. ८०–८१.










# अनुमानातील विरोधाभास

मूळ लेखक : होरेस फ्रीलँड जडसन

(अनुवाद : अ. ना. ठाकूर)

विविध विज्ञानशाखांची भविष्य काळात काय परिस्थिती असेल, त्यांचे स्वरूप कसे असेल, याविषयी अनुमान करण्याचे प्रयत्न होत असतात. विज्ञानाच्या भवितव्यात अशा तऱ्हेने डोकावण्याचा प्रयत्न केला की, लगेच आपल्याला विरोधासाला तोंड द्यावे लागते. 'कोणत्याही' गुंतागुंतीच्या ऐतिहासिक प्रक्रियेच्या भावी स्थितीविषयी खोलात जाऊन भाकीत करण्याचा प्रयत्न केला, तर तो एक धाडशी वा वृथाभिमानी प्रयत्न ठरतो. कारण तो आनुमानिक अथवा आधार नसलेला प्रयत्न असतो. हा कार्यकारणभाव म्हणजे विरोधाभास बारकाईने तपासून पाहायला हवा. विज्ञानातील धाडशी प्रयत्नांमधील महत्त्वाचे पण बरेचसे संदिग्ध असलेले काही मुद्दे याद्वारे उघड होतात. आणि यातून विपरीत रीतीने आपली कोठल्यातरी विकासाच्या टप्प्याकडे वाटचाल होते. याचा अर्थ भावी काळात विज्ञानविकासाचे अमुक अमुक टप्पे लागतील, अशी अपेक्षा तेवढी आपण बाळगू शकतो; कारण ही अपेक्षाही अगदी खात्रीशीर असेलच असे नाही.

अर्थात भविष्यातील काही परिस्थितींविषयी भाकीत करणे शक्य असते. पैकी काही बऱ्याच गुंतागुंतीच्या परस्परक्रिया होऊन निर्माण झालेल्या असतील. सर आयझॅक न्यूटनच्या (१६४२–१७२७) काळापासून सूर्यकुलातील कोठल्याही खस्थ पदार्थाचे स्थान अनुमानाने काढता येणे शक्य झाले होते. या खस्थ पदार्थांत केवळ ग्रह व उपग्रहच येतात असे नाही; तर त्यांमध्ये धूमकेतू, मुख्यत्वे मंगळ व गुरू यांच्या कक्षांमधील पट्ट्यात आढळणारे छोटे किंवा लघु-ग्रह, अवकाशयाने आणि जिच्या कक्षेचा काही भाग ठरविता येऊ शकतो अशी कोणतीही वस्तू याही येतात. या स्थानाची अचूकता वापरण्यात येणाऱ्या उपकरणावर अवलंबून असते. अल्बर्ट आइनस्टाइनच्या (१८७९–१९५५) काळापासून अशा अनुमानांतील सूक्ष्म त्रुटी दूर होऊन ती अधिक परिशुद्ध वा अचूकपणे करता येऊ लागली. याचे अगदी ठळक उदाहरण म्हणजे बुधाच्या कक्षेत १०० वर्षांमध्ये पडणारी ४३ सेकंदांची (कोनीय) तफावत (विचलन) ही होय. अनुमानात इतकी अचूकता आलेली पाहून आश्चर्य वाटणे साहजिकच होते.

न्यूटनच्या नियमांच्या आधारे शेकडो वर्षे लोकांनी पुढील विधान गृहीत धरलेले होते : विश्वातील सर्व पदार्थांची केवळ एका क्षणी असलेली स्थाने व गतिमार्ग माहीत होऊ शकले, तर तत्त्वतः म्हणजे आकडेमोड करण्याची क्षमता असल्यास भावी काळातील एका विशिष्ट क्षणाला यांपैकी प्रत्येक पदार्थ कोणत्या स्थितीत असेल, याचे अनुमान करता येऊ शकेल. अशा तऱ्हेने एकूणएक पदार्थांविषयी असे अनुमान करणे शक्य होईल.

या संदर्भात पृथ्वीचे हवामान हा एक अगदी क्षुल्लक (किरकोळ) घटक-समुच्चय आहे व त्याविषयी बिनचूकपणे भाकीत करणे शक्य होत नाही. विश्वाचे व्यवहार अगदी घड्याळाप्रमाणे म्हणजे नियमितपणे, बिनचूकपणे व एकसारखेपणे चालू असतात, या विश्वाविषयीच्या न्यूटनप्रणीत मताविरुद्धचा हा ठोस पुरावाच आहे. निरीक्षण व गणन करणाऱ्या उपकरणांच्या व्यावहारिक मर्यादा पुष्कळच आहेत, हे खरे; तथापि या मर्यादा हे या अनुमानातील अपयशाचे एकमेव कारण नाही. वातावरणातील प्रत्येक रेणूची मूळ स्थिती अथवा वातावरणाच्या काहीशे किलोमीटरपर्यंत पसरलेल्या भागाची साधारण स्थितीही खात्रीशीरपणे जाणून घेणे शक्य होत नाही. या अनुमानाला याहून अधिक मूलभूत अशी पुढील मर्यादाही पडते : वातावरणात गुंतागुंतीच्या हालचाली होत असतात, त्यांना आपण खळबळ वा क्षोभ म्हणतो; त्यांमध्ये अतर्क्यता किंवा अप्राक्कथनीयता हा यदृच्छया घडणारा किंवा हिशेबात न घेता येणारा एक अपरिहार्य

अनुक्रमणिका






घटक असतो. वातावरणातील हालचालींचे विवरण करणाऱ्या न्यूटनच्या समीकरणांचा हा परिणाम आहे. गणिताच्या भाषेत या समीकरणांना नैकघाती समीकरणे म्हणतात. म्हणजे या समीकरणांमधील राशींचा घात एक असतो व त्यांचा आलेख म्हणजे सरळ रेषा असते. 'पाऊस पडण्याची ७० टक्के शक्यता' अशा प्रकारच्या संख्याशास्त्रीय अनुमानांचा वा भाकितांचा आधार घेणे वातावरणविज्ञानाच्या बाबतीत भागच असते. तथापि नैकरेषीय समीकरणे लावता येणारा वातावरण हा काही एकमेव आविष्कार नाही किंवा सर्वांत गुंतागुंतीची प्रणालीही नाही.

न्यूटनीय पद्धतीने अनुमाने करताना आणखी एक अडचण येते. म्हणजे अशा अनुमानांत योगायोगाने घडणाऱ्या वा यदृच्छ घटनांचा अंतर्भाव करून घेता येत नाही. न्यूटनीय पठडीच्या भौतिकीच्या संदर्भात सापेक्षता सिद्धान्त हा स्थितिशील किंवा रूढिप्रिय ठरला; मात्र पुंजयामिकी (क्वांटम मेकॅनिक्स) मात्र खरोखर क्रांतिकारक संकल्पना होती, असे खुद्द आइन्स्टाइनचे मत होते. अर्थात हा विषय आता भौतिकीत रुळून गेला आहे. म्हणजे अणू किंवा त्याचे घटक यांच्याएवढ्या सूक्ष्म आकारमानाच्या पातळीवर घडणाऱ्या सर्व भौतिकीय घटनांमध्ये योगायोग हे एक अविभाज्य वा अपरिहार्य अंग असते, हे पुंजयामिकीच्या संकल्पनेने उघड झाले. याही बाबतीत अडचण आहे ती तात्त्विक स्वरूपाची; उपकरणे अथवा प्रयोग यांच्या संबंधातील ही अडचण नाही. एखाद्या कणाचे स्थान व वेग ही दोन्ही अचूकपणे माहीत होणे शक्य नसते, असे हायझेनबर्गचे अनिश्चितता तत्त्व मानते. यदृच्छेचा अथवा योगायोगाचा हा नियम आणवीय पातळीवरच्या क्षेत्रांमध्ये सर्वत्र लागू पडतो. उदाहरणार्थ, भेदक कण वा किरण बाहेर टाकणाऱ्या म्हणजे किरणोत्सर्गी मूलद्रव्याचा अर्धायुकाल आपण अचूकपणे सांगू शकतो. याचा अर्थ म्हणजे या मूलद्रव्याच्या तुकड्यातील निम्म्या अणूंचा किरणोत्सर्गाद्वारे ऱ्हास होण्यासाठी किती कालावधी लागेल हे बिनचूकपणे सांगता येते. मात्र संपूर्ण द्रव्याच्या ऱ्हासाविषयीचे बिनचूक अनुमान करणे शक्य होत नाही. तसेच एखादा विशिष्ट अणू केव्हा फटकन निघून जाईल, हे काही कळू शकत नाही. खेळ अथवा अवकाशयान यांच्याविषयीची अनुमाने रोज केली जातात. त्यांच्यावर अशा पुंजयामिकीय अनिश्चिततांचा परिणाम होत नाही, हे जरी खरे असले तरी त्यांच्यावर इतर अनिश्चित बाबींचा परिणाम होतच असतो.

या संदर्भात पुढील उदाहरणाचा दाखला देता येऊ शकेल. मेंदूसारखी कोणतीही एक अतिशय गुंतागुंतीची यंत्रणा विचारात घेतली, तर तिच्या वर्तनाविषयी निदान तत्त्वतः तरी खुद्द तिच्याहून कमी गुंतागुंतीच्या कोठल्याही एखाद्या अन्य साधनाने वा युक्तीने अनुमान करता येऊ शकेल का? अथवा मेंदूचे कार्य वा वर्तन हे त्याच्यापेक्षा कमी गुंतागुंतीच्या प्रयुक्तीने समजून घेण्याजोगते असेल की नाही? १९५० च्या सुमारास जॉन फोन नॉयमान या गणित्याने एका व्याख्यानमालेत हे प्रश्न प्रथम उपस्थित केले होते. त्याच्या या व्याख्यानमालेचा विषय होता 'कॉम्प्लिकेटेड ऑटोमेटा' हा. टप्प्याटप्प्याने देण्यात येणाऱ्या सूचनांशिवाय काम करणारी यांत्रिक युक्ती वा साधन (मानवसदृश यंत्र) असा या विषयाचा मथितार्थ होता. या विषयाच्या नावातून स्वयंमार्गदर्शक प्रयुक्तींकरिता आवश्यक असलेली सुस्पष्ट तार्किक कृत्ये व घटक यांचा निर्देश व्हावा अशी त्याची अपेक्षा होती. ही कृत्ये व घटक यांचा पारिभाषिक अर्थ पुरेसा व्यापक वा सार्वत्रिक असा गृहीत धरला होता. त्यामुळे संवेदनशील व स्वयंचलित घटक असलेल्या संगणकांप्रमाणेच ही कृत्ये व घटक ही सजीवांच्या बाबतीतही लागू पडण्यासारखी होती. स्वयंचलित अथवा दूरवर्ती नियंत्रणाने चालविण्यात येणारे एखादे बरेच गुंतागुंतीचे यंत्र वा साधन हे खुद्द त्याच्याएवढ्या साध्या असलेल्या त्याच्या कोणत्याही कृत्याचे कोणतेही परिपूर्ण, लिखित स्वरूपातील वर्णन उपलब्ध करून देणे शक्य नाही, असा विलक्षण इशारा त्याने दिला होता. या संदर्भात त्याने माणसाएवढ्या बारकाईने एखादा दृश्य आकृतिबंध जाणून घेणाऱ्या साधनाचे वा यंत्राचे उदाहरण दिले होते. याकरिता डोळ्याची कृतिशील वा चालू प्रतिकृती व याच्याशी निगडीत असलेला मेंदूचा इष्ट भाग तयार करणे, हा अशा तऱ्हेचे या आकृतिबंधाचे संवेदन (वा जाणीव) स्पष्ट करून दाखविण्याचा सर्वांत सोपा मार्ग आहे, असे नॉयमानचे ठाम म्हणणे होते. ही प्रतिकृती व दुसरी प्रतिकृती बनविण्याच्या सूचनांची यादी यांच्यावर लक्ष केंद्रित करणे हा त्याच्या इशाऱ्यामधील पुढचा टप्पा आहे. (अर्थात सजीवांच्या

जनुकांमध्ये म्हणजे आनुवंशिक लक्षणे एका पिढीतून पुढच्या पिढीत नेणाऱ्या गुणसूत्रांमधील घटकांमध्ये अशा सूचना असतात). परंतु आकृतिबंधाचे संवेदन हे दृष्टीचे केवळ एक अंग आहे; दृष्टी हे मेंदू व मज्जासंस्था यांचे केवळ एक कार्य आहे आणि अखेरीस मज्जासंस्था हे चलनवलन करणाऱ्या व स्वतः प्रजोत्पादन करणाऱ्या प्राण्याचे एक अंग असते. शास्त्रज्ञ सध्या अशा प्रणाली विशद करण्याचा मुख्यत्वे प्रयत्न करीत आहेत. आणि अशा तऱ्हेच्या गुंतागुंतीच्या पातळ्यांवर संभाव्य स्पष्टीकरणांचे स्वरूप आमूलाग्रपणे बदलून जात असते, असाही इशारा नॉयमानने दिला होता.

नेमका याच बाबतीत भौतिकी व जीवविज्ञान यांच्यामध्ये सर्वांत अधिक मूलभूत प्रकारचा भेद आहे. स्पष्टीकरणाचे स्वरूप आणि योगायोगाचा भाग या बाबतींतील हा भेद आहे. महोत्स्फोटाने म्हणजे 'बिग बॅंग' नावाने ओळखण्यात येणाऱ्या महाप्रचंड स्फोटाने या विश्वाची सुरुवात झाली व तेव्हापासून विश्वाचे प्रसरण होण्यास सुरुवात झाली, असे बहुतेक विश्वनिर्मितिशास्त्रज्ञ गृहीत धरतात. आणि या स्फोटानंतरच्या क्षणापासून या जड वा भौतिकीय विश्वातील सर्वसाधारण रूपे हल्लीच्या स्थितीपर्यंत उत्क्रांत होत गेली; उलगडत गेली आहेत. विश्वाविषयीच्या या सिद्धान्ताशी तुल्य अशा सिद्धान्ताचा दावा जीवविज्ञानाच्या क्षेत्रात करण्यात येत नाही. जीवाची उत्पत्ती झाल्यापासून ते आताच्या जीवापर्यंत उत्क्रांतीची प्रक्रिया घडत आली आहे. उत्क्रांतीच्या वाटचालीच्या प्रत्येक टप्प्याच्या वेळी तेव्हा जिवंत असलेल्या जीवांमध्ये योगायोगाने म्हणजे यदृच्छया नवनव्या संभाव्य घटना उद्भवल्या. जिवंत असणाऱ्या जीवांमधूनच नैसर्गिक निवड होऊ शकते. आणि हे जीव कोणते असतील हे त्या आधी झालेली उत्परिवर्तने (म्हणजे काही आनुवंशिक लक्षणांमध्ये अचानकपणे होणारे बदल) तसेच आधीच्या जीवांचा निर्वंश होण्याची घटना यांच्यावर अवलंबून असते. उत्परिवर्तनाने जीवांमधील विविधता किंवा विविध प्रकारच्या जीवांची संख्या वाढते; तर एखाद्या जातीचे विलुप्तीभवन वा निर्वंश होण्याने याउलट परिणाम होतो. पण उत्परिवर्तन केवळ योगायोगानेच घडते. कालिदासाचा एखादा ग्रंथ घेतला व त्यावर झाडलेली बंदुकी गोळी त्यातून आरपार गेली तर त्यातील जे शब्द नाहीसे होतील त्यांच्या अर्थांशी बंदुकीच्या गोळीला काही देणेघेणे असणार नाही, हे उघडच आहे. त्याचप्रमाणे उत्परिवर्तनांचा उत्क्रांतीच्या वाटचालीवर परिणाम होतो. ज्वालामुखीतून बाहेर पडणारा लाव्हाप्रवाह अथवा आकाशातून होणारा अशनींचा वर्षाव यांच्याप्रमाणेच विलुप्तीभवन हे एकंदरीने योगायोगाने घडत असावे. जर खरोखरच असे घडले असेल, तर डायनोसॉर अवतरून निर्वंश झाल्यामुळे पृथ्वी सस्तन प्राण्यांच्या दृष्टीने अधिक सुरक्षित बनली असेल. जर जीवोत्पत्तीच्या वेळी असलेल्या त्याच परिस्थितीपासून पुन्हा उत्क्रांतीची सुरुवात झाली, तर तिच्याद्वारे आतापेक्षा वेगळे जीव उत्क्रांत होण्याची शक्यता आहे. विशिष्ट स्तरावर जीवविज्ञानात करण्यात येणारी अनुमाने व भौतिकीमधील अनुमाने यांच्या जातकुळीतच असा भेद असतो. म्हणूनच डार्विनने जीवविज्ञानामध्ये इतिहास आणला म्हणजे योगायोगाच्या, आकस्मिक गोष्टींचा घटनांचा अभ्यास आणला, असे म्हटले जाते.

भविष्याच्या उदरात काय दडले आहे किंवा भावी काळात काय उमजणार आहे, हे जाणून घेण्याचे ज्ञान किंवा माहिती आज आपल्यापाशी उपलब्ध असते, हा विज्ञानांमधील अनुमानांमध्ये असलेला विरोधाभास आहे. वर्तमान काळातले अज्ञान, मूढता वा अविवेक याची जाणीव प्रत्यक्षात बोथट करण्याचे काम तेवढे सध्याच्या या विचारसरणीद्वारे केले जाते. हा या काळाचा महिमा म्हणता येईल. संशोधनासाठी लागणारे अनुदान मिळविण्यासाठी जो अर्ज करावा लागतो तो अर्ज म्हणजे या म्हणण्याचे धडधडीत कुख्यात उदाहरण म्हणता येईल. कारण आपल्या संशोधनासाठी लागणारी आर्थिक मदत मंजूर करून घेण्यासाठी अशा अर्जामध्ये शास्त्रज्ञांना आपण पुढे काय शोधून काढणार आहोत, हे माहीत असल्याचे ढोंग करावे लागते. ही अडचण भासते तेवढी काही वरवरची नाही. तर उलट हा प्रश्न अधिक गंभीर स्वरूपाचा व खोलवर पाळेमुळे गेलेला आहे. संगीतकाराविषयीचा पुढील दाखला याला चपखलपणे लागू पडेल असा आहे. एखाद्या संगीतकाराला अथवा संगीत रचनाकाराला तो पुढील वसंत ऋतूमध्ये रचणार असलेली संगीतिका आताच शिटीवर (शीळ घालून) वाजवून दाखवायला सांगण्यासारखेच या अडचणीचे स्वरूप आहे. जर त्या संगीतकाराला उत्स्फूर्तपणे रचना करण्याची दैवी देणगी लाभलेली असेल,

तर तो निदान या संभाव्य संगीतिकेशी तुल्य वा तिच्यासारखा तोंडवळा असलेले काहीतरी कर्णमधुर संगीत सादर करूही शकेल. कारण अशा सिद्धहस्त कलाकाराचे तंत्र व शैली ही प्रस्थापित झालेली असतात. ज्याची सर्वसाधारण रूपरेषा आधीच आखलेली आहे त्यात तपशील भरण्याचे काम हे सोपे असते. यापेक्षा अधिक अवघड काम करायला एखाद्या शास्त्रज्ञाला सांगितले किंवा एखादा असामान्य शोध लावण्याची विनंती त्याला केली तर काय होईल ? अशा कामाच्या वा शोधाच्या समयबद्ध कार्यक्रमासाठी व अखेरीस त्याच्या पूर्ततेसाठी शास्त्रज्ञाला योगायोगावर अथवा आकस्मिक घटनांवर अवलंबून राहावे लागेल. सारासार बुद्धी वा तारतम्य असलेले शास्त्रज्ञ आपापल्या क्षेत्रातील अत्याधुनिक मतमतांतरे आपल्या निदर्शनास आणून देऊ शकतात. तसेच खासकरून त्या वेळी घडून येऊ शकणाऱ्या सर्वाधिक संभाव्य घटना अथवा लगोलग जाणून घेण्याची आवश्यकता असणारे प्रश्न यांची जाण त्यांना नक्कीच असू शकते. उदाहरणार्थ, आधीच चालू असलेल्या विकासविषयक कामाचे वर्णन एखादा अभियंता करू शकेल; त्या कामाचा तपशील देऊ शकेल आणि त्याद्वारे काल नवीन असलेल्या विज्ञानाचे येत्या वर्षातल्या नव्या तंत्रज्ञानात परिवर्तनही करू शकेल. याचा अर्थ लगोलग कोणती गोष्ट करता येण्यासारखी आहे, हे तो त्याच्या शब्दांत सांगू शकेल. तथापि हा काही येऊ घातलेल्या विज्ञानाचा आशय वा तपशील आहे, असे म्हणता येणार नाही. त्याकरिता विज्ञानाच्या प्रगतीतील महत्त्वाचा टप्पा ठरेल अशा क्रांतिकारी शोधाचे भाकीत करायला हवे. या शोधामुळे गोंधळात टाकणाऱ्या एखाद्या प्रश्नाचे उत्तर मिळते. उदाहरणार्थ, किरणोत्सर्गाचा वा पल्सारचा शोध. यांच्यामुळे एक नवीन दृष्टी प्रचलित होते. अशा शोधांकरिता इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शक, द्रव्यमान वर्णपटदर्शक, रेडिओ दुर्बीण यांसारख्या प्रयोगांमध्ये उपयोगात आणावयाच्या नवनवीन तंत्रांची गरज असते; त्यांच्यासाठी क्वार्क या मूलकणसदृश कल्पनांची वा अनुमानांची गरज असते. अशा सनसनाटीच्या ठरणाऱ्या महत्त्वपूर्ण शोधांचे भाकीत करणे शक्य नसते.

अशा तऱ्हेने विज्ञानाच्या भवितव्यात डोकावून बहुतेकांना काही गोष्टी जाणून घेण्याची इच्छा असते. मात्र या गोष्टी ह्या छपून राहिलेल्या सर्वांत अज्ञात गोष्टी ठरल्याचा अनुभव येतो. माणसाला विज्ञानाची भुरळ सदासर्वकाळ पडत आलेली दिसते आणि अशा गूढ गोष्टी हे त्यामागील एक महत्त्वाचे कारण आहे. यालाच झाक बार्झुन याने एकदा "परमोच्च मनोरंजन" असे संबोधिले होते. असे असले तरी याहून कमी दर्जेदार असलेली अन्य भाकिते असू शकतात. जर त्या भाकितांमुळे आपले समाधान होण्यासारखे असेल, तर तसे करून घेता येणे शक्य असते. मात्र अशी भाकिते वा अनुमाने ही भावी काळातील विज्ञानाविषयीच्या आशयाशी वा त्याच्या अंतरंगाशी निगडित नसतात. त्यांच्यामुळे विज्ञानाचे केवळ बाह्यस्वरूप वा रूपरेषा स्पष्ट होऊ शकते; अंतरंगाचे स्वरूप नव्हे.

सध्या विज्ञानविषयक अनेक प्रभावी मतप्रवाह आहेत. यांपैकी एक मतप्रवाह हा सर्वसामान्यपणे आढळणारा व सर्वांत जास्त कुतूहल जागृत करणारा आहे. तो असा : अलीकडच्या काळापर्यंतचा विचार केल्यास वैज्ञानिक क्रांती व तिचे आनुषंगिक तंत्रविद्याविषयक परिणाम यांचा माणसाच्या जड व बाह्य परिस्थितीवर प्रभाव पडलेला दिसतो. उलट, येऊ घातलेल्या काळातील विज्ञानाचे माणसाच्या अंतर्गत म्हणजे सामाजिक परिस्थितीवर परिणाम होऊ शकतील आणि ते अधिकाधिक जाणून घेण्याची धडपड करणे शक्य आहे. माणसाच्या सामाजिक परिस्थितीत होणारे हे स्थित्यंतर अनेक प्रकारे स्पष्ट होईल. पृथ्वीचा भौतिकीय (जड) व भौगोलिक दृष्टींनी करावयाचा अभ्यास जवळजवळ संपलेला आहे. म्हणजे पृथ्वीचे अधिकाधिक सखोल समन्वेषण करण्यात आले असून तिचे तपशिलवार नकाशे तयार करण्यात आलेले आहेत. आता पृथ्वीचा अवास्तव लाभ उठविण्याचे अधिकाधिक मार्ग धुंडाळले जात आहेत. याचा अर्थ खाणकामाचे प्रमाण वाढते आहे; अधिकाधिक जमीन लागवडीखाली आणली जात आहे आणि अर्थातच संख्यावाढीमुळे मानवी वस्तीचे क्षेत्र वाढत आहे. अशा तऱ्हेने जगाचे स्वरूप अधिकाधिक नागरी होत चालले आहे आणि वाढत्या प्रमाणात पृथ्वी हा ग्रह केवळ मानवी प्राण्यासाठी आहे, अशी स्थिती निर्माण होत आहे. बाह्य पर्यावरण वा परिस्थितीकडून अंतर्गत सामाजिक परिस्थितीकडे एक स्थित्यंतर होत असून यासारखे दुसरे स्थित्यंतरही होत असलेले दिसते. अतिशय विकसित अशा भौतिकीय







विज्ञानांकडून सामाजिक परस्परक्रियांचा अभ्यास करणाऱ्या विज्ञानांकडे संशोधक वळत आहेत, हे ते दुसरे स्थित्यंतर होय. यामध्ये सामाजिक मानसशास्त्राकडून संशोधक आपले लक्ष लोकसंख्याशास्त्राकडे वळवत असल्याचे आढळते. याकरिता मज्जासंस्थाविज्ञानातील प्रमुख तत्त्वाचा आधार घेण्यात येतो. अर्थात येथे नमूद केलेल्या विज्ञानाच्या विविध शाखा अजून त्यांच्या बाल्यावस्थेत आहेत, हे लक्षात घेतले पाहिजे.

विज्ञानातील विचारांचे एकत्रीकरण किंवा संयोजन (युनिफिकेशन) हा हल्लीचा दुसरा मतप्रवाह असून ते वैज्ञानिक विचारांच्या वाटचालीतील प्रौढत्वाचे दुसरे लक्षण मानतात. विज्ञाने ही एकत्रीकरण करण्यासारखी असावीत हे १९४०–५० दशकापर्यंत वैज्ञानिक उद्दिष्ट होते. असे वैश्विक वा सार्वत्रिक एकीकरण साध्य करता येण्यासारखे आहे, या कल्पनेकडे आता केवळ एक टूम म्हणून कोणी पाहात नाही. तसेच केवळ उत्सुकतेपोटी कल्पिलेले ते एक साध्य आहे, असेही कोणी मानीत नाही, तर एक वास्तव स्थिती म्हणून आता एकीकरणाकडे पाहिले जाऊ लागले आहे.

तथापि असाधारण व अनपेक्षित अशी ठरावीकच एकीकरणे घडून येताना दिसतात. यांपैकी भौतिकी, जीवविज्ञान आणि बोधनिक मानशास्त्रज्ञ यांच्यात होत असलेली एकीकरणे सर्वाधिक महत्त्वाची आहेत.

भौतिकीमधील महान एकीकृत सिद्धान्तांची अधिक माहिती अलीकडच्या काळातच झाली आहे. या सिद्धान्तांच्या आधारे निसर्गातील चार मूलभूत प्रेरणांपैकी विद्युतचुंबकीय आणि दुर्बल व प्रबल अणुकेंद्रीय या तीन प्रेरणांचे एकीकरण झाल्यासारखे दिसते आहे. उरलेली चवथी गुरुत्वीय प्रेरणा यांमध्ये समाविष्ट करणे हे शास्त्रज्ञांपुढे असलेले यानंतरचे साध्य आहे आणि यामुळे या सिद्धान्तांतील कळसाध्याय गाठला जाणार आहे. मात्र यासाठी गुरुत्वाकर्षणाविषयीचा पुंजसिद्धान्त पुढे येणे अतिशय आवश्यक आहे. कारण चार मूलभूत प्रेरणांच्या एकीकरणाची ती पूर्वअट आहे. अशा सिद्धान्ताची सिद्धी ही आतापर्यंत गोंधळात टाकणारी वा फसवी गोष्ट ठरली आहे. परंतु भौतिकीतील एकत्रीकरणात अनपेक्षित ठरलेला हा मुद्दा एकत्रीकरणाच्या अन्य सिद्धान्तांत विचारात घेता येऊ शकेल वा अंतर्भूत करता येईल. अणूपेक्षा लहान असलेल्या सर्वांत सूक्ष्म कणांच्या पातळीवर घडणाऱ्या घटना व त्यांच्यामधील परस्परसंबंध या बाबीचा सैद्धान्तिक व प्रायोगिक दृष्टीनेही अभ्यास करण्यावर त्यांनी आपले लक्ष केंद्रित केले आहे. असे असूनही सर्वांत सूक्ष्म पातळीवरच्या या प्रश्नाची उत्तरे शोधून काढताना या प्रयत्नांच्या जोडीनेच विश्वाची उत्पत्ती व स्वरूप या सर्वांत व्यापक आविष्कारांविषयीच्या प्रश्नांच्या उत्तरांचाही विचार करणे आवश्यक झाले असल्याचे दिसते. अशा तऱ्हेने विश्वातील द्रव्य आणि ऊर्जा यांची झालेली वाटणी समजून घेण्यासाठी अणुकेंद्रांना बांधून ठेवणाऱ्या प्रेरणांची स्पष्टीकरणे समजून घेणे आवश्यक झाले आहे. आणि जेव्हा ही गोष्ट लक्षात येते तेव्हा भौतिकी हा विषय तत्त्वमीमांसेच्या पातळीवर येऊन ठेपतो.

जीवविज्ञानातही एकीकरणाची संकल्पना येत असल्याचे दिसते; मात्र तिला विशेष प्रसिद्धी मिळालेली नाही. जीवविज्ञानातील एकीकरणाचा तोंडवळा वा रूपरेषा ही भौतिकीतील एकीकरणासारखी आहे, ही आश्चर्यकारक गोष्ट आहे. म्हणजे जीवविज्ञानात जीवाचा सूक्ष्म घटक असलेल्या पेशीच्या कार्याविषयीचे तातडीने सोडवायचे असलेले प्रश्न आणि जीवोत्पत्तीविषयीचे सर्वाधिक व्यापक व दीर्घसूत्री (दीर्घ काळ लागणारे, वेळखाऊ) प्रश्न यांचे एकीकरण करण्यासंबंधी विचार करण्यात येत आहे. जीवविज्ञानाच्या अभ्यासकांपुढे दोन मुख्य प्रश्न असून त्यांची उत्तरे मिळविण्यासाठी शास्त्रज्ञ गेली तीन शतके प्रयत्न करीत आहेत. मात्र या प्रयत्नांना मर्यादितच यश आलेले दिसते. यांपैकी पहिला प्रश्न हा जीवाचा विकास (वृद्धी) व विभेदन यांच्याविषयीचा आहे म्हणजे फलित अंड्याचे (वा अंडाणूचे) बहुपेशीय व विभेदित प्रौढ जीवामध्ये कशा प्रकारे रूपांतर वा परिवर्तन होते? सतराव्या शतकात विल्यम हार्वीने (१५७८–१६५७) या प्रश्नाचे विवेचन करणारा एक ग्रंथ लिहिला होता. उलट, हा प्रश्न सुटू शकेल असे न वाटल्याने टॉमस हंट मॉर्गन (१८६६–१९४५) या शास्त्रज्ञाने विसाव्या शतकाच्या प्रारंभीच या प्रश्नाकडे पाठ फिरविली. पुनश्च १९७० च्या सुमारास हा प्रश्न सहजपणे सुटू शकेल अशी आशा रेणवीय जीववैज्ञानिकांना वाटली होती. मात्र त्यांचा हा मोठाच भ्रम ठरला. गुणसूत्रांद्वारे आनुवंशिक लक्षणे एका पिढीतून पुढच्या पिढीत नेली जातात आणि जनुके माळेतील मण्यांप्रमाणे गुणसूत्राचे







अनुक्रमणिका

घटक असतात. या जनुकाचे (जीनचे) स्थान व अभिव्यक्ती यांचे नियमन सूक्ष्म, अगम्य व बहुव्यापक ( सर्वसमावेशक ) अशा प्रणालीद्वारे होत असते. १९७० च्या सुमारास ही प्रणाली उमगण्यास नुकतीच कोठे सुरुवात झालेली होती. याविषयीच्या तर्काधिष्ठित आवश्यक बाबी उघड झाल्यासारख्या वाटत होत्या; मात्र या प्रणालीचा तपशील वा आशय याविषयी संदिग्धताच अधिक होती. भौतिकीच्या तुलनेत जीवविज्ञानातील परिस्थिती उलटी होती. म्हणजे जीवविज्ञानातील सूक्ष्म पातळीवरचे प्रश्न पूर्णतया का समजून घेता येत नाहीत ? हा प्रश्न होता. तसेच या प्रश्नामागील एखाद्या तर्कशुद्ध कार्यकारणभावाची कल्पना करता येऊ शकत नाही. तथापि असे असूनही २००१ सालीही या विषयाला पूरक ठरतील अशाच नवनवीन गोष्टी आपल्यासमोर येत राहतील, अशी भीती आहे.

जीवविज्ञानामध्ये सूक्ष्म पातळीवरचा प्रश्न प्रमुख आहे. याचा अर्थ जीवविज्ञानातील दुसरा प्रमुख प्रश्न हा भौतिकीमधल्या विश्वस्थितिशास्त्राविषयीच्या व्यापक प्रश्नाशी तुल्य असा असू शकेल. अर्थात हा प्रश्न उत्क्रांतीविषयीचा असून त्यासाठी उत्क्रांतीचा एक परिपूर्ण सिद्धान्त कुशलतेने तयार करून काळजीपूर्वक रीतीने मांडण्याची गरज आहे. उत्क्रांती कोणत्या त्वरेने वा वेगाने होत गेली, याचा रास्त खुलासा या सिद्धान्तातून झाला पाहिजे. सरतेशेवटी जातीच्या उत्क्रांतीचे म्हणजे एकीपासून नवीन जाती निर्माण होण्याचे अधिक चांगले स्पष्टीकरण या सिद्धान्ताकडून अपेक्षित आहे. 'ओरिजीन ऑफ स्पिसीज' (जातीचा विकास) या चार्ल्स डार्विनच्या पुस्तकाच्या शीर्षकातच असे स्पष्टीकरण आलेले दिसते. मात्र तदनंतर याहून अधिक भरीव काम काही होऊ शकले नाही, ही वस्तुस्थिती आहे. पुरेशा प्रमाणात बदललेला म्हणजे नवीन जातीचा जीव अवतरण्यासाठी पुढील गोष्ट घडून यावी लागत असण्याची शक्यता शास्त्रज्ञांनी व्यक्त केली होती. अशा जीवातील सर्व जनुकांच्या अभिव्यक्तीच्या पद्धतीवर नियंत्रण ठेवणाऱ्या यंत्रणांमध्ये उत्परिवर्तने किंवा आकस्मिक फेरफार होण्याची आवश्यकता असते. जर ही प्रक्रिया अशाच प्रकारची असल्याचे प्रत्ययास आले, तर अधिक उच्च श्रेणीच्या जीवांमधील आनुवंशिक ( वा जननिक ) विभेदनाचा पहिला प्रश्न सुटण्याचा मार्ग खुला होईल. शिवाय त्याचबरोबर उत्क्रांतीविषयीच्या परिपूर्ण सिद्धान्ताच्या दृष्टीने आवश्यक असणारी एक यंत्रणाही यामुळे उपलब्ध होईल. अर्थात असे प्रयत्न करताना जीवोत्पत्तीचा प्रश्न बाजूला पडण्याची शक्यता नाकारता येत नाही. हा मुद्दा भौतिकीमधील पुंज-गुरुत्वाच्या अडचणीसारखा आहे असे म्हणता येईल.

बोधीय (कॉग्निटिव्ह) मानसशास्त्र ही मानसशास्त्राची नवीन शाखा आहे. या शाखेत अनुभवजात वास्तव ज्ञानार्जनाचा अभ्यास करण्यात येतो; तसेच जाण व कार्यकारणभाव यांचाही या अध्ययनात अंतर्भाव असतो. मानसशास्त्राच्या या शाखेची बाह्य रूपरेषा पाहिली, तरी या शाखेत पुढील प्रकारचे एकत्रीकरण होण्याची एकूणच गरज आहे असे म्हणता येते : मानसिक व्यवहार तसेच त्यांतून होणारे वर्तन आणि मज्जासंस्थेविषयीचा आधारभूत सिद्धान्त यांच्यामध्ये असे एकत्रीकरण होणे अपेक्षित आहे. यासाठी दोन अंगांनी प्रयत्न होणे आवश्यक आहे. खुद्द मज्जा–जीवविज्ञानातच (न्यूरोबायॉलॉजीतच म्हणजे मज्जासंस्थेचा शारीर, क्रियाविज्ञान व विकारविज्ञान या दृष्टींनी करण्यात येणाऱ्या अभ्यासातच) तीव्रपणे जाणवणारे काही प्रश्न असून ते जीवाचा विकास व विभेदन यांविषयीचे म्हणजे जनुकांच्या अभिव्यक्तीवर असणाऱ्या नियंत्रणाविषयीचे आहेत. उदाहरणार्थ, मज्जासंस्थेतील परस्परक्रिया जीवात कशा विकसित होतात ? त्यांतील दुव्यांचे जाळे कसे निश्चित होते ? वगैरे प्रश्न व त्यांची उत्तरे जाणून घेणे ही एक बाजू झाली. तर भाषाशास्त्राच्या अभ्यासाविषयीचा नवीन दृष्टिकोण हे या प्रयत्नांचे दुसरे अंग असू शकेल. यामध्ये विशेषकरून मुले भाषा कशी ग्रहण करतात, या प्रश्नाचे उत्तर जाणून घेणे अगत्याचे आहे. याचा संबंध पुनश्च जीवाच्या मज्जासंस्थेच्या विकासाशी व विभेदनाशी येईल, हे उघडच आहे. परिणामी गुंता वाढतच जाईल. अशा प्रकारे बोधीय मानसशास्त्रातील संभाव्य एकीकरणाचे बाह्य स्वरूपही अजून स्पष्ट झालेले दिसत नाही. असे एकीकरण पूर्णरूपात साध्य करता आले, तर त्यात अनेक प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे सामावलेली असतील. यांपैकी पुष्कळ प्रश्न असे आहेत की, ज्यांच्यात परस्परसंबंध असलाच तर तो अगदी दूरान्वयाने असल्याचे सध्यातरी दिसते आहे.



अनुक्रमणिका

हल्लीच्या पुंजयामिकीपलीकडील नवीन पुंजयामिकी आणि विश्वस्थितिशास्त्रापुढील सर्वांत महत्त्वाचे प्रश्न यांतील एकत्रीकरण, उत्क्रांतीविषयक सिद्धान्ताचे रेणवीय जीवविज्ञानाबरोबरचे एकीकरण आणि मज्जाजीवविज्ञानाचे विकासात्मक जीवविज्ञानाशी एकीकरण तसेच या दोन्हींचे संवेदन (जाणीवविषयक) व बोधीय मानसशास्त्राशी होऊ घातलेले एकीकरण ही तीन महत्त्वाची संभाव्य एकीकरणे होत. या तीन एकीकरणांचा विस्तार प्रगल्भावस्थेतील भौतिकी या विज्ञानापासून झाला असून अधिक नवीन परंतु अतिशय झपाट्याने प्रगत होत असलेल्या जीवविज्ञानाच्या मार्गाने यांची वाटचाल बाल्यावस्थेतील मानसशास्त्रापर्यंत येऊन ठेपली आहे. या सर्व ज्ञानशाखांना गुंतागुंतीच्या प्रणालींच्या संदर्भात फोन नॉयमानने दिलेला धोक्याचा इशारा लागू पडतो. म्हणजे यांविषयीच्या संभाव्य स्पष्टीकरणांचे स्वरूप बदलते राहील. म्हणजे जी काही अनुमाने करता येऊ शकतील, त्यांच्याविषयी पूर्ण खात्री देता येणार नाही. याचा अर्थ आपण बहुतेकजण ज्या प्रश्नांची उत्तरे शोधू इच्छितो, ते प्रश्नच अजून स्पष्टपणे आपल्यापुढे आलेले नाहीत. आणि हाच येऊ घातलेल्या विज्ञानविषयक अनुमानांमधला विरोधाभास आहे व तो भावी विज्ञानांच्या स्वरूपाचे निदर्शक लक्षण आहे.

याशिवाय आणखी एक विरोधाभास पुढीलप्रमाणे आहे. भौतिकी हे विज्ञान पूर्णपणे प्रस्थापित झालेले आहे, असे शंभर वर्षांपूर्वीच वाटले होते. परंतु त्या वेळी या विषयात घडून आलेल्या क्रांतीमुळे या समाधानाचा पार चक्काचूर झाला. त्यामुळे हल्ली कोणताही शास्त्रज्ञ अशा तऱ्हेने आत्मसंतुष्ट राहण्यास धजावत नाही. याची दोन कारणे सांगता येतील. एक म्हणजे विज्ञानाच्या प्रगतीचा वेग प्रचंड असून तो अजून वाढतोच आहे. म्हणजे नव्या विज्ञानातून नवी तंत्रे पुढे येतात आणि त्यांच्या मदतीने संशोधनाची नवीन साधनसामग्री व उपकरणे बनविणे शक्य होते. कलेच्या क्षेत्राप्रमाणे नवीन गोष्टींचा विज्ञानावरही धक्कादायक परिणाम होतो. शास्त्रज्ञ आत्मसंतुष्ट न राहण्याचे हे दुसरे कारण आहे. थोडक्यात, सापेक्षतावाद व पुंजयामिकी, रेणवीय जीवविज्ञान, महोत्स्फोट, विश्वस्थितिशास्त्र, भूपट्ट सांरचनिकी (प्लेट टेक्टॉनिक्स म्हणजे खंड, महासागर, पर्वतरांगा, ज्वालामुखी वगैरेंची उत्पत्ती विषद करणारी संकल्पना) या गोष्टी त्या त्या वेळी क्रांतिकारक वाटल्या होत्या व त्यांनी त्या त्या विषयात खळबळ उडवून दिली होती, हेही खरेच ! परंतु आता त्यांच्याकडे मागे वळून पाहिले असता असे म्हणणे भाग आहे : प्रत्यक्ष क्रांती ही घटनाच आता तेवढीशी क्रांतिकारक राहिलेली नाही !










अनुक्रमणिका





# गोरिला : एक आदिम मिथ्य

एस. डी. इनामदार

जी. ए. कुलकर्णी यांची 'गोरिला' ही कथा ('सांजशकुन' या कथासंग्रहात समाविष्ट) अनेक दृष्टींनी वैशिष्टयपूर्ण आहे. मानवी श्रद्धेची निरर्थकता व फोलपणा 'एका देवाचा मृत्यू' यासारख्या त्यांच्या कथेतून व्यक्त झाला आहे; तर श्रद्धेचे विकृत, अघोरी व हिंसक रूप 'गोरिला' या कथेतून प्रकटले आहे.

पण श्रद्धेचे हिंस्र स्वरूप दर्शविणे, हे तिचे एक अंग झाले. शिवाय ह्या कथेच्या रूपाने जी. एं. नी एक नवी स्वतंत्र 'मिथ्य' घडवली आहे. सृजनात्मक पातळीवर हे फार मौलिक योगदान आहे. शिवाय ही कथा म्हणजे जणू जिवंत, सूक्ष्म स्पंदनांनी थरथरणारे एक रोमहर्षक, प्राचीन विधियुक्त 'मूकनाटय' (पॅन्टोमाइम) आहे. ह्या कथेला एक झपाटणारी दृश्य लय आहे व त्या लयीनेच कथेला हे मूकनाटयात्म रूप दिले आहे.

या पार्श्वभूमीवर 'गोरिला' या कथेचा स्थूल घटनाक्रम व अन्य तपशील काहीशा विस्ताराने तपासून पाहता येतील.

घटनाक्रम असा--

(१) अरण्यात हिरव्या गर्द झाडीने वेढलेले एक प्राचीन मंदिर. आत भग्न मूर्ती व सर्वत्र विखुरलेले विच्छिन्न शिल्पांचे अवशेष. सर्वत्र भेसूर विध्वंसाची अवकळा आहे.

(२) रानातून झाडांच्या फांद्या मोडत हिंडणाऱ्या गोरिलाला या मंदिराचा अचानक शोध लागतो. आत शांत गारवा व सुरक्षित निवारा आहे. त्याला 'घर' सापडल्याचा आनंद होतो. ते त्याचे आश्रयस्थान होते.

(३) तो पायऱ्या चढून वर चौथऱ्यावर जातो. तेथील भग्न अवशेष हाताच्या फटकाऱ्याने खाली ढकलून देत तो चौथरा साफ करतो व त्या चौथऱ्यावर स्थानापन्न होतो. तेथून दृष्टी टाकली, की सारे भव्य मंदिर हातात आल्यासारखे वाटते. 'मंदिर' हे एका विशाल प्राचीन व आदिम अशा भग्न परंतु अवशिष्ट संस्कृतीचे व 'चौथरा' हे तशाच आदिम प्राथमिक पातळीवरचे सत्तेचे सूक्ष्म व अव्यक्त प्रतीक असावे, असे लक्षात येते.

(४) केवळ वेळ घालवण्यासाठी म्हणून तो एकदा रानात पडलेला झाडाचा एक मोठा ओलसर ओंडका घेऊन येतो व दखवखलेल्या सुळचांनी तो ओरबाडत त्याचे लचके तोडत त्याला एक विलक्षण व विक्षिप्त आकार देतो. हाच पुढे आदिमानवांचा देव बनतो. (त्या केसाळ उग्र गोरिलाच्या शेजारी तो एखाद्या रानटी दासाप्रमाणे शोभतो).

आता या ठिकाणी गोरिला व त्याने अभावितपणे घडवलेला आदिवासींचा ओबडधोबड, विलक्षण आकाराचा देव या तपशीलांचा जरा बारकाव्याने विचार करू :

'गोरिला' हा नर-वानर गणातील (प्रायमेट्स) मानवसदृश कपी. नर-वानर गणातील पाँजिडी कुलात चिंपँझी, गोरिला, ओरँगउटान ह्या मानवसदृश कपींच्या जातींचा समावेश होतो. मानवाच्या उत्क्रांतीमध्ये क्रमविकासाच्या दृष्टीने ह्या वानरांना फार महत्त्व आहे. शरीररचना, शरीरक्रिया व मनोरचना या तिन्ही बाबतींत त्यांचे मानवाशी खूपच जवळचे साम्य आहे. गोरिला हा पूर्णपणे शाकाहारी. केवळ फळे, पाने आदींवर गुजराण करणारा. गोरिला वानर हे चेहऱ्यावर प्रसंगानुरूप आनंद, भीती, काळजी, हल्ला-संकटे यांची चाहूल दाखवणारे भाव दर्शवू शकतात. त्यांची एक चित्कारांची भाषा असते व वेगवेगळे आवाज काढून ते विविध भाव व्यक्त करू शकतात. ते सहसा शांत स्वभावाचे व एकान्तप्रिय असतात. पण डिवचताच एकदम आक्रमक होतात. ते केसाळ असून त्यांना माणसांसारखे पाय असतात व ते जमिनीवर चालण्यासाठी पायांचा उपयोग करतात. अशा सर्व प्राणिशास्त्रीय सत्यांचा व खुब्यांचा वापर जी. एं. नी या कथेत मोठचा मार्मिकपणे करून घेतला आहे. पण मुख्यतः गोरिला हे मानवपूर्व पण मानवसदृश प्राणिजीवनाचे व संस्कृति-

अनुक्रमणिका








पूर्व पशुपातळीवरील प्राथमिक अवस्थेचे प्रतीक म्हणून – आदिमानवी, आद्यतन (प्री-मॉडियल) अशा संस्कृतीच्या पूर्वावस्थेचे द्योतक म्हणून – उपयोजिले असावे, असे वाटते. गोरिला हे मध्य आफ्रिकेच्या जंगलात आढळतात. गोरिलाने घडवलेल्या ओबडधोबड विक्षिप्त (ग्रॉटेस्क) आकाराचे (देवमूर्तीचे) आफ्रिकेतील आदिम निग्रो जमातीने घडवलेल्या ओबडधोबड व भेसूर मूर्तिशिल्पांशी व मुखवटयांशी, त्याच्या वर्णनशैलीवरून, साधर्म्य दिसून येते. ही गोष्टही आदिम संस्कृतिसदृश वातावरणनिर्मितीच्या दृष्टीने सूचक आहे. तेव्हा गोरिलाची जमात ही मानवपूर्व आद्य प्राणिसृष्टीची; कथेतील आदिवासींची टोळी ही प्राथमिक व आद्यतन मानवसंस्कृतीची; तर भग्न मंदिर व मूर्तिशिल्पांचे विच्छिन्न अवशेष हे अशा आद्यतन संस्कृतीचे नष्ट व भ्रष्ट रूप दर्शविणारे प्रतीक– अशी ही विविध प्रतीकरूपे मानता येतील. गोरिला हा मानवसदृश, मानवपूर्व प्राणी; तर आदिमानव ही नंतरची उत्क्रांतावस्था, असे एक सांस्कृतिक संक्रमण या कथेची पार्श्वभूमी म्हणून येते.

आता गोरिलाने ओंडक्यातून देवमूर्ती घडवण्याची केलेली कृती ही अगदी अहेतुक व वेळ घालवण्यासाठी केलेली आहे. त्यातून मूर्ती घडते ती अभावितपणेच. ह्या कृतीत जराही श्रद्धेला थारा नाही, की भाविकतेचा लवलेश नाही. आणि त्यातूनच पुढे आदिवासींचा देव घडतो. तेव्हा ह्यातून हेच सूचित होते, की मानवाचा देव हा त्याच्याही पूर्वी केवळ एका अपघाती योगायोगातून, यदृच्छेनेच अस्तित्वात आला. तो एका मानवपूर्व पण मानवसदृश प्राण्याने अहेतुक कृतीतून, क्रीडेतून घडवला आहे. ही ईश्वरनिर्मिती संस्कृतिपूर्व पशुपातळीवरची आहे. श्रद्धा व कर्मकांडे ही आदिमानवाने नंतर त्यावर लादली. आणि ही श्रद्धा सात्त्विक वा आस्तिक्यभावाची निदर्शक नव्हे; तर श्रद्धेचे अघोरी, हिंसक व विकृत रूप दर्शवणारी आहे. पशुबळीकडून नरबळीकडे असा या आदिम श्रद्धेचा प्रवास होत गेला आहे, हे कथा जसजशी पुढे सरकते, तसे जाणवते. कथेच्या घटनात्मक व दृश्यात्मक विकासक्रमातून हा प्रवास उलगडत जातो.

(५) मंदिरातील गोरिलाच्या संथ व सुरक्षित जीवनाला एक दिवस तडा जातो. मंदिराच्या महाद्वारातून हातात भीषण आयुधे घेतलेली अनेक धिप्पाड कृष्णवर्णी माणसे आत प्रवेश करतात. हीच आदिवासींची टोळी होय. ह्या आगमनप्रसंगी केलेले वर्णन सूचक आहे. प्रवेशद्वारालगत वाढलेली दाट झाडीझुडपे आदिवासी तोडतात व मार्ग स्वच्छ, साफ करतात. त्या प्रसंगाचे वर्णन असे : ‘ हिरवट अंधुकता नाहीशी होऊन कितीतरी शतकांत प्रथमच स्वच्छ सूर्यप्रकाश आत कोसळला व वाहत मंदिराच्या सभामंडपातील मुख्य मार्गावर पसरला.’ ह्या वाक्यातला ‘ कितीतरी शतकांचा ’ कालदर्शक तपशील ‘ संस्कृतीच्या संक्रमणावस्थेचा–मानवपूर्ण प्राणिसृष्टीतून आदिमानवी प्राथमिक संस्कृतीच्या उदयाचा काळ–सूचक आहे. (प्रकाश कोसळला, वाहत पसरला– ही प्रतिमा दृश्याची गतिमानता दर्शवते).

मंदिरात आदिवासींची टोळी आपल्या नायकासह प्रवेश करते व हळूहळू मंदिराचा कब्जा घेते. ते मंदिर झाडूनपुसून स्वच्छ करतात. ( ‘चौथऱ्याच्या असंख्य पायऱ्यांवरील शतकानुशतकांची धूळ त्यांनी झाडून टाकली.’ यातला कालनिदर्शक तपशीलही सांस्कृतिक संक्रमण सूचित करतो.) आदिवासी चौथऱ्यावर देवाच्या ओबडधोबड मूर्तीची प्रतिष्ठापना करतात. त्याच्यापुढे वाद्यघोष करत नतमस्तक होतात. त्याला फळांचे नैवेद्य दाखवतात. मंदिरातील गोरिलाचे स्वामित्व व वर्चस्व हळूहळू नष्ट होऊ लागल्याची चाहूल त्या प्रसंगातून लागते.

(६) हळूहळू मंदिरातील ही माणसांची वर्दळ नित्याची होते. आदिवासींच्या उपासनेला नित्य कर्मकांडाचे व धार्मिक विधीचे स्वरूप प्राप्त होते. त्यात ओंडक्याची ‘ देव ’ म्हणून विधियुक्त प्रतिष्ठापना व दरवर्षी प्रतिष्ठापनेचा उत्सव केला जातो. भेरी व चर्मवाद्यांचे घोषनाद आणि त्या लयीच्या साथीवर नृत्ये केली जातात. काळ्याकभिन्न पहाडी चेहऱ्यांची धिप्पाड माणसे चर्मवाद्यांच्या साथीवर घुमू, हुंकारू लागतात. डोलू लागतात.

आता ह्या कर्मकांडातून श्रद्धेला विकृत रूप कसे लाभत जाते, तेही पाहता येईल.

ओंडक्याच्या मूर्तीला सुरुवातीला फळांचा शाकाहारी नैवेद्य दाखवला जातो. मग एक दिवस भाजलेली मेंढी व बैलाचे डोके वाहिले जाते. हा पशुबळी. नंतर ज्या गोरिलाने ओंडक्यातून हा देव घडवला, त्या गोरिलाचाच बळी देवापुढे विधिपूर्वक दिला जातो. हा मानवसदृश पशूचा बळी. नंतर प्रतिवर्षी मूर्तीच्या

अनुक्रमणिका

प्रतिष्ठापनेचा उत्सव साजरा केला जातो. आणि त्यात एकेक गोरिला विधिपूर्वक बळी दिला जातो. हळूहळू गोरिलांची जमात, ह्या बळी-विधीमध्ये नामशेष होत जाते. आणि एक दिवस असा येतो, की आता बळी देण्यासाठी गोरिला उरलेला नाही. तेव्हा चर्मवाद्य वाजवणारा म्हातारा केसाळ वादक हुबेहूब गोरिलासारखाच दिसतो आहे, हे टोळीच्या नायकाच्या लक्षात येते आणि गोरिलाच्या जागी देवापुढे त्या म्हाताऱ्या वादकाचाच बळी दिला जातो. हा पहिला नरबळी. आणि आता दरवर्षी मूर्तीच्या प्रतिष्ठापनेच्या उत्सवात एकेक नरबळी दिला जाणार, हे सूचित करणारे नर्म औपरोधिक वाक्य कथेच्या अखेरीस येते : 'आता त्याच्या ( नायकाच्या ) चेहऱ्यावर समाधान दिसत होते व डोळ्यांत कृतकृत्यतेची चमक होती. आता या मंगल दिवशी पुरवठ्यासाठी अडून राहावे लागणार नाही, असा बळींचा साठा त्याला सापडला होता.

आणि गोरिला आता कायमचा माणसात आला होता.'

तेव्हा 'नरबळींचा कधीही न संपणारा साठा' टोळीच्या नायकाला गवसला 'आणि गोरिला कायमचा माणसांत आला,' हे पशुबळीची जागा नरबळीने घेतल्याचे सूचक वाक्य आहे. श्रद्धेचा अघोरीपणा, विकृती व विरूपीकरण ह्यांचीही सूचकता ह्या वाक्यात आहे. तेव्हा एकीकडे मानवपूर्व गोरिला ( पशुपातळीवरील प्राथमिक संस्कृतिपूर्व जीवन ) ते आदिमानवी रानटी टोळी ( आद्यतन मानवसंस्कृती; मानवी संस्कृतीची प्रारंभावस्था ) असे सांस्कृतिक स्थित्यंतर आहे. 'मंदिर' हे ज्या पार्श्वभूमीवर ही सांस्कृतिक स्थित्यंतरे घडतात, असे विश्वसृष्टीचे (कॉसमॉस) विशाल रूपक; तर 'चौथरा' हे त्या सृष्टीवरील अधिसत्तेचे रूपक असा प्रतीकात्मक अर्थही कथेतून निष्पन्न होऊ शकतो. मंदिरावर सत्ता काबीज करणारा पहिल्यांदा चौथऱ्यावर स्थानापन्न होतो. मंदिरात चौथरा हा साम्राज्याच्या सिंहासनासारखा आहे. पहिल्यांदा त्यावर गोरिलाची सत्ता असते. नंतर टोळीचा नायक ते काबीज करतो. धर्मविधीच्या बहाण्याने तो गोरिलांची जमातच नष्ट करतो. एकीकडे हे अशा प्रकारचे सत्ता, संस्कृती यांचे स्थित्यंतर आहे; तर दुसरीकडे मानवी श्रद्धेचे सात्त्विकतेपासून ( फळांचा नैवेद्य ) ते पशुबळीपर्यंत ( मेंढी, बैल, गोरिला ) आणि पशुबळीपासून ते नरबळीपर्यंत (गोरिलासारखाच दिसणारा व बळीवेदीवर गोरिलाची जागा घेणारा म्हातारा केसाळ वादक व ही प्रथा पुढे चालू राहील हे सूचित करणारा 'बळींचा साठा') होत गेलेले स्थित्यंतर आहे. ते जास्त अघोरी, अमानुष व भयप्रद आहे. श्रद्धेचे हे विकृतीकरण व विरूपीकरण मानवी संस्कृतीच्या उत्क्रांतावस्थेच्या, विकासाच्या पार्श्वभूमीवर दाखवले आहे. 'गोरिला' या मिथ्यकथेचे सामर्थ्य व श्रेष्ठत्व ह्या गंभीर उपरोध–व्यंजनेत ( आयरनी ) सामावलेले आहे.

पुढचा घटनाक्रम--

(७) आदिवासींनी देवमूर्तीपुढे ठेवलेल्या फळांच्या टोपल्या आपल्यासाठीच आहेत, असे गोरिलाला वाटते व तो मोठ्या आनंदाने व अधाशीपणे फळांचा फडशा पाडतो. ( 'समोर फळांच्या टोपल्या पाहताच त्याचे रानवट केसाळ अंगच सारे एक भूक बनून गेले व त्याने अधाशाप्रमाणे एक टोपली उचलून आपले दात तिच्यात रोवले'). असे बरेच दिवस चालते. फळांनी भरलेल्या टोपल्या गोरिला फस्त करतो, रिकाम्या टोपल्या पायऱ्यांवर ठेवतो. पुन्हा फळांनी भरलेल्या टोपल्या येतात. एक दिवस भाजलेली मेंढी व बैलाचे डोके पायऱ्यांवर दिसताच गोरिला शिसारी येऊन लाथेने ते उडवून लावतो (गोरिला जमात शाकाहारी असल्याच्या वस्तुस्थितीचा मार्मिक निर्देश). पण एकूणच त्या मंदिरातले गोरिलाचे जीवन स्थिरावून सुखावले आहे. रोज सकाळी आदिवासी येऊन त्या ओंडक्याच्या देवाची पूजा करतात. ह्या पूजाविधीच्या वेळी गोरिलाला एका अंधाऱ्या कोनाड्यात लपून अंग अवघडून उभे राहावे लागते. एवढा 'काच' सोडला, तर त्याच्या आयुष्याला बोटभरही 'कोस' नव्हता.

(८) पण गोरिला एक गोष्ट जाणतो की, 'वैभवाचा आनंद ते इतरांनी पाहण्यात, त्याबद्दल त्यांनी मत्सरी होण्यात असतो.' म्हणूनच तो आपल्या इतर गोरिला बांधवांना त्या मंदिरात आणून आपले वैभव दाखवतो. त्यांतला एक गोरिला चौथऱ्यावर येऊन दिमाखात अंग पसरू लागताच, मूळ गोरिला कर्कशपणे आरोळी ठोकत, चौथऱ्यावर उडी घेऊन त्या गोरिलाला अणकुचीदार नखांनी ओरबाडून तिथून उठवतो व त्या चौथऱ्यावर ताबा मिळवतो. इथे 'चौथरा' हे सत्तेचे, स्वामित्वाचे प्रतीक बनते. ते जणू मंदिराच्या साम्राज्याचे सिंहासन बनते. त्या चौथऱ्यावर






गोरिला पहिल्यांदा स्थानापन्न होतो, तेव्हा तेथून दृष्टी टाकली की सारे भव्य मंदिर हातात आल्यासारखे गोरिलाला वाटते, ह्यातले मर्म ह्या स्वामित्वभावात आहे. आणि दुसरा गोरिला तिथे पाय पसरू लागताच हा मूळ गोरिला त्याच्यावर हल्ला चढवतो व त्याला ओरबाडून तिथून हाकलून लावतो. त्याला आपले सारे वैभव आपल्या मित्रांना दाखवायचे आहे; पण त्यावर सत्ता आपलीच आहे, ह्याविषयी जराही शंका उरू द्यायची नाहीय अशा रीतीने चौथरा हे सत्तेचे प्रतीक बनते. पुढेही गोरिलाला बळी दिल्यावर आदिवासी टोळीचा नायक त्या चौथऱ्यावरच आपली सत्ता प्रस्थापित करतो. त्याला त्याचे टोळीचे नायकत्व टिकवून ठेवण्यासाठी बळींची परंपरा चालू ठेवणे भागच आहे. गोरिला संपल्यावर पशुबळीचे नरबळीत जे रूपांतर होते, त्यालाही सत्ता टिकवण्याचा संदर्भ आहे. असेच सत्ताकांक्षेचे भव्य रूपक आदिवासींची टोळी व त्या टोळीचे नायकपद हे आशयसूत्र असलेल्या 'कळसूत्र' या दृष्टान्तकथेत आहे. आणि 'स्वामी' या कथेत तळघरात कोंडलेल्या पांथस्थाला स्वामी बनवून त्या स्वामीच्या नावे मठाची सत्ता राबवणाऱ्या महंताच्या प्रतीकातही आहे. 'विदूषक' या कथेतील दरबारी कपटनाटयही राजकीय महत्त्वाकांक्षेतूनच घडते. एका मर्यादित अर्थाने, जी. एं.च्या ह्या सर्व कथा म्हणजे राजकीय रूपककथा (पोलिटिकल ॲलिगरीज) म्हणता येतील.

(९) तेवढयात माणसांची चाहूल लागल्याने भयभीत झालेले बाकीचे गोरिला पळून जातात. आणि मूळ गोरिला मात्र आपले स्थान व सत्ता न सोडता तिथेच राहतो.

(१०) त्याच्या हालचालींवर दबा धरून बसलेली माणसे नजर ठेवून असतात व तो पायरीवर ठेवलेली फळांची टोपली उचलत असतानाच त्याला कैद करतात.

(११) गोरिला पकडला जातो व त्यानेच ओंडक्यातून खोदलेल्या मूर्तीपुढे त्याचाच विधिपूर्वक बळी दिला जातो. हाही एक उपरोधगर्भ व शोकात्म व्यंजनेचा आविष्कार म्हणता येईल. ज्याने देव घडवला, त्याचाच बळी त्या देवापुढे दिला जातो. प्रतीकात्मक पातळीवर मूळ धर्मसंस्थापकाची शिकवण त्याचेच कट्टर अनुयायी जास्त भ्रष्ट करतात; दया व शांती ह्यांची शिकवण देणाऱ्या धर्माचा प्रसार तलवारीच्या जोरावर केला जातो, ह्यातली उपरोधगर्भ व्यंजना ह्याच जातकुळीची आहे. तिथे तत्त्वे बळी दिली जातात व कर्मकांडांचे स्तोम माजवले जाते.

अशा रीतीने मूळ गोरिला नंतरच्या गोरिलांच्या बळीप्रथेचा पहिला बळी ठरतो. पुढे दरवर्षी एकेक गोरिला बळी जात जात अरण्यातली ती जमातच नामशेष होते. अशा रीतीने तो केवळ स्वतःच बळी जात नाही; तर समूळ वंशविच्छेदालाच जबाबदार व कारणीभूत ठरतो. त्याची फळांची व सुखासीनतेची हाव, सत्ताकांक्षा व सुरक्षिततेची भ्रामक कल्पना—(रानावनातल्या मोकळ्या वातावरणात मुक्त स्वच्छंदीपणे भटकण्यापेक्षा त्याला मंदिरात, चौथऱ्यावर व वेळप्रसंगी अंधाऱ्या कोनाड्यातही जास्त सुरक्षित व सुखासीन वाटते) — ह्या भ्रामक समजुती त्याला स्वहत्येला व वंशहत्येला उद्युक्त करतात.

(१२) गोरिलाला बळी दिला जातो व त्याला एक विधी (रिच्युअल)चे रूप दिले जाते, त्याचे वर्णन पुढे आले आहे. टोळीचा नायक व त्याचे सेवक हातांत भाले घेऊन त्याचे वार गोरिलाच्या शरीरावर करीत, त्याच्या शरीरात भाले खुपसून त्याला ठार मारतात. ह्या विधीप्रसंगी आदिवासींनी झगझगीत लाल रंग फासून सर्वांगे रंगवलेली असतात. डोळ्यांखाली पांढरे पट्टे ओढून गालांवर लाल रंगांत डोळ्यांच्या आकृती रंगवलेल्या असतात. चर्मवाद्ये वाजत असतात, त्यांच्या धुंद तालावर ते हातात भाले घेऊन गोरिलाभोवती फेर धरून नाचू लागतात. नायकाचा चेहरा पूर्ण रंगवलेला व गळ्यात सिंहाच्या दातांची माळ असते. जेरबंद गोरिलावर भाल्याने पहिला वार करण्याचा अग्रहक्काचा मान त्याचा असतो. त्याच्या मागोमाग त्याचे अनुयायी भाल्यांचे वार करतात व गोरिलाला ठार मारतात. गोरिलाचे वाहणारे रक्त कासवाच्या उलटया पाठीमध्ये साठवले जाते व त्या रक्ताने ओंडक्याला स्नान घातले जाते. रक्ताने न्हालेला तो ओबडधोबड ओंडका 'एखाद्या शापित राक्षसिणीच्या अवेळ गर्भासारखा' दिसतो. हा रक्तलांछित देव व त्याच्या पुढे दिल्या जाणाऱ्या बळीचा अघोरी धर्मविधी हा संस्कृतीच्या आद्यकाळातील रानटी अवस्थेचा प्रत्यय देतात. मग महाद्वारापुढे पटांगणात पेटलेल्या अग्नीच्या ज्वाळांमध्ये

अनुक्रमणिका

गोरिलाचे मेलेले धड जाळले जाते. ह्या सर्व विधीला चर्मवाद्यांच्या धुंद नादाची व समूहनृत्याची लय आहे : 'आता भोवती चर्मवाद्याचा आवाज जास्त वेगाने ठसठसू लागला. ते वाजवत असलेल्या केसाळ पाषाणासारख्या दिसणाऱ्या वादकाला त्याची धुंदी चढू लागली आणि त्याच्या पिळदार अंगावरील स्नायू काळ्या मासोळ्यांप्रमाणे उसळू लागले... हातातले भाले नाचवत त्यांनी गोरिलाभोवती लंबवर्तुळाकार फेर धरला. चर्मवाद्याच्या नादाची लय वाढली... साकळलेल्या रक्तातील वेदनेप्रमाणे चर्मवाद्याचा ध्वनी मात्र अविरतपणे ठणकत राहिला... चर्मवाद्य जास्त वेगाने घुमू लागले. लाल अंगाची माणसे उभ्याउभ्याच डोलत हुंकारू लागली... नायकाने दोन्ही हात वर करून गुडघे टेकताच साऱ्यांनी गर्जना केली व त्या समुदायातील ताणलेल्या हुंकाराचे गीत मंदिर भरून वर जाऊ लागले...' अशा प्रकारे ह्या बळीच्या धर्मविधीला आदिवासी नृत्य-वादनाची साथ मिळाली आहे.

'वर सौम्य होत गेलेल्या त्या प्रकाशात निरामय राहिली ती ओंडक्याची भेसूर ओलसर लाल मूर्ती– निर्विकार, रक्तवर्णी, गूढ!'– हे त्या आदिवासींच्या देवाचे वर्णन आहे. अध्यात्माच्या परिभाषेत परमेश्वराला 'निर्गुण, निराकार' अशी विशेषणे लावली जातात. गूढ व निर्विकार हे त्याचे मानवी सृष्टीच्या व्यवहाराच्या संदर्भातले परवलीचे शब्द. प्रत्ययकारी अनुभव शब्दबद्ध करताना ते वापरले जातात. कारण बव्हंशी सामान्यजनांना स्वतःच्या सुखदुःखांच्या संदर्भात निर्विकार व अस्तित्वाच्या पातळीवर गूढ असाच परमेश्वराचा अनुभव येतो. तेव्हा या वर्णनात विशेष असे काही नाही. पण आदिवासी जीवनाच्या व श्रद्धेच्या पातळीवर 'बळीच्या रक्ताने न्हालेली व राक्षसिणीच्या अवेळ गर्भासारखी दिसणारी भेसूर व विक्षिप्त देवमूर्ती' ही कल्पना मात्र श्रद्धेच्या अघोरी कर्मकांडात्मक स्वरूपाचे व ऱ्हास-विकृतीचे अगदी निकराचे वर्णन म्हणता येईल.

(१३) मूर्तीच्या प्रतिष्ठापनेचा उत्सव दरवर्षी मोठ्या भक्तिभावाने साजरा केला जातो व तेच कर्मकांड मोठ्या श्रद्धेने केले जाते. ओंडक्यापुढे एकेका गोरिलाचा बळी दिला जातो, त्याच्या रक्ताने ओंडक्याला स्नान घातले जाते व मंदिराबाहेरच्या पटांगणातील धगधगत्या अग्निकुंडात गोरिलाच्या मृत देहाची आहुती दिली जाते. वर्षानुवर्षे व सातत्याने चालत आलेल्या ह्या प्रथेमुळे मंदिरासमोर राखेचा एक विस्तीर्ण ढिगारा साठला आहे व दरवर्षी ओतलेल्या रक्ताने ओंडका काळसर थरांनी माखला आहे. हळूहळू गोरिलांची संख्या कमी कमी होत ती जमातच नामशेष होत चालली आहे.

(१४) आणि मग उत्सवाचा एक दिवस असा येतो की, संपूर्ण अरण्यात एकही गोरिला सापडत नाही. गोरिलाच्या शोधार्थ, त्याला पकडण्यासाठी गेलेली एकेक पथके रिकाम्या हातांनी व हताश, निराश होऊन परत येतात. सारे उत्सवी वातावरण निर्जीव व अचेतन होऊन जाते. नायकाच्या मनात निराशा दाटून येते. त्याचे नायकपदही धोक्यात आल्याची आशंका त्याला भेडसावू लागते. ('आज जर ऐनवेळी गोरिला न मिळता हा पवित्र दिवस वाया गेला तर हस्तिदंतयुक्त मुकुट मिरवायला त्याला तोंड उरणार नव्हते'). अखेर सगळी पथके रिक्त हस्ताने परततात. कारण गोरिलाचा आता निर्वंश झाला आहे. ('आता सारे गोरिला चौरंगावर आडवे होऊन मंदिराबाहेरच्या धगधगत्या अग्नीत नाहीसे झाले होते.'). अशा रीतीने तो प्रतिष्ठापनेचा उत्सवच संपुष्टात येण्याची चिन्हे दिसू लागतात. कर्मकांडाच्या मार्गातच धर्मसंकट आडवे येते.

(१५) आणि अचानक चर्मवाद्याची लय वाढते. वादकाच्या रक्तातली परंपरेने चालत आलेली धुंदी एकदम त्याच्यावर अंमल गाजवते व परिस्थितीचा पूर्ण विसर पडून त्याचे चर्मवाद्य एकदम चढत्या लयीने वेगाने वाजू लागते. पूर्वी 'दुर्बल सर्पाने दंश करण्याचा प्रयत्न करावा' तसे निर्जीवपणे कातड्यावर पडणारे त्याचे हात आता एकाएकी 'कात टाकून बलवान झालेल्या सर्पाप्रमाणे विलक्षण गतीने' चर्मवाद्यावर हलू लागतात. चर्मवाद्याच्या या बदललेल्या लयीमुळेच नायकाचे लक्ष त्या वादकाकडे वेधले जाते. आणि तो केसाळ म्हातारा वादक हुबेहूब गोरिलासारखाच दिसतो आहे, हे त्या नायकाला जाणवते.

वादकाला रक्तातल्या धुंदीने साद घातली नसती, तर चर्मवाद्याची लय वाढली नसती व नायकाचे लक्ष त्याच्याकडे वेधले नसते. तो हुबेहूब गोरिलासारखा दिसतो आहे, हेही लक्षात आले नसते व गोरिलाच्या जागी त्याचा बळी गेला नसता.

मग ही 'रक्तातली धुंदी' आली कोठून? आणि चर्मवाद्याची लय एकाएकी का वाढली? – त्या वाद-





काने अभावितपणे नायकाचे लक्ष आपल्याकडे का वेधून घ्यावे ? — ही अभावित विनाशप्रवणता त्या वादकात कोठून आली ? — की वाद्याची धुंद लय जशी त्याच्या रक्तात होती, तशीच ही विनाशप्रवणताही होती ? वाद्याची आवेगी लय एकाएकी का वाढली, नायकाचे वादकाकडे का लक्ष गेले व त्याला (आणि त्याच्या अन्य अनुयायांनाही) त्याच्या जागी गोरिलाचा भास का झाला, हे तसे निरुत्तर करणारे प्रश्न आहेत. आणि 'असे का ?—' ह्याला समर्थनीय उत्तर नाही. उत्तर असलेच तर ते नियतितत्त्वाच्या आधारेच देता येईल. तो केसाळ वादक गोरिलाप्रमाणे दिसतो, हे साधर्म्य आजवर कोणालाच जाणवले नव्हते आणि बळी सापडला नाही, म्हणून त्याचा 'बदलीबळी' (स्केपगोट) करण्यात आला, हे लक्षात येते. तेव्हा गोरिलाप्रमाणेच गोरिला होऊन त्या वेदीवर बळी जाणे, ही त्या वादकाची नियतीच. तो वादकच का ? खुद्द तो नायक का नाही ? —बळी जाणे ही त्या वादकाची नियती आणि टोळीवर सत्ता गाजवणे ही त्या नायकाची नियती — हेच या प्रश्नाचे उत्तर असू शकते.

(१६) आणि वादक हा पहिला नरबळी. गोरिलाप्रमाणेच वंशविच्छेदाला कारणीभूत व जबाबदार ठरणारा पहिला नरबळी. त्या वादकाचे हातपाय बांधून त्याला हत्येसाठी चौरंगावर आडवे टाकताच, तिथल्या सगळ्याच आदिवासींना तो हुबेहूब गोरिलासारखाच दिसतो, हे एकदम जाणवते. अघोरी श्रद्धेचा हा सामूहिक अबोध मनाचाच आविष्कार म्हणता येईल का ?— पण हळूहळू ते सगळेच गोरिलासारखे दिसू लागतील, ह्यात शंका नाही. कारण 'आता या मंगल दिवशी पुरवठ्यासाठी अडून राहावे लागणार नाही असा बळींचा साठा सापडल्याचा' आनंद नायकाच्या विजयोन्मादाने फुललेल्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसतो आहे. 'गोरिला माणसात आला' ह्याचा अर्थ ह्या नरबळीला धार्मिक मान्यता व पावित्र्य प्राप्त झाले, असाही होतो.

'गोरिला'चा घाट एखाद्या धर्मविधियुक्त मूकनाट्यासारखा (पॅन्टोमाइम) आहे, हे पूर्वी सांगितले आहेच. ह्यात कुठेही संवाद नाहीत, केवळ दृश्य व ध्वनिसंवेदनांचा विलक्षण उत्कट प्रत्यय आहे. वेगवेगळे आवाज, आरोळ्या, चीत्कार, चर्मवाद्यांचे नाद, भेरींचे आघात, आदिवासींची नृत्ये व हुंकारगीते आहेत. गतिमान अशी दृश्यमालिका व विलक्षण परिणामकारक नाट्यमयता आहे. नाट्याची जी प्रयोगीय अंगे—रंगभूषा, वेशभूषा, नेपथ्य, पार्श्वसंगीत—ती इथे सुप्त व अध्याहृत रीत्या उपस्थित आहेत. ती कशी हे थोडे तपशीलात जाऊनही पाहता येईल.

प्राचीन मंदिर, भग्न मूर्ती, शिल्पांचे खंडित, विच्छिन्न अवशेष, अंधारे कोनाडे यांसारखे कथेतील वातावरणनिर्मिती करणारे घटक रंगमंचीय नेपथ्याचे कार्य करू शकतात. प्रकाशाचे सूक्ष्म बदलते प्रत्ययही कथेत ठिकठिकाणी विखुरले आहेत. उदाहरणार्थ, गर्द वृक्षराईमुळे मंदिरात येणारा शीतल, हिरवा प्रकाश ('तिथे वाढलेल्या गर्द वेलीझुडुपांमुळे त्यातून येणारा सूर्यप्रकाश फिकट हिरवा असून मंदपणे पसरून तो थोड्याच अंतरावर विरून जात होता—' ही प्रकाशाची सूक्ष्म प्रत्ययकारी जाणीव)... मग आदिवासी येऊन तिथली झाडीझुडपे तोडतात व मार्ग स्वच्छ करतात, तेव्हा मंदिरात येणाऱ्या प्रकाशातही बदल होतो. हिरवेपणा जाऊन स्वच्छ सूर्यप्रकाश मंदिरात येतो (भव्य महाद्वाराच्या तोरणापर्यंत वाढलेली झुडपे पाहता पाहता आडवी झाली आणि हिरवट अंधुकता नाहीशी होऊन कितीतरी शतकांत प्रथमच स्वच्छ सूर्यप्रकाश आत कोसळला व वाहात मंदिराच्या सभामंडपातील मुख्य मार्गावर पसरला)... मंदिराचे महाद्वार किंचित किलकिले होताच 'तेजस्वी खड्गाप्रमाणे प्रकाशाची उभी शलाका अंधार चिरत क्षणभरच आत' येते. आणि अंधाराची छाया मंदिराची दारे बंद होताच सर्वत्र पसरून राहते. हा झाला प्रकाशाचा प्रत्यय.

पण मुख्यत: या कथेतले चित्रदर्शी तपशील; गोरिलाच्या व आदिवासींच्या हालचाली, हावभाव, भावदर्शन, गोरिलांच्या व आदिवासींच्या समूहदृश्यांतली नाट्यमयता; आदिवासींची नृत्ये व वाद्ये; बारीकसारीक कृती व कृतींची गतिमान मालिका; नाट्यपूर्ण घटना व प्रसंग या सर्वांतून कथेचा मूकनाट्यात्मक घाट सिद्ध होतो.

प्राचीन भग्न मंदिरातील विच्छिन्न मूर्ती व शिल्पांचे सर्वत्र विखुरलेले अवशेष यातून एक विध्वंसाची अवकळा व उद्ध्वस्तता प्रत्ययास येते ('एखाद्या प्रचंड राक्षसाने आडदांडपणे पाय द्यावा अशी विध्वंसाची कळा सगळीकडे होती'). आणि अशा या भग्न व प्राचीन मंदिराच्या पार्श्वभूमीवर अजस्र छातीच्या केसाळ गोरिलाचे आगमन. कथेच्या सुरुवातीलाच ही विलक्षण दृश्यमयता





अनुभवास येते. 'गर्द झाडांच्या फांद्या बाजूला करीत, काही वेळा निव्वळ उत्साहाने त्या कडकन मोडत, अजस्र छातीचा केसाळ गोरिला मोकाट वाढलेल्या झुडुपांतून ओबडधोबडपणे पुढे जात होता.' मग ती मंदिरातली आश्रयाची जागा पाहून गोरिला 'हर्षाने थरारला. छातीवर मुठी बडवून' त्याने आपला आनंद व्यक्त केला. ह्या बारीकसारीक सूक्ष्म कृती व हालचालींमध्येही एक प्रकारची नाटयमयता व दृश्य संवेदना आहे. आता पुढील सूक्ष्म वर्णन व त्यातली प्रत्ययकारकता पहा : 'वाकलेल्या पाठीने पुढे जात, सैलावलेले हात गुडघ्याखालपर्यंत लोंबकळत गोरिला हर्षाने चीत्कारत सर्वत्र हिंडला. मध्येच तो एखादे भग्न मस्तक किंवा एखादा विच्छिन्न हात उचलून घेऊन पाहे, त्याच्या तोंडून कसला तरी अर्थहीन रानवट हुंकार बाहेर पडे'... 'गोरिला पायऱ्या चढून वर गेला आणि त्याने चौथऱ्यावरील अवशेष हाताच्या एका फटकाऱ्याने खाली झटकून दिले. तेथील भग्न मस्तक पायऱ्यांवरून गडगडत कितीतरी वेळ खालच्या फरशीवर ठेचाळत होते.'— ह्या वर्णनातली दृश्य व ध्वनिसंवेदनांची एकात्म गुंफण मूकनाटयाला फार जवळची आहे.

गोरिला 'छाती भरून फळे' आणतो. झाडाचा ओंडका अणकुचीदार नखांनी सोलत व लचके ओरबाडत, त्यातून विलक्षण व विक्षिप्त आकार घडवतो, ह्या कृती बोलक्या आहेत. नंतर तो आणखी चार-पाच गोरिलांना आपले वैभव व सत्ता दाखवण्यासाठी मंदिरात घेऊन येतो, त्यावेळचे समूहदृश्यही असेच बोलके आहे. ('आत येऊन इतस्ततः पाहिल्यावर तर इतर गोरिला वेडावल्यासारखे झाले. त्यांनी भव्य सभामंडपात, विस्तीर्ण ओवऱ्यांत उभे राहून भग्न मूर्तीसमोर मनसोक्त दात विचकले'.) त्यांतला एक गोरिला चौथऱ्यावर पसरताच मूळ गोरिला त्याला अणकुचीदार नखांनी ओरबाडून तिथून हाकलून लावतो व पुढे त्या मांसाचा लचका निघाल्यामुळे खांदा रक्तबंबाळ झालेल्या गोरिलाला समजावण्यासाठी त्याच्यापुढे ताज्या फळांची टोपली धरतो. ह्या गोरिलांच्या कळपातल्या आनंद, भयादी भावना व त्या व्यक्त करण्यासाठी केलेल्या हालचाली, हावभाव, चीत्कार, आरोळ्या व गर्जना, अस्फुट तडकलेले आवाज या सर्वांतून एक दृक्श्राव्य नाटयमयता उभी राहते. 'माणसांची चाहूल लागल्याने घाबरलेल्या एका गोरिलाने सलगी करून मूळ गोरिलाला परत रानात चलण्याविषयी विनवले, परंतु गोरिलाने त्याच्याकडे तिरस्काराने पाहिले. तो शांतपणे चौथऱ्यावर जाऊन बसला व टोपलीमधील एक रंगदार फळ हावरेपणाने उचलून तोंडात कोंबले. बाकीच्यांनी त्याच्याकडे वितळत चाललेल्या ओलसर डोळ्यांनी पाहिले व सैलसर अंगांनी, लोंबकळणारे हात हलवत ते गर्द रानाच्या अंधारात नाहीसे झाले.' समूहदृश्यातील ह्या सूक्ष्म भावदर्शनात रंगमंचीय प्रयोगक्षमता निश्चितच आहेत.

समूहदृश्याच्या एका पातळीवर हा गोरिलांचा कळप आहे, तर दुसऱ्या पातळीवर आदिवासींचे टोळीतील सामूहिक जीवन आहे. त्यांचा नायक व अन्य आदिवासी यांच्या रंगभूषा-वेशभूषा, नृत्ये, भेरी व चर्मवाद्ये, गोरिलांचा व पुढे वादकांचा बळी देतानाचे धर्मविधी ह्यांत विलक्षण व उत्कट अशी नाटयमयता आहे. ह्या संदर्भातले काही नमुने पाहण्याजोगे आहेत :

(१) 'मग सारे रानच ठसठसत असल्याप्रमाणे त्याच त्या अविरत लयीत चर्मवाद्य घुमू लागे'... 'भेरींचा नाद एकदम थांबला' (हे वाद्यध्वनी रंगमंचीय प्रयोगसंदर्भात फार परिणामकारक ठरू शकतात.)

(२) आदिवासींची रंगभूषा व वेशभूषा—

'आज सगळ्यांनी अंगावर हावऱ्या लांब जिभा फुटल्याप्रमाणे लाल रंगाचे पट्टे ओढले होते. नायकाच्या मस्तकावर आज पांढऱ्या उंच पिसांचा मुकुट होता व त्यात हत्तीच्या सुळक्याचा शिंगासारखा अलंकार होता. त्याच्या गळयात सिंहाच्या दातांची माळ असून तिच्यात मध्यभागी संतप्त डोळ्यासारखे दिसणारे एक लाल रत्न होते'... 'लाल मणी ओघळावेत त्याप्रमाणे रंगाने माखलेल्या माणसांची रांग आत आली. पिसांचा मुकुट घातलेला नायक अधिकारी पावले टाकत पायऱ्या चढून वर आला; आणि कासवांच्या पाठी हातात घेतलेले त्याचे सेवक भाल्यांचे दांडे जमिनीवर टकटक वाजवत त्याच्या मागोमाग आले'— ह्या व अशांसारख्या विलक्षण प्रत्ययकारी वर्णनांतून आदिवासी टोळी व तिचा नायक यांची चित्रे साक्षात डोळ्यांसमोर उभी राहतात.

धर्मविधी व नृत्य-नाटय यांचा अगदी निकटचा संबंध प्राचीन काळी होता. किंबहुना धर्मविधीतूनच नृत्य व नाटय यांचा उगम झाला, असे म्हटले जाते. 'गोरिला' कथेचा प्राचीन संदर्भ—त्यातला संस्कृतीचा प्रारंभकाळ, तसेच पशुपातळी व [illegible] पातळी-







अनुक्रमणिका

वरचे जीवन आणि त्यातल्या पशुबळी व नरबळीचा धार्मिक विधी यांचा अन्योन्य संबंध ह्या मुद्द्याच्या आधारे अधिक स्पष्ट होऊ शकेल. आणि ह्यातली बळीविधीची जी वर्णने आहेत, त्यांत नाट्यमयतेचा परमोत्कर्षही आढळून येईल. हे बळी-विधी चर्मवाद्याच्या तालावर समूहनृत्याच्या साथीने चालतात. गोरिलावर पाळत ठेवणे, त्याला वेलींच्या भरभक्कम दोरखंडांनी जेरबंद करणे व चौरंगावर आडवे टाकणे, हातांतले भाले नाचवत आदिवासींनी त्या गोरिलाभोवती फेर धरत नाचणे, नायकाने व त्याच्या सेवकांनी गोरिलाच्या शरीरात झगझगीत अग्राचे उंच भाले खुपसणे, गोरिलाच्या शरीरातून वाहणारे रक्त चौघा आदिवासींनी कासवाच्या पाठी उलटचा करून त्यांत साठवणे आणि ते विधिपूर्वक, ओबडधोबड ओंडक्याच्या देवावर ओतून त्याला रक्ताने स्नान घालणे, नायकाने त्या ओंडक्याला, दोन्ही हात वर करून व गुडघे टेकून अभिवादन करणे व मग सगळ्या आदिवासींनी नायकाने इशारा करताच चित्र-विचित्र हुंकार देत व त्या हुंकारांचेच गीत गात फेर धरून नाचणे, मंदिराबाहेर पटांगणात धगधगणारा अग्नी व त्या अग्नीत मेलेल्या गोरिलाची आहुती– हे सर्व बळी-विधीचे वर्णन विलक्षण चित्तथरारक व नाट्यपूर्ण आहे, ह्यात शंकाच नाही. गोरिलाच्या जागी वादकाचा नरबळी देतानाही हाच धर्मविधी पुनरावृत्त होतो. कथेच्या अखेरीस हे नरबळीचे वर्णन येते :

'( नायकाने इशारा करताच ) नायकाच्या सेवकांनी मान हालवली व ते पायऱ्या उतरून खाली आले. त्यांनी वादकाच्या हातून चर्मवाद्य हिसकावून घेऊन दुसऱ्याकडे दिले, त्यास दोन्ही बाजूंनी गच्च धरून चौरंगावर ओढले. त्याने विस्फारित डोळ्यांनी पाहात भेदरलेला फुटका आवाज काढला ( हा आवाज हुबेहूब, भयभीत गोरिलांच्या आवाजासारखाच आहे, हे वर्णनावरून लक्षात येते ). पण तोपर्यंत त्याचे हातपाय बांधून टाकण्यात आले होते. त्याला चौरंगावर आडवे पाहताच तो अगदी गोरिलासारखाच आहे, हे सगळ्यांना एकदम जाणवले व खंडित झालेले हुंकार नव्या जोमाने सुरू झाले. त्यांची शरीरे जास्त गतीने डोलू लागली. थोड्याच वेळात आरोळी देत एकाने नृत्यास सुरुवात करताच, त्यांची सगळी मालिकाच धुंद वेड्या नृत्यात झिंगून गेली व वादकाभोवती गोल फिरू लागली.

ओंडक्यावर रक्ताचे सिंचन झाल्यावर त्यांनी चौरंग उचलला व महाद्वारातून बाहेर नेला. सेवकासह नायक प्रमत्तपणे पायऱ्या उतरून आला, आणि आत्मविश्वासी पावले टाकत बाहेर पडला.'

मूकनाटचाची अत्युच्च टोकाची परिणामकारकता ह्या प्रसंगात आहे. मूकनाटचाचा आभास असा सर्वत्र भरून राहिला असला, तरी कथेचे 'कथा' म्हणून असलेले प्राणभूत तत्त्व सुरुवातीपासून अखेरपर्यंत अबाधितपणे जपलेले आढळते. शैली ही कथनात्मक, वर्णनपर आहे व त्यात प्रतिमासंपृक्तता व दृक्ध्वनी आदी संवेदनांना आवाहन करण्याचे सामर्थ्य आढळते. मूकनाट्य हा तिचा सांगाडा आहे व कथातत्त्व हा गाभा आहे.

जी. एं. च्या 'ठिपका', 'एका देवाचा मृत्यू', 'गोरिला' यांसारख्या कथांचा विचार करता एक गोष्ट लक्षात येते. ती अशी की, या कथा धार्मिक (रिलिजस) नसून, आध्यात्मिक (स्पिरिच्युअल) आहेत.

धार्मिक व आध्यात्मिक यांत स्वतः जी. एं. नी फरक केला आहे. ते एके ठिकाणी म्हणतात :

"धार्मिक व आध्यात्मिक यांच्यात मला थोडा फरक करावयाचा आहे. धार्मिकतेमध्ये धर्मामुळे आलेले स्थैर्य म्हणा, अवजडपणा म्हणा, परंपरा म्हणा, त्याची मर्यादा असते. पारंपरिक संस्कारांचे प्राबल्य असते; कारण त्यांच्यामुळेच आपली भावनिक जडणघडण झालेली असते. त्यामुळे आपणाला चाललेली भिंत, वेद म्हणणारा रेडा किंवा अंगुलीआधार गोवर्धन पर्वत सहज आठवतो. आभाळातून येणारा आवाज ऐकत पर्वत चढणारा मोझेस आठवणार नाही. कारण आपला consciousness तसा घडलेला नाही. (एखाद्या ज्यूला गोवर्धन पर्वत दिसणार नाही). या साऱ्यामुळे एका विशिष्ट तऱ्हेची(च) श्रद्धा आपणाला जन्मापासून वडिलार्जित मिळकतीप्रमाणे प्राप्त झालेली असते. 'आध्यात्मिक' हा स्वतंत्र, कष्टाचा, नैराश्याचा एक कठोर प्रवास आहे. दर क्षणी कसले तरी मूल्य द्यावे लागते; अत्यंत प्रिय स्नेहधागे तोडावे लागतात. आणि आयुष्य साराच वनवास होतो. कारण ही जी आध्यात्मिक ओढ आहे, तिला तडजोड मान्य नाही. पराक्रमही करावा आणि दागिनेही घालावेत, त्याप्रमाणे चारचौघांप्रमाणे व्यवहारी संसार करावा व अध्यात्म साधावे, हे तेथे चालत नाही. 'All or Nothing' असे त्याचे ब्रीदवाक्य आहे. अशा आध्यात्मिक अनुभवांत येऊन पोहोचण्यापेक्षा पोहोचण्यापर्यंतचा प्रवास महत्त्वाचा असतो."





अनुक्रमणिका

आपल्या विवेचनाच्या पुष्टचर्थ जी. एं. नी काही वाङ्मयीन उदाहरणेही दिली आहेत–

"इंग्रजीमध्ये Thomson नावाचा एक कवी आहे. तो धर्माने Catholic खरा; पण त्याची प्रसिद्ध कविता धार्मिकपेक्षा आध्यात्मिक आहे. चित्रकलेत रेखाचित्रासाठी एक प्रकारची कोळसाकाडी वापरण्यात येते. अगदी बारीक काटक्या अर्धवट जाळून त्यांचा आकार न मोडता कोळसा होतो. याला Limning असा एक शब्द आहे. तर कवी आर्ततेने म्हणतो, "सारे काही जाळून टाकून कोळसा होऊनच तुझे चित्र काढणे अटळ आहे का ? मी सर्वस्वी होरपळून जावे अशीच तुझी अट आहे का ?"

"धार्मिक नसताही आध्यात्मिक असणे शक्य आहे; याचे Shelley हे एक उदाहरण आहे. शिकत असता त्याने 'निरीश्वरवादाची अटळता' यावर एक पत्रक लिहिले व त्याबद्दल त्याला हाकलून लावण्यात आले. Jesus विषयी त्याला व्यक्ती म्हणून आदर असला तरी 'स्वर्गात गुलामांची भरती करणारा धर्म' असे त्याने Christianity चे वर्णन केले आहे. परंतु त्याच्या स्पर्शाने आधिभौतिक आध्यात्मिक होते. West Wind मध्ये सारे विश्व व्यापून राहणारे तत्त्व दिसू लागते. Destroyer and Preserver– नाश करता निर्मिती करणारी, आभाळ, समुद्र, पृथ्वी व्यापून बसणारी सामर्थ्यशाली शक्ती ! (सतत सजीव असलेली, नाश–निर्मितीत जागृत राहणारी, जेथे पानाची गळून पडताना होणारी हलकी थरथर विसरली जात नाही आणि जेथे स्फोटामुळे नष्ट होणारे पर्वत हे डोळ्यांत भरत नाहीत ती माया– ( माया या शब्दाचा हा खरा अर्थ आहे ) तिला आदिमाया हे नाव देऊन तिच्यापुढे नम्र होणारा माणूस डोळस प्रतिभावंतच होता. या कल्पनेत तिला करुणा, भक्तिवशता, अनाथांची रक्षिका असली विशेष चिन्हे चिकटवलेली नाहीत. गुरुत्वाकर्षण संतांच्या बाबतीत काम करते अगर करीत नाही; असे म्हणण्यासारखे ते भाबडे होईल– असे मला वाटते." [संदर्भ : 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका,' जुलै–सप्टेंबर १९८८ ].

धार्मिक व आध्यात्मिक यांतला एक फरक महत्त्वाचा आहे, तो म्हणजे– धार्मिक मनोवृत्तीचे सश्रद्ध आस्तिक्यभाव हे एक अंग असतेच; पण आध्यात्मिकामध्ये तसे ते असेलच, असे नाही. तो श्रद्धेच्या वाटेवरचा शोध असतो; पण त्यात श्रद्धेचा विधायक, सार्थ प्रत्यय येईलच, असे नाही. तो अभावात्मक, नकारात्मकही असू शकतो.

वरील उताऱ्यातच जी. एं. नी आणखी म्हटले आहे–

"मी तसा भाविक, श्रद्धाळू नाही. सगुणोपासना तर मला केवळ हास्यास्पद वाटते. परमेश्वरावर न्याय, करुणा इत्यादी गुणांचा प्रथम आरोप करायचा, मग ते सारे खरोखरीच अस्तित्वात आहेत, असा सोईस्कर समज करून भक्ती करायची, हा मार्ग मला लहानपणापासून अतिशय भाबडा वाटतो."

जी. एं. च्या कथालेखनातूनही श्रद्धेच्या अभावात्मक, नकारात्मक रूपाचाच प्रत्यय येतो. त्यामुळे त्यांच्या कथांची अभिव्यक्ती धार्मिक न वाटता आध्यात्मिक वाटते.

मराठीमध्ये दि. बा. मोकाशी ('देव चालले' ही लघु-कादंबरी; 'आमोद सुनासी आले' ही कथा वगैरे); विद्याधर पुंडलीक ('विपरीत काही झालं नाही'! 'दवणा', 'माळ' इत्यादी कथा); पु. शि. रेगे (आध्यात्मिक कविता व धार्मिक स्तोत्रे) यांच्या लेखनातून सश्रद्ध धार्मिक वृत्तीचा सात्त्विक प्रत्यय येतो. तसा जी. एं. च्या कथांमध्ये येत नाही. त्यांच्या साधकाच्या वाट्याला वैफल्यच येते. काही कथांच्या आधारेही हे स्पष्ट करता येईल. उदाहरणार्थ, 'ठिपका' या कथेतल्या रामण्णा धनगराला उंच डोंगरात ठिपक्यासारखे एक देऊळ दिसते. त्या देवळाकडे जाताना डोंगरचढणीच्या मार्गावर अनेक चकवे लागतात, दिशाभूल होते. आणि अखेर कसाबसा तो मंदिरापर्यंत पोचतो; तर ते मंदिरच त्याला स्वीकारत नाही. ते त्याला दूर ढकलते, झिडकारते. धनगर रामण्णाला अखेर मंदिरप्रवेश नाहीच. 'अनंत' या कथेतल्या साधकालाही हाच अनुभव येतो की, अनंताच्या मंदिरात कोणा मानवाला कधी प्रवेश नसतोच. 'काली' या कथेत साधक व परमेश्वर यांच्यात लौकिक जीवनासक्तीची, पारदर्शक स्फटिकाची अभेद्य भिंत आहे. तर 'बळी' या कथेत मंदिरात स्वतःच्या कुळाची वंशावळ शोधणारा साधक एका परीने स्वतःची अध्यात्मपरंपराच शोधतो आहे. त्याचे अंशाअंशाने बळी जाणे म्हणजे त्या परंपरेपासून तुटणे; प्रतीकात्मक पातळीवर समूळ वंशविच्छेद व अखेर पूर्णतः नष्ट झालेली अध्यात्मपरंपराच होय. 'सोयरे' कथेत मंदिराचे रूपान्तर नरकवजा खोल तळघरात होते आणि साधकाला महारोग्याची भेसूर अवकळा प्राप्त होते.

श्रद्धेचा मृत्यू म्हणजेच ईश्वराचा मृत्यू, हा अनुभव 'एका देवाचा मृत्यू' या कथेत येतो. तिथे एका मातेला

अनुक्रमणिका







देवाने केलेल्या प्रतारणेचा, वंचनेचा दारुण प्रत्यय येतो. तिच्या मुलाला रणांगणावर शत्रूकडून तलवारीने मृत्यू येणार नाही, असा वर ती देवाकडून मिळवते. देव एकीकडे वरही पाळतो आणि तिचा मुलगाही तिच्यापासून हिरावून घेतो. रणांगणावरून विजयी होऊन तो परत येतो; पण मातेने प्रेमाने भरवलेला मोराच्या मांसाचा नैवेद्य ग्रहण करताच त्याला मृत्यू येतो. ज्या देवावर नि:शंक, भावडी व निस्सीम श्रद्धा ठेवली, त्या देवाकडूनच वंचनेचा, प्रतारणेचा अनुभव यावा व श्रद्धा भंगली जावी, हाच खरा देवाच्या मृत्यूचा क्षण होय.

अशा रीतीने जी. एं. ची कथा ही अध्यात्माच्या वाटेने वाटचाल करते; पण ती रित्या मनाची व रिकाम्या गाभाऱ्याची कथा आहे. नकाराची व नाकारले जाण्याची कथा आहे. संदेहवादी, किंबहुना निरीश्वरवादी साधकाने घेतलेला हा मानवी श्रद्धेचा शोध आहे. त्यात त्याला विकृती व वैफल्यच जाणवते, कारण इथे भोळा भक्तिभाव नाही, कठोर चिकित्सा आहे. कडकडीत वैराग्याच्या शुष्क पण उष्ण झळा आहेत. ( जी. एं. च्या कथांमध्ये असे कडकडीत, शुष्क व कठोर वैराग्य पाळणारे बैरागीही अनेक आढळतात. उदाहरणार्थ, 'प्रवासी' या कथेतला मेलेल्या पत्नीच्या सरणावर पिठाचे गोळे भाजून खाणारा वैरागी; किंवा 'मुक्ती' या कथेतला उपास्य दैवताचा चौथरा रिकामाच ठेवणारा संदेहवादी बैरागी). हे वातावरण गुदमरून टाकणारे व कोंदट आहे. श्रद्धेच्या प्रत्येक पावलावर का, कशासाठी असे प्रश्न उपस्थित करणारा एक कठोर चिकित्सक संशयात्मा या कथांच्या गाभ्याशी आहे. पण त्याचा स्वर आर्त व्याकुळ आहे. त्यामुळे या कथा आध्यात्मिक होतात; पण धार्मिक होत नाहीत. 'देवाचा मृत्यू' हा परवलीचा मंत्र आहे व त्यामुळे निर्माण झालेल्या मूल्यविहीन अवस्थेचा शोकस्वर त्यात आळवलेला आहे. सनातन श्रद्धाविश्वाच्या मार्गाने जाऊनही हाती काहीच लागत नाही, हेच सत्य शेवटी उरते. श्रद्धामूल्यांविषयीचे सारे मानवी मनाचे भ्रम अखेर दूर होतात व भ्रमनिरासाची वैराण अवस्था वाट्याला येते. सगळी तीर्थे शेवटी शून्यतीर्थात विलीन होतात. मानवी जाणिवांच्या शोधप्रवासाला निघालेली जी. एं. ची कथा भ्रमातून उगम पावते; पण अंती भ्रमनिरासाचे टोक गाठते. भ्रम व भ्रमनिरास ही तिची उगमाची व अंताची दोन टोके आहेत व त्यांची कथा या दोन टोकांमध्येच फिरत असते. 'गोरिला' हे अशा श्रद्धाविकृतीचे व मूल्यऱ्हासाचे, आदिम जीवनाच्या पातळीवर रंगवलेले दारुण विदारक चित्र होय.

तसेच 'गोरिला' ही कथा मिथ्याच्याही अनेक अंगांनी उलगडून दाखवता येईल. सृष्टीच्या आद्यारंभीचे मिथ्य; मानवी आदिम श्रद्धाप्रेरणांचा शोध घेऊ पाहणारी शोध-मिथ्य; एका वैश्विक सत्याचा (मानवी श्रद्धेचा उगम व स्वरूप) आदिवासी टोळीजीवनाच्या पार्श्वभूमीवर शोध घेऊ पाहणारी वैश्विक (कॉस्मॉलॉजिकल) मिथ्य अशा अनेक पातळ्यांवर मिथ्य म्हणून या कथेचा विचार होऊ शकतो. असेही म्हणता येईल की, गोरिला हे आदिम मानववंशाच्या सामूहिक अबोधाचे (कलेक्टिव्ह अन्कॉन्शस) एक रूप आहे. मानवी मनाच्या वरपांगी पातळीवर सत्त्वशील रूप धारण करणारी; पण मानवी मनाच्या खोल तळाशी अबोध अंतर्मनात सुप्तरूपात दडलेली हिंस्र पाशवी श्रद्धा हे अंतर्द्वंद्व ही कथा उलगडून दाखवते, असेही म्हणता येईल. ओंडक्याच्या देवापुढे नैवेद्यरूपाने प्रथम येणारा सात्त्विक फलाहार; नंतर भाजलेली मेंढी व बैलाचे डोके असा पाशवी नैवेद्य; पुढे नर-वानर गणातील गोरिलाचा पशुबळी (नरबळीची पूर्वावस्था) आणि अखेरीस ढोलवादकाच्या रूपाने नरबळी व ही नरबळीची प्रथा पुढे वर्षानुवर्षे चालू राहणार असल्याचा सूचक निर्देश, असा हा अघोरी श्रद्धेचा प्रवास आहे. या कथेत एकदोन ठिकाणी येणारे अनेक शतके लोटल्याचे, शतकानुशतकांचे संदर्भ केवळ अतिप्राचीनत्वच नव्हे, तर कालगतीचा दीर्घ प्रवाह व त्या कालौघातले सांस्कृतिक संक्रमण सूचित करतात. प्राचीन मंदिराला रूपकार्थाने एकूणच मानवी व पाशवी जीवसृष्टीचे भव्य व विशाल परिमाण लाभते आणि चौथरा या सृष्टीवरील अधिसत्तेचे प्रतीकरूप धारण करतो. सुरुवातीला त्यावर गोरिलाची सत्ता असते, म्हणजे पर्यायाने विश्वसृष्टीवरील पशु-जीवनाच्या वर्चस्वाचे चित्र दिसते; तर नंतर चौथऱ्यावर आदिवासींच्या टोळीचा नायक स्थानापन्न होतो. हे पशुपातळीकडून मानवपातळीकडे व संस्कृतिपूर्व प्राणी–अवस्थेकडून आद्यतन मानवसंस्कृतीकडे घडत गेलेल्या सृष्टीवरील अधिसत्तेच्या स्थित्यंतराचे व विकासक्रमाच्या वाटचालीचे सूचक आहे. अशा रीतीने, 'गोरिला' हे वैश्विक मिथ्य एक भव्यदिव्य आकार धारण करते.








# शिक्षणक्षेत्रातील स्वायत्तता

प्र. म. बांदिवडेकर

– १ –

शिक्षणाच्या क्षेत्रामधील प्रमुख समस्या व त्यांबाबतची उपाययोजना यासंबंधी जरी विविध मते व्यक्त केली जात असली, तरीदेखील या क्षेत्रामध्ये– विशेषतः उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये– स्वायत्ततेच्या तत्त्वाला प्राधान्य असले पाहिजे याबद्दल शिक्षणतज्ज्ञ राज्यकर्ते आणि एकंदर समाज यांमध्ये दुमत नाही. शिक्षणाचे क्षेत्र हे नवनिर्मितीचे क्षेत्र आहे आणि विद्यार्थी व प्राध्यापक यांच्या सर्जनशील शक्तीला मुक्त वाव मिळण्यासाठी अध्ययन, अध्यापन आणि संशोधन यांचे शैक्षणिक कार्य बाह्य हस्तक्षेपावाचून चिरंतर चालू राहिले पाहिजे ही स्वायत्ततेची संकल्पना होय.

विद्यार्थी, अध्यापक, पालक, व्यवस्थापन हे शिक्षणक्षेत्रातील प्रमुख घटक. या सर्व घटकांना महत्त्व असले तरी विद्यार्थी व अध्यापक हे विद्याक्षेत्रिय घटक असल्याने त्यांना शिक्षणक्षेत्रामध्ये खास महत्त्व आहे. त्यातही विद्यार्थ्यांच्या अपरिपक्व वयामुळे शिक्षणक्षेत्रातील चैतन्य निष्ठापूर्वक टिकवून धरण्याची खरी नैतिक जबाबदारी अध्यापकवर्गावर येऊन पडते. अध्यापकांना हे उत्तरदायित्व पार पाडण्यासाठीच शैक्षणिक क्षेत्रात स्वायत्ततेची नितान्त गरज आहे.

शिक्षणक्षेत्रातील स्वायत्ततेचा विचार प्रस्तुत लेखामध्ये दोन पातळ्यांवर केला आहे एक म्हणजे विद्यापीठांची स्वायत्तता आणि दुसरी महाविद्यालयांची स्वायत्तता.

विद्यापीठ स्वायत्ततेचा विचार करताना विद्यापीठ स्वायत्तता ही संकल्पना विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्यापेक्षा भिन्न असल्याचे मत अनेक शिक्षणतज्ज्ञांनी व्यक्त केले आहे. शिक्षण आयोगाने (१९६४–६६) देखील या भेदाकडे विशेषेकरून लक्ष वेधले आहे. समाज आणि राष्ट्र यांचा एक अविभाज्य घटक म्हणून व एक संस्था म्हणून काही कार्ये पार पाडण्यासाठी विद्यापीठांना दिलेले स्वातंत्र्य म्हणजे विद्यापीठांची स्वायत्तता होय. तर विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्य म्हणजे महाविद्यालय किंवा विद्यापीठ यामध्ये अध्यापनकार्य करत असताना अध्यापकांना दिले जाणारे व्यावसायिक स्वातंत्र्य होय. तसे पाहिले तर या दोन्ही संकल्पना एकमेकींस जवळच्या व परस्परपूरक आहेत. तथापि काही वेळा त्यामध्ये अंतर पडू शकते. उदाहरणार्थ, एखाद्या विद्यापीठाला स्वायत्तता असेल, परंतु ते विद्यापीठ आपल्या अध्यापकांना विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्य नाकारू शकेल; याउलट, स्वायत्तता नसणारे एखादे विद्यापीठ विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्याचे रक्षण करील. युरोपमध्ये अशा दोन्ही प्रकारची विद्यापीठे अस्तित्वात होती. हा फरक लक्षात घेऊनही असे म्हणता येईल की, विद्यापीठ स्वायत्ततेचे अंतिम उद्दिष्ट विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्य हेच असले पाहिजे. कारण विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्याखेरीज विद्वत्ता, गुणवत्ता, निर्भय व चिकित्सक परंतु विधायक टीका यांना खरा अवसर मिळणार नाही.

– २ –

भारतातील विद्यापीठांना त्यांच्या अंतर्गत प्रशासनामध्ये मोठ्या प्रमाणावर स्वायत्तता आहे असे सकृद्दर्शनी म्हणता येईल. ब्रिटनमध्ये विद्यापीठांना जवळजवळ पूर्णांशाने स्वायत्तता असून त्यांच्यावरील शासनाचे नियंत्रण अत्यल्प प्रमाणात आहे. याउलट इटली, फ्रान्स यांसारख्या देशांतील विद्यापीठांचे उदाहरण दुसऱ्या टोकाचे आहे. तेथील विद्यापीठांवर शासनाचे नियंत्रण व्यापक स्वरूपाचे असून विद्यापीठांचे कार्य एखाद्या शासकीय खात्याप्रमाणे चालते. भारतातील विद्यापीठे या दोहोंमध्ये जवळपास मध्यावर आहेत असे म्हणता येईल. भारतामधील विद्यापीठांवर शासनाचे नियंत्रण मुख्यतः अप्रत्यक्ष स्वरूपाचे आहे, ही गोष्टही या ठिकाणी लक्षात ठेवली पाहिजे. प्रत्यक्षामध्ये मात्र विद्यापीठांच्या या स्वायत्ततेला अनेक स्वरूपाच्या मर्यादा पडलेल्या दिसून येतात. अधिक खेदाची गोष्ट अशी की विशेषतः स्वातंत्र्योत्तर कालामध्ये विद्यापीठांची स्वाय-

अनुक्रमणिका

त्तता ही केवळ नाममात्र आणि शोभेची गोष्ट झालेली आहे.

विद्यापीठांच्या स्वायत्ततेवरील आघात मुख्यतः वैचारिक, वांशिक अथवा राजकीय अशा तीन कारणांस्तव होतो. यादवी युद्धानंतर स्पेनमध्ये तसेच द्वितीय महायुद्धोत्तर कालामध्ये अमेरिकेमध्ये अनेक विद्यापीठांमध्ये अंतर्गत स्वायत्तता धोक्यात आली आणि अनेक विचारवंतांना त्यांच्या मतस्वातंत्र्याची जबर किंमत द्यावी लागली. नाझी जर्मनीमध्ये तसेच दक्षिण आफ्रिकेमध्ये वांशिक कारणांमुळे विद्यापीठांच्या स्वायत्ततेला ग्रहण लागले. भारतामध्ये विद्यापीठांच्या स्वायत्ततेला पडलेल्या मर्यादा प्रामुख्याने राजकीय कारणांनी आहेत हे लक्षात घेण्यासारखे आहे. एखाद्या प्राध्यापकाच्या वैचारिक व तात्त्विक भूमिकेमुळे विद्यापीठाच्या स्वायत्ततेवर शासनाने अतिक्रमण केले किंवा त्यामुळे विद्यापीठान्तर्गत स्वायत्तता टिकवून धरण्याचा गंभीर प्रसंग उद्भवला अशा प्रकारची उदाहरणे भारतामध्ये तुरळकच आहेत.

विद्यापीठाच्या स्वायत्ततेचा विचार करताना खालील घटकांचा मुख्यतः विचार करावा लागतो. (१) विद्यार्थी निवडण्याचे विद्यापीठांचे स्वातंत्र्य, (२) प्राध्यापकांची निवड करणे व त्यांना बढती देणे यांचे स्वातंत्र्य व (३) अभ्यासक्रम व अभ्यासपद्धती तसेच संशोधनाचे विषय ठरविण्याचे स्वातंत्र्य. तसे पाहिले तर भारतातील विद्यापीठांना या सर्व बाबतींत म्हटले तर स्वायत्तता आहे. भारतातील बहुतांश विद्यापीठांची निर्मिती केंद्रसरकार किंवा राज्यसरकारे यांच्या विधिनियमांनी झाली असून त्यांचा कारभार या विधिनियमांतील तरतुदींप्रमाणे चालतो. विधिनियमांच्या चौकटीमध्ये राहून विद्यापीठांना आपल्या कारभारासंबंधीचे अधिनियम करता येतात. कुलगुरू, विधिसभा, कार्यकारी समिती आणि विद्वद्सभा हे विद्यापीठाचे प्रमुख घटक निर्णयप्रक्रियेशी व निर्णयांच्या कार्यवाहीशी संबंधित असतात. विद्यापीठाच्या या एकंदर रचनेमध्ये स्वायत्ततेला भरपूर वाव असल्याने शासन विद्यापीठाच्या कारभारामध्ये प्रत्यक्ष रीतीने केवळ अपवादात्मक परिस्थितीमध्येच हस्तक्षेप करू शकेल. वास्तव परिस्थितीमध्ये मात्र शासन अप्रत्यक्ष रीतीने विद्यापीठे व महाविद्यालये यांच्या कारभारात विविध मार्गांनी हस्तक्षेप करू शकते. एक तर विद्यापीठ यंत्रणेचा प्रमुख आधारस्तंभ असलेल्या कुलगुरूंची नेमणूक कुलपती म्हणजेच राज्यपाल करतात. राज्यपाल अर्थातच ही नेमणूक मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने करतात. कुलगुरूंच्या नेमणूकीची सर्व प्रक्रिया अशा तऱ्हेने ठरविण्यात आली आहे, की त्यामध्ये मंत्रिमंडळाला अमान्य असलेल्या व्यक्तीची कुलगुरूपदावर कदापि निवड होणार नाही. तत्त्वतः यामध्ये काही फार चूक आहे असे नव्हे; कारण शासन व विद्यापीठ यांमध्ये सामंजस्याची भावना असण्याची फार मोठी आवश्यकता असते. शासनाला अमान्य असणाऱ्या व्यक्तींची कुलगुरूपदावर निवड झाली की, सतत संघर्षाची ठिणगी उडणार आणि विद्यापीठामध्ये अस्थैर्य निर्माण होणार. परंतु याचा दुसरा परिणाम असाही होतो की, कुलगुरूंची निवड गुणवत्ता आणि कार्यक्षमता या निकषांच्याऐवजी राजकीय कारणासाठी होते. राजकीय लागेबांधे, प्रादेशिकता, जात, जनमानस इत्यादी अनेक प्रकारच्या विद्याक्षेत्रबाह्य गोष्टींचा विचार कुलगुरूंच्या नेमणुकीच्या संदर्भात होत असल्याने शासनाला आणि विद्यापीठांमध्ये राजकारण खेळणाऱ्या व्यक्तींना आणि कंपूंना दरारा वाटावा अशा आदरणीय व्यक्तींची निवड कुलगुरुपदावर होणे जवळजवळ दुरापास्त झाले आहे. क्वचितप्रसंगी अशी निवड झाली तरी विद्यापीठांच्या सध्याच्या वातावरणामध्ये अशी व्यक्ती तिचा कार्यकाळ संपेपर्यंत टिकणे ही गोष्ट अशक्यच झाली आहे. लायक आणि कर्तबगार व्यक्तींना देखील आज कुलगुरू बनण्यासाठी प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष रीतीने अनेक खटपटी-लटपटी कराव्या लागतात हे जगजाहीर आहे. त्यामुळे कुलगुरूपदावर विराजमान झालेली व्यक्ती दुसऱ्या वेळेला पुन्हा आपली निवड कशी होईल या चिंतेमध्ये मग्न असते. विद्यापीठाच्या विविध घटकांमध्ये प्रत्यक्ष राजकारणातील व्यक्तींनादेखील उबग आणेल इतकी गटबाजी आणि सत्तास्पर्धा बोकाळली आहे. त्यामुळे कोणत्याही कुलगुरूला या सत्तास्पर्धेपासून पूर्णपणे अलिप्त राहणे कठीण जाते. विद्यापीठाच्या शैक्षणिक प्रगतीच्या नवनवीन योजना आखणे व राबवणे यासाठी कुलगुरूंना कोणतीही हालचाल करायला फुरसदच मिळत नाही. त्यामुळे चालत आलेला विद्यापीठाचा गाडा कसाबसा पुढे रेटणे यामध्येच कुलगुरूंची सर्व शक्ती खर्च होते. उच्च शिक्षणाच्या संदर्भात शासनाने वेळोवेळी घेतलेल्या धोरणविषयक निर्णयांना या सर्व गोष्टींमुळे कोणत्याही कुलगुरूंना आपला पाठिंबा

द्यावाच लागतो. विद्यापीठाच्या स्वायत्ततेवर शासनाकडून या मार्गाने अप्रत्यक्ष रीतीने दडपण येत राहते.

विद्यापीठाच्या स्वायत्ततेवरील शासनाचे अतिक्रमण एवढ्यावर थांबत नाही. महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठे आर्थिक अडचणींमध्ये सापडली असून त्यांना शासनाकडून मिळणाऱ्या अनुदानावर मोठ्या प्रमाणावर अवलंबून राहावे लागते. महाराष्ट्र शासनाचा एक वित्ताधिकारी प्रत्येक विद्यापीठामध्ये नेमलेला असतो आणि त्याचे विद्यापीठाच्या आर्थिक कारभारावर बारकाईने नियंत्रण राहते. कुलगुरू आणि कार्यकारी समिती यांच्यापेक्षा या वित्ताधिकाऱ्याचेच महत्त्व विद्यापीठांच्या प्रशासनामध्ये वाढले असून त्यामुळे विद्यापीठाची प्रशासकीय आणि आर्थिक स्वायत्तता यांना तसा फारसा अर्थ राहिलेला नाही.

विद्यापीठ स्वायत्ततेचे जे आवश्यक घटक वर नमूद केले आहेत त्यांबाबतही हेच म्हणता येईल. औपचारिक दृष्टचा विद्यार्थी निवडण्याचे स्वातंत्र्य जरी विद्यापीठांना व महाविद्यालयांना असले तरी त्याला अनेक मर्यादा आहेत. विशेषतः महाविद्यालयामध्ये विद्यार्थ्यांच्या संख्येवर प्राध्यापकांची संख्या अवलंबून असल्याने महाविद्यालयांना वर्गातील विद्यार्थ्यांच्या संख्येचे नियंत्रण करणे कठीण आहे. प्रत्यक्षात ठरवून दिलेल्या संख्येपेक्षा अधिक विद्यार्थ्यांना वर्गात प्रवेश द्यावा लागतो. अध्यापकांची निवड करण्याचे स्वातंत्र्य महाविद्यालयांना व विद्यापीठांना असले तरी अशी निवड करणाऱ्या महाविद्यालयाच्या मुलाखतमंडळावर शिक्षणखात्याचा प्रतिनिधी असतो. तो अशा मुलाखतीच्या वेळी उपस्थित राहणार नसला तरी त्याबाबतीतील सर्व नियम काटेकोरपणे पाळून मुलाखतीच्या तारखा ठरवाव्या लागतात. याशिवाय राखीव जागांसंबंधीचे नियमही पाळावे लागतात. या सर्व पद्धतीमागील हेतू चांगल्या उमेदवाराची निवड व्हावी हा असला तरी प्रत्यक्षात या सर्व प्रक्रियेमध्ये कालहरणाखेरीज दुसरे काही साध्य होत नाही. अभ्यासक्रम आणि अभ्यासपद्धती तसेच संशोधनप्रकल्प निश्चित करण्याचे स्वातंत्र्य विद्यापीठांना असले तरी सध्याच्या चाकोरीबद्ध शिक्षणपद्धतीमध्ये या स्वायत्ततेचा पुरेसा लाभ घेता येत नाही. नवीन अभ्यासक्रम व संशोधनप्रकल्प राबविण्यासाठी लागणारी साधनसामग्री, आणि अध्यापक संशोधन आणि पैसा उपलब्ध होण्यामध्ये ज्या अडचणी निर्माण होतात त्यामुळे अशा कार्यामध्ये रस असणाऱ्या व्यक्तींचा उत्साह भंग होतो असा अनुभव आहे.

नवीन महाविद्यालयांना संलग्नता देणे आणि योग्य महाविद्यालयांना कायमची संलग्नता देणे ही विद्यापीठाच्या स्वायत्ततेमधील एक महत्त्वपूर्ण बाब; परंतु या बाबतीतही विद्यापीठांचा अधिकार नाममात्रच राहिला आहे. विद्यापीठाच्या या क्षेत्रातील स्वायत्ततेवर स्वातंत्र्यपूर्व काळामध्येच अनेक मर्यादा घालण्यात आल्या होत्या. १९०४ मध्ये मंजूर झालेल्या भारतीय विद्यापीठ कायद्यामधील एका तरतुदीप्रमाणे महाविद्यालयांना संलग्नता देणे वा नाकारणे यासंबंधीचा अंतिम अधिकार शासनाला देण्यात आला होता. या कायद्यातील इतर अनेक तरतुदींमार्फत विद्यापीठांची स्वायत्तता फारच मर्यादित करण्यात आली होती, विद्यापीठांच्या स्वायत्ततेवर मूले कुठारः असा प्रहार करणाऱ्या या कायद्याला विद्यापीठाच्या स्वायत्ततेचे खंदे पुरस्कर्ते नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनी प्रखर विरोध केला होता. स्वातंत्र्योत्तर काळामध्ये आर्थिक नियोजन आणि आर्थिक टंचाई या कारणांस्तव नवीन महाविद्यालयांना संलग्नता देण्याबाबत शासनाने अधिकच ताठर धोरण स्वीकारले आहे यात नवल नाही. परंतु त्यातही गंमत अशी की राजकीय कारणास्तव पाहिजे तेव्हा विद्यापीठाने घालून दिलेल्या आवश्यक अटींची पूर्तता न करतादेखील काही संस्थांना महाविद्यालये सुरू करण्याची शासनाकडून परवानगी मिळते.

महाराष्ट्रातील महाविद्यालये व विद्यापीठे यांचा प्राध्यापकवर्ग व इतर कर्मचारीवर्ग यांच्या वेतनाचे सर्व अनुदान शासनाकडून मिळत असल्याने शासनाकडून वेळोवेळी येणाऱ्या सूचनांचे विद्यापीठांना व महाविद्यालयांना विनातक्रार पालन करावे लागते. त्यातच अनेक उच्चमहाविद्यालयांना कनिष्ठ महाविद्यालये जोडल्यामुळे या महाविद्यालयांना अपुऱ्या कर्मचारीवर्गाच्या मदतीने काम करावे लागते. खरे तर महाराष्ट्रातील बहुतेक सर्व आणि विशेषेकरून जुनी आणि नाणावलेली महाविद्यालये तसेच विद्यापीठे भयानक आर्थिक दुरवस्थेमध्ये सापडलेली आहेत. प्राध्यापक आणि कर्मचारीवर्गाचे वेतन शासनाकडून येत असल्याने त्यांचा गाडा कसाबसा चालला आहे येवढेच. बहुतेक महाविद्यालयांना आपल्या इमारतींची देखभाल करणेदेखील कठीण जात आहे. रंग उडालेल्या भिंती, दुर्गंधी

येणारी स्वच्छतागृहे, अपुरी सामग्री असलेल्या प्रयोगशाळा, नवीन उत्तम ग्रंथांची वाण असणारी ग्रंथालयें व अंधारलेले वर्ग अशा तऱ्हेचे आजच्या महाविद्यालयांचे स्वरूप पाहून मन उदास होते. या परिस्थितीवर मात करता येईल असे अधिकारही महाविद्यालयांना नाहीत. विद्यार्थ्यांच्या फीमध्ये त्यांना वाढ करता येत नाही. कोणत्याही प्रकारच्या फीवाढीच्या प्रस्तावाला राजकीय पक्ष आणि विद्यार्थी-संघटना कडाडून विरोध करणार अशा प्रकारचे आजचे वातावरण आहे. तेव्हा शासनालाही या बाबतीत पुढाकार घेणे परवडण्यासारखे नाही.

शासनाचे विद्यापीठांवरील व महाविद्यालयांवरील नियंत्रण फक्त आर्थिक बाबतीत असते असेही नाही. शास्त्रीय नोकरशाहीची त्यांच्यावरील पकड दिवसेंदिवस वाढत चालली आहे. वर्गातील विद्यार्थिसंख्येपासून तर सांस्कृतिक व अभ्यासेतर उपक्रमांबाबत नाना तऱ्हेची परिपत्रके शिक्षणखाते आपल्या खास शासकीय भाषेमध्ये महाविद्यालयांना पाठवत असते. या सर्व परिपत्रकांची अंमलबजावणी व्हावी अशी त्यांची अपेक्षा असते. विद्यापीठांच्या स्वायत्ततेची यत्किंचितही जाणीव शिक्षणखात्याला असते असे दिसून येत नाही. कोणतेही परिपत्रक पाठवताना विद्यापीठे-महाविद्यालये यांच्याशी संपर्क साधावा, प्राध्यापक-प्राचार्य यांच्याशी विचारविनियम करावा याची आवश्यकता शिक्षणखात्याला वाटत नाही. आपण दिलेल्या अनुदानांवर विद्यापीठे व महाविद्यालये चालली आहेत तेव्हा आपल्या आदेशांचे त्यांनी बिनतक्रार पालन केले पाहिजे, हीच शासनाची एकमेव अपेक्षा असते.

महाराष्ट्रातील विद्यापीठांच्या स्वायत्ततेची परवड कशी चालू आहे याचे जे वर्णन वर केले आहे ते थोड्याफार फरकाने सर्व राज्यांना लागू पडते असे म्हणता येईल. विशेषतः बिहार, मध्यप्रदेश इत्यादी उत्तरेकडील राज्यांमध्ये विद्यापीठामधील शासनाचा वाढता हस्तक्षेप ही एक चिंतेची गोष्ट आहे. विद्यापीठाच्या कुलगुरूंची बडतर्फी वा त्यांना राजीनामे देण्यास भाग पाडणे यामुळे विद्यापीठांचे राजकीयीकरण होत असून भारतीय विद्यापीठ संघटनेनेदेखील या गोष्टीबद्दल आपली तीव्र नापसंती व्यक्त केलेली आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात परकीय राजवटीला शिक्षणक्षेत्रातील स्वायत्ततेबद्दल फारशी आस्था वाटली नाही हे स्वाभाविकच होते. कारण आपल्या राज्यकारभाराला पूरक अशा प्रकारचीच शिक्षण व्यवस्था ब्रिटिश राज्यकर्त्यांना अपेक्षित होती. तरीही ब्रिटिश उदार मतवादी परंपरेच्या प्रभावामुळे त्यांनी एका विशिष्ट मर्यादेपलीकडे विद्यापीठांच्या स्वायत्ततेवर बंधने आणली नाहीत. स्वकीय राजवटीमध्ये मात्र राज्यकर्ते विनासंकोच विद्यापीठांच्या स्वायत्ततेवर अतिक्रमण करत आहेत. विशेष म्हणजे आपण यामध्ये काही गैर करत आहोत याची पुसटशी जाणीवदेखील त्यांच्या मनामध्ये व कृतीमध्ये असल्याचे दिसत नाही. खेदाची गोष्ट अशी की, विद्यापीठांच्या स्वायत्ततेवर अतिक्रमण करणाऱ्या ब्रिटिश राजकर्त्यांना जाब विचारणारे व निस्पृह नामदार गोखले तेव्हा होते, आता मात्र अशा प्रकारची परंपरा खंडित झाली आहे.

— ३ —

कोणत्याही राष्ट्राची प्रगती आणि जिवंतपणा तेथील विद्यापीठांच्या उपक्रमशीलतेवर अवलंबून असतो. विद्यापीठांची उपक्रमशीलता ही पुष्कळशी त्याच्या स्वायत्ततेवर अवलंबून आहे. विद्यापीठांच्या परिसरामध्ये ज्ञानसाधनेचे वातावरण एकदम निर्माण होत नाही. त्याला जाणीवपूर्वक सजवलेल्या दीर्घ परंपरेची गरज आहे. ब्रिटनमधील आजच्या प्रमुख विद्यापीठांचा वारसा सहाशेहून अधिक वर्षांचा आहे. भारतातील विद्यापीठे एका संक्रमणकाळातून मार्गक्रमण करीत आहेत. अशा वेळी भारतातील विद्यापीठाच्या स्वायत्ततेच्या बाजूने प्रभावी लोकमत निर्माण करणे हीच विद्यापीठाच्या स्वायत्ततेची खरी ग्वाही होय असे म्हणता येईल. आणि या बाबतीतील प्रमुख जबाबदारी या लेखाच्या प्रारंभी म्हटल्याप्रमाणे प्राध्यापक वर्गाची आहे.

एखाद्या देशातील शिक्षणपद्धती ही त्याच्या व्यापक सामाजिक, आर्थिक, राजकीय व्यवस्थेची एक उपव्यवस्था असते. त्यामुळे शैक्षणिक समस्यांचे मूळ सामाजिक, आर्थिक, राजकीय समस्यांमध्ये शोधता येते. प्रचलित शिक्षणव्यवस्थेमध्ये—विशेषतः उच्च शिक्षणव्यवस्थेमध्ये—अनेक प्रकारचे दोष आहेत. राधाकृष्णन आणि कोठारी आयोगांच्या प्रतिवृत्तांमध्ये त्याची भरपूर चर्चाही झालेली आहे. थोडक्यात असे म्हणता येईल की, आजची शिक्षणपद्धती यांत्रिक आणि उत्साहरहित झालेली असून तिला मरगळ आली आहे. विद्यार्थी व प्राध्यापक या दोहोंना आपण या शिक्षणव्यवस्थेचा एक मुख्य घटक अस-

त्याची जाणीव नाही. त्यामुळे औदासीन्य आणि वैफल्य यांचे सर्वत्र वातावरण आहे. या क्षेत्रामध्ये अधिकाराचे नको तितके केंद्रीकरण झालेले असून परस्परांबद्दलचा अविश्वास आणि एकमेकांविरुद्धच्या कुटिल कारवाया यांमध्येच बहुतेकांचा वेळ खर्च होतो. प्राध्यापकवर्गाची आर्थिक विवंचना, त्यातून उद्भवणारे संप, शासनाचे चालढकलीचे धोरण, त्यामुळे नेहमी लांबणाऱ्या परीक्षा हे नित्याचे चित्र झाले आहे. परकीय भाषेतील अध्यापनामुळे विद्यार्थी व प्राध्यापक यांच्यावर अनावश्यक बौद्धिक ताण पडत असून त्यांची स्वतंत्र विचारशक्ती खुंटत आहे. सध्याची परीक्षापद्धती सदोष असून विद्यार्थ्यांचा, प्राध्यापकांचा व समाजाचाही या पद्धतीवरील विश्वास उडालेला आहे. अधिक व्यापक दृष्टीने पाहिले तर असे दिसून येईल की, सध्याच्या उच्च शिक्षणामध्ये अनेक प्रकारचे विसंवाद निर्माण झाले आहेत. स्वातंत्र्योत्तर काळामध्ये पिढ्यान् पिढ्या शिक्षणापासून वंचित राहिलेला बहुजन समाज आपल्या मुलाबाळांना उच्च शिक्षण प्राप्त व्हावे या आकांक्षेने प्रेरित होणे स्वाभाविकच होते. त्यामुळे ग्रामीण भागामध्ये शिक्षणाचा झपाट्याने प्रसार झाला व विद्यापीठे आणि महाविद्यालये यांची संख्या एकदम वाढली. या संख्यात्मक वाढीमुळे शिक्षणाच्या गुणात्मक दर्जाची गंभीर समस्या निर्माण झाली. ध्येयवादी विचाराने शिक्षणप्रसाराचे व्रत हाती घेतलेल्या तळमळीच्या समाजकार्यकर्त्यांची जागा कालांतराने राजकीय महत्त्वाकांक्षेने पछाडलेल्या स्थानिक राजकीय नेत्यांनी घेतली. त्यामुळे प्राध्यापक-प्राचार्य यांच्या नेमणुकांमध्ये बौद्धिक कुवत व पात्रता यांपेक्षा जात, नातेसंबंध, राजकीय उपयुक्तता इत्यादी अशैक्षणिक गोष्टींना प्राधान्य मिळाले. यातून हुजरेगिरी आणि लांगूलचालन यांसारख्या प्रवृत्तींना खतपाणी मिळून प्राध्यापकवर्गाची उरलीसुरली प्रतिष्ठा नाहीशी झाली. त्यामुळे वेतनवाढीसाठी विद्यार्थ्यांना ओलिस ठेवून नित्यनियमाने संप करणारा, ज्ञानार्जनापेक्षा शिकवण्यांद्वारा अर्थार्जन करणारा आणि उरलेला वेळ चकाट्या पिटत किंवा शैक्षणिक उपक्रमांव्यतिरिक्त अन्य सवंग उद्योगांमध्ये वाया दवडणारा तो प्राध्यापक अशी त्याची समाजमानसामध्ये प्रतिमा निर्माण झाली आहे आणि ती सर्वस्वी चुकीची आहे असेही म्हणता येणार नाही. अशा प्राध्यापकवर्गाकडून शिकविला जाणारा विद्यार्थिवर्ग आपणासारखे करिती तात्काळ या न्यायाने तयार होणार यातही नवल नाही. पदव्या आणि प्रथम श्रेणी यांची खैरात आणि सुमार स्वरूपाचे संशोधन हे याचेच फलित होय.

संख्यात्मकता आणि गुणात्मकता यांच्यातील या विसंवादाबरोबरच शिक्षणाचा आशय आणि शिक्षणाचे व्यवस्थापन यांबाबतींतही अनेक प्रकारच्या समस्या निर्माण झाल्या आहेत. विस्तारभयास्तव त्या सर्वांचा या ठिकाणी निर्देश करता येणार नाही. परंतु या सर्वांपलीकडे आपल्या उच्च शिक्षणाच्या एकंदर उपयुक्ततेबाबतच आज संदेह व्यक्त केला जात आहे याकडे जरूर लक्ष वेधले पाहिजे. आजचे उच्च शिक्षण व्यावहारिक दृष्टीने फारसे उपयोगी पडत नाही, पदवी घेतल्यानंतर नोकरीची शाश्वती नसते इत्यादी आक्षेप तर नेहमीच घेतले जातात. परंतु त्यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे उच्च शिक्षण घेतल्यानंतरही पदवीधराला आत्मविश्वासाने जीवन जगण्याची कुवत अंगी येत नाही अशी खंत व्यक्त केली जाते.

उच्च शिक्षणाबाबतच्या समस्यांचा इतक्या विस्ताराने उल्लेख करण्याचे कारण असे की, विद्यापीठे व महाविद्यालये यांना खऱ्या अर्थाने स्वायत्तता प्राप्त झाली तरी उच्च शिक्षणाच्या या समस्या सुटू शकतील असे नव्हे. शिक्षणक्षेत्रातील स्वायत्तता हे शैक्षणिक दर्जा सुधारण्याच्या अनेक साधनांपैकी एक साधन आहे. परंतु या साधनाचा वापर करण्याचे ज्यांच्या हाती आहे तो आजचा प्राध्यापकवर्ग ही जबाबदारी पेलण्यास समर्थ आहे काय हा खरा प्रश्न आहे. आजचे शैक्षणिक वातावरण गढूळलेले आहे ही जरी वस्तुस्थिती असली तरी ज्या ठिकाणी बहुतांशी अनुकूल परिस्थिती आहे त्या शैक्षणिक संस्थामध्ये देखील सन्माननीय अपवाद वगळता प्राध्यापकवर्ग व विद्यार्थी भरपूर बौद्धिक श्रम करत असल्याचे दिसत नाही. त्यांच्यामध्ये स्वयंशिस्त आणि ज्ञानलालसा अभावानेच आढळतात. प्राध्यापकवर्गाची आजची आर्थिक परिस्थिती पूर्णपणे समाधानकारक नसली तरी ती निःसंशयपणे पूर्वीपेक्षा खूपच चांगली आहे. परंतु व्यावसायिक निष्ठेच्या अभावी उपलब्ध साधनांचाही पुरेपूर वापर आज प्राध्यापकांकडून होतो असे दिसत नाही. ग्रंथालयामध्ये आपल्या विषयाचे सहज मिळू शकणारे अभिजात ग्रंथ वाचावेत व त्यांचा परिचय विद्यार्थ्यांना करून द्यावा




अनुक्रमणिका





अशी तळमळ फारच कमी प्राध्यापकांना दिसून येते. ज्या विषयांना कमी विद्यार्थी असतात त्यांच्या बाबतीत तरी अधिक लक्ष देणे सहज शक्य असूनही फारसे काही केले जात नाही ही वस्तुस्थिती मनमोकळेपणाने मान्य करावयास हवी. प्रत्येक व्यवसायाची एक नीती असते. या नीतीचे आपण स्वयंस्फूर्तपणे पालन करतो का, याचा प्रत्येक प्राध्यापकाने अंतर्मुख होऊन विचार करण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली आहे. महाराष्ट्रामध्ये नुकत्याच झालेल्या संपाच्या वेळी प्राध्यापकांच्या कार्यभाराचा प्रश्न निर्माण झाला. या वेळी झालेल्या चर्चेच्या प्रसंगी शासन व प्राध्यापक संघटना या दोन्ही बाजूंनी उपस्थित केलेले अनेक मुद्दे गैरलागू व हास्यास्पद स्वरूपाचे होते. सध्या प्राध्यापकांना जितकी व्याख्याने घ्यावी लागतात ती अधिक मेहनतीने व चांगल्या रीतीने कशी घेता येतील, विद्यार्थ्यांच्या वर्गातील वाढत्या अनुपस्थितीबाबत काय करता येईल या प्रश्नांची गांभीर्याने चर्चा करण्याची आवश्यकता उभयपक्षांना वाटलीच नाही; कारण मुळामध्ये शासनाचा हेतू वेतनवाढीबरोबर वाढणारा खर्च कसा कमी करावयाचा हाच होता. कामचुकार प्राध्यापकांना काम करण्यास प्रवृत्त करण्याची नैतिक जबाबदारी आपली आहे असे प्राध्यापक संघटनेलाही कधी वाटत नाही. बहुतेक महाविद्यालयांतील आजची परिस्थिती अशी आहे की प्राचार्यांना महाविद्यालयाचे सर्व कामकाज काही मोजक्या सहकाऱ्यांच्या मदतीने करावे लागते. बहुतांश प्राध्यापक वर्गामध्ये ठरलेला वेळ शिकविण्यापलीकडे विद्यार्थ्यांबाबत आपली काही जबाबदारी आहे हे मानावयास तयार नाहीत. या सर्व परिस्थितीमध्ये शिक्षणक्षेत्रातील स्वायत्ततेच्या प्रश्नाची केवळ तात्त्विक रीतीने चर्चा करून काही फायदा नाही. शेवटी स्वायत्तता हे काही स्वयंभू तत्त्व नाही. स्वायत्ततेच्या तत्त्वाचा विचार उत्तरदायित्वाच्या तत्त्वाच्या संदर्भात झाला पाहिजे. एक समूह म्हणून प्राध्यापकांना जोपर्यंत विद्यार्थी व समाज यांच्याबाबत आपल्या उत्तरदायित्वाची प्रकर्षाने जाणीव होत नाही, तोपर्यंत विद्यापीठांच्या स्वायत्ततेबाबत समाजालाही फारसे सोयरसुतक वाटण्याचे कारण नाही. आणखी दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, विद्यापीठांची व महाविद्यालयांची स्वायत्तता हा आपल्या व्यवसायाच्या दृष्टीने प्राध्यापकांना अत्यंत महत्त्वाचा विषय वाटत असेल तर त्यासाठी प्रसंगी झीज सोसून प्रभावी लोकमत निर्माण करण्याची जिद्द आणि चिकाटी त्यांनी दाखविली पाहिजे. अन्यथा इतर गंभीर आर्थिक प्रश्न समोर ठाकलेले असताना जनतेला या प्रश्नाबद्दल जिव्हाळा वाटण्याचे काहीच कारण नाही. याउलट, स्वायत्ततेच्या प्रश्नाबाबत प्राध्यापकवर्गाला खरोखर आच असेल तर जनमत कसे जागृत करता येते याचे उत्तम उदाहरण म्हणून १९६५–६६ मध्ये उस्मानिया विद्यापीठाचे कुलगुरू, प्राध्यापक व विद्यार्थी यांनी एकत्रित रीत्या आंध्रप्रदेश शासनाच्या लहरी निर्णयाला जे आव्हान दिले त्याच्याकडे बोट दाखविता येईल. आंध्रप्रदेशच्या मुख्यमंत्र्यांनी राज्यातील विद्यापीठांच्या संबंधातील कायद्यांमध्ये अनेक दुरुस्त्या करण्याचा एकतर्फी घाट घातला. या दुरुस्त्यांमुळे राज्यातील विद्यापीठांच्या स्वायत्ततेवर फार मोठी बंधने येणार होती. इतक्या महत्त्वाच्या दुरुस्त्या करावयाच्या असूनही शासनाने विद्यापीठांशी कोणताही विचारविनिमय केला नाही. परंतु अखेरीला लोकमताच्या प्रभावी दडपणामुळे आणि प्राध्यापक व विद्यार्थी यांच्या अभूतपूर्व लढ्यामुळे या कायद्यातील सुचविलेल्या मूळ दुरुस्त्यांमध्ये शासनाला बदल करावा लागला. भारतीय विद्यापीठांनी स्वायत्ततेच्या रक्षणार्थ केलेल्या प्रयत्नातील हा एक ऐतिहासिक आणि गौरवपूर्व भाग होय. इतिहासाची काही अंशी पुनरावृत्ती अलीकडे महाराष्ट्रामध्ये झाली. आणि मुंबई विद्यापीठाच्या परीक्षांच्या बाबतीत हस्तक्षेप केल्याच्या कारणामुळे त्या वेळचे मुख्यमंत्री श्री. शिवाजीराव निलंगेकर पाटील व राज्यपाल कोना प्रभाकराव यांना अखेरीस राजीनामा द्यावा लागला. या दोन उदाहरणांमध्ये एक फरक मात्र महत्त्वाचा आहे. उस्मानिया विद्यापीठातील प्राध्यापक–विद्यार्थ्यांच्या लढ्याला त्या वेळचे प्रधानमंत्री लालबहादूर शास्त्री, शिक्षणमंत्री छगला व शिक्षणतज्ज्ञ सर सी. पी. रामस्वामी अय्यर यांसारख्या महान व्यक्तींचा नैतिक पाठिंबा मिळाला. मुंबई विद्यापीठाच्या प्रकरणामध्ये जनमत जागृत करण्याचे खरे श्रेय प्राध्यापक व विद्यार्थी यांच्याकडे नसून वृत्तपत्रांकडे आहे. तरीही प्रभावी जनमत मागे असताना विद्यापीठांच्या स्वायत्ततेचे रक्षण कसे करता येते हे या उदाहरणांनी स्पष्ट होते.



अनुक्रमणिका








– ४ –

उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामधील स्वायत्ततेचा विचार करीत असताना आता स्वायत्त महाविद्यालयांच्या निर्मितीबद्दल सध्या जी बरीच चर्चा सुरू आहे त्याची दखल घेतली पाहिजे. शिक्षणक्षेत्रातील स्वायत्ततेची संकल्पना एकदा मान्य केली की विद्यार्थी, प्राध्यापक व व महाविद्यालये यांना त्यांच्या क्षेत्रामध्ये स्वायत्तता मिळाली पाहिजे हे ओघाने आलेच. विद्यार्थ्यांना अध्ययनाच्या बाबतीत योग्य त्या अटी पूर्ण करून विषय निवडण्याचे, तो विषय आत्मसात करण्याचे व प्राध्यापकांच्या शिकवण्याचे मूल्यमापन करण्याचे स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. प्राध्यापकांना आपला विषय शिकवताना नवनवीन प्रयोग करण्याचे, निर्भयपणे शिकविण्याचे स्वातंत्र्य हवे. महाविद्यालयांना अभ्यासक्रम व परीक्षापद्धती यांची पुनर्रचना करण्याचे तसेच नवीन संशोधनप्रकल्प हाती घेण्याचे स्वातंत्र्य हवे. थोडक्यात म्हणजे शिक्षणाची प्रक्रिया ही सातत्याने चालू राहणारी प्रक्रिया असल्याने विद्यार्थी, प्राध्यापक यांना त्यांचे ज्ञान अद्ययावत राखण्यासाठी सुयोग्य परिस्थिती निर्माण करण्यासाठी महाविद्यालयांना स्वायत्तता हवी.

स्वायत्त महाविद्यालयाच्या योजनेचा इतक्या आग्रहाने आज पुरस्कार केला जात आहे त्यापाठीमागची पार्श्वभूमी समजून घेतली पाहिजे. भारतातील बहुतेक विद्यापीठे ही महाविद्यालयांना संलग्नता देऊन कार्य करणारी विद्यापीठे आहेत. विद्यापीठे व महाविद्यालये यांची संख्या भारतामध्ये उच्च शिक्षणाच्या प्रसाराला प्रारंभ झाला तेव्हा मर्यादित होती. विद्यापीठांचे कार्य सुरुवातीपासून महाविद्यालयांसाठी परीक्षा घेणारी आणि पदव्या देणारी मध्यवर्ती संस्था अशा प्रकारचे राहिले. सर्व महाविद्यालयांना समान अशा प्रकारचा अभ्यासक्रम आखणे हीदेखील विद्यापीठांची जबाबदारी होती. अशा रीतीने अध्यापन आणि संशोधन हे जे विद्यापीठाचे खरे कार्य त्याला जवळजवळ दुय्यम महत्त्व प्राप्त होऊन परीक्षा घेणे आणि पदव्या देणे यालाच विद्यापीठाच्या कामामध्ये महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले. यामुळे विद्यापीठांच्या प्रगतीला मोठी खीळ बसली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जवळजवळ पंचवीस वर्षेपर्यंत मुंबईसारख्या अग्रगण्य विद्यापीठांमध्ये अनेक विषयांचे विभाग सुरू झाले नव्हते यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. स्वातंत्र्यानंतरच्या काळामध्ये महाविद्यालयांच्या संख्येमध्ये बेसुमार वाढ झाली असून विद्यापीठाच्या प्रशासनावर त्याचा मोठा ताण पडत आहे. लक्षावधी विद्यार्थ्यांसाठी विविध विषयांच्या प्रश्नपत्रिका काढणे, त्या तपासून निकाल जाहीर करणे ही गोष्ट विद्यापीठांच्या प्रशासनाच्या आवाक्याबाहेर गेली असून त्यामुळे व्यक्तिगत वा सामुदायिक रीतीने कॉपी करणे, बेफिकिरीने प्रश्नपत्रिका तपासणे, गुणांची फिरवाफिरव करणे इत्यादी प्रकार मोठ्या प्रमाणावर वाढले असून सध्याची परीक्षापद्धती हा एक चेष्टेचा विषय झाला आहे. सामुदायिक कॉपीला आळा घालणे ही विद्यापीठाच्या शक्तीपलीकडची गोष्ट आहे असे मत नुकतेच पुणे विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. श्रीधर गुप्ते यांनी व्यक्त केले. त्यावरून परिस्थिती किती गंभीर झाली आहे याची कल्पना यावी. अशा परिस्थितीत अभ्यासक्रमांचे आधुनिकीकरण करणे, शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी प्रयत्न करणे या गोष्टींकडे विद्यापीठांना लक्ष द्यायला फारशी फुरसदच नाही. उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये जर काही सुधारणा व्हावी अशी अपेक्षा असेल तर म्हणूनच येथे विकेंद्रीकरणाची मोठी गरज आहे. स्वायत्त महाविद्यालयाच्या योजनेमुळे या विकेंद्रीकरणाच्या प्रक्रियेस गती मिळेल व उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये नवचैतन्याचे वारे वाहू लागेल अशी अपेक्षा व्यक्त केली जाते.

स्वायत्त महाविद्यालयांची कल्पना तसे पाहिले तर वीस-पंचवीस वर्षांपासून मांडली जात आहे. शिक्षण आयोगाच्या (१९६४-६६) प्रतिवृत्तामध्ये शक्य तेथे आवश्यक अटींची पूर्तता करणाऱ्या महाविद्यालयांना स्वायत्ततेचा दर्जा देण्याची सूचना केलेली होती. १९७३ मध्ये विद्यापीठ अनुदान आयोगाने आपल्या प्रतिवृत्तामध्ये स्वायत्त महाविद्यालयांच्या स्थापनेबाबतची मार्गदर्शक तत्त्वे, तसेच त्यांना द्यावयाचे अनुदान यांबाबतची सूत्रे ठरवून दिली. उच्च शिक्षणाच्या सध्याच्या व्यवस्थेमध्ये ८०%हून अधिक विद्यार्थी आपले शिक्षण महाविद्यालयांद्वारे पूर्ण करतात. तरीही सध्याच्या संलग्नतेच्या पद्धतीमध्ये या महाविद्यालयांना फारसे विद्याक्षेत्रिय स्वातंत्र्य नसून ही परिस्थिती बदलण्याची गरज आयोगाने प्रतिपादन केली. १९७५ मध्ये कुलगुरूंच्या परिषदेमध्ये सध्याची शिक्षणपद्धती अधिक लवचीक करून तिच्यात वैविध्य आणण्यासाठी व ती स्थानिक, प्रादेशिक व राष्ट्रिय गरजांना अभिमुख



करण्यासाठी स्वायत्त महाविद्यालयांच्या स्थापनेवर भर देण्यात आला. १९८०मध्ये कर्नाटक शासनाने नेमलेल्या कर्नाटक विद्यापीठ पुनरावलोकन आयोगाने ( के. एन्. राव आयोग ) महाविद्यालयांना द्यावयाची स्वायत्तता त्यांनी हाती घेतलेल्या शैक्षणिक प्रकल्पांवरून ठरवून त्या त्या प्रमाणात ती द्यावी अशी सूचना केली. केंद्र-सरकारने १९८५ मध्ये नवीन शैक्षणिक धोरण जाहीर केले. या शैक्षणिक धोरणामध्ये नवोदय विद्यालये सुरू करण्याबरोबरच उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये काही निवडक महाविद्यालयांना स्वायत्तता देण्याचा आग्रहाने पुरस्कार केला होता. ऑगस्ट १९८६ मध्ये घटक-राज्यांच्या शिक्षणमंत्र्यांची परिषद झाली. या परिषदे-मध्येही स्वायत्त महाविद्यालयांची कल्पना शक्य तितक्या लवकर प्रत्यक्षात आणण्याचे ठरविण्यात आले. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या सध्याच्या योजनेप्रमाणे सबंध देशा-मध्ये येत्या वर्षभरामध्ये सुमारे ५०० महाविद्यालयांना स्वायत्त महाविद्यालयांचा दर्जा देण्यात यावयाचा आहे.

– ५ –

या ठिकाणी स्वायत्त महाविद्यालयाची योजना थोड-क्यात समजून घेणे उचित होईल. स्वायत्त महाविद्या-लयांना आपला शैक्षणिक दर्जा वाढवून कालांतराने विद्यापीठ अनुदान आयोग विधिनियमांतील तरतुदीं-प्रमाणे विद्यापीठाचा दर्जा प्राप्त करणे शक्य आहे. किंबहुना स्वायत्त महाविद्यालयाच्या योजनेचा तो एक प्रमुख हेतू आहे. परंतु सध्या तरी स्वायत्त महाविद्या-लयांना आपल्या मातृविद्यापीठाच्या चौकटीमध्येच आवश्यक त्या स्वातंत्र्याचा लाभ घेऊन कार्य करावे लागणार आहे. स्वायत्त महाविद्यालयातून बाहेर पड-णाऱ्या विद्यार्थ्याला पदवी त्या विद्यापीठाचीच मिळेल. परंतु पदवी प्रमाणपत्रावर स्वायत्त महाविद्यालयाच्या नावाचा उल्लेख असेल. स्वायत्त महाविद्यालयाला विद्या-पीठातील सर्व उपलब्ध सेवा व तज्ज्ञ व्यक्तींचा सल्ला यांचा फायदा मिळणे चालूच राहील. विशेषतः मूल्यां-कनाच्या पद्धती परीक्षा पद्धतीची पुनर्रचना, प्राध्या-पकांची निवड, नवीन संशोधन प्रकल्पांची आखणी यांबाबतीत विद्यापीठातील विविध विषयांच्या विभागांचे स्वायत्त महाविद्यालयांना मोठ्या प्रमाणावर सहकार्य घेता येईल.

स्वायत्त महाविद्यालयांसाठी निवड करताना या महाविद्यालयांच्या पूर्वीच्या शैक्षणिक कामगिरीचे मूल्यांकन होणार असले तरी स्वायत्ततेचा दर्जा म्हणजे त्यासाठी देण्यात येणार असणारे इनाम नाही. या महाविद्यालयांना पुढील कालामध्ये सर्जनशील शक्तींना वाव देण्यासाठी विविध उपक्रम हाती घेण्या-साठी स्वायत्तता हे दिलेले एक साधन आणि संधी आहे. स्वायत्ततेच्या दर्जासाठी पात्र ठरविताना महा-विद्यालयातील उपलब्ध जागा, ग्रंथसंग्रह, आर्थिक पाठ-बळ व इतर सामग्री यांचा विचार केला जाईल. परंतु त्यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे महाविद्यालय चालविणाऱ्या संस्थेचे धोरण शैक्षणिक प्रयोगशीलतेला प्रतिसाद देणारे आहे का व तेथील प्राध्यापकवर्गाला आपला व्यासंग व संशोधन अव्याहत रीतीने चालू ठेवण्यास पुरेसे स्वातंत्र्य आणि अनुकूल वातावरण आहे का, याचा विचार करण्यात येईल.

महाविद्यालयाला स्वायत्ततेचा दर्जा मिळाला की सध्याच्या शैक्षणिक आकृतिबंधातील विद्यापीठपूर्व वर्ग त्या महाविद्यालयापासून अलग करण्यात येतील. या योगे या महाविद्यालयांना पदवी व पदव्युत्तर पातळी-वरील शैक्षणिक प्रकल्पांवर लक्ष केंद्रित करणे अधिक शक्य होईल.

त्या त्या विद्यापीठांच्या संबंधित विधिनियमांमध्ये योग्य ते बदल करून, राज्यशासन आणि विद्यापीठ अनुदान मंडळ यांच्या सहमतीने विद्यापीठाला एखाद्या महाविद्यालयास स्वायत्ततेचा दर्जा देता येईल. तथापि महाविद्यालयाला दिलेला हा दर्जा प्रारंभी पाच वर्षांच्या कालावधीसाठी असून तो पुढे टिकविण्यासाठी त्या महाविद्यालयाला सतत प्रयत्नशील राहावे लागेल. स्वायत्तता दिल्यानंतर तीन वर्षांनी एका समितीद्वारे महाविद्यालयाने बजावलेल्या कामगिरीचे मूल्यांकन होईल. या समितीमध्ये विद्यापीठ, शासन व विद्यापीठ अनुदान आयोगाचे प्रतिनिधी यांचा समावेश असेल. एखाद्या महाविद्यालयाने स्वायत्ततेच्या दर्जाला साजेशी कामगिरी बजावण्याकडे विशेष लक्ष दिले नसल्यास विद्यापीठ त्या महाविद्यालयाचा स्वायत्त दर्जा हिरावून घेऊ शकेल.

स्वायत्त दर्जा मिळवू पाहणाऱ्या महाविद्यालयाने तत्पूर्वी भरपूर आवश्यक ती तयारी केली पाहिजे असे विद्यापीठ अनुदान आयोगाचे मत आहे. महाविद्यालयाने स्वायत्ततेचा दर्जा मिळविण्याअगोदर आपल्या प्राध्यापक-वर्गाला त्याची संपूर्ण कल्पना देऊन त्यांना विश्वासात

घेतले पाहिजे. महाविद्यालयातील प्रत्येक विभागाने आपल्या विषयांचे सुधारित अभ्यासक्रम मेहनतीने तयार केले पाहिजेत. हे अभ्यासक्रम ठरवताना त्यांनी समाजाच्या बदलत्या गरजांची जाणीव ठेवली पाहिजे अशी अपेक्षा आहे. याचबरोबर अशा महाविद्यालयांना विद्यापीठाची काही कार्ये पार पाडावी लागणार असल्याने त्यांना आपल्या प्रशासनामध्येदेखील योग्य ते बदल करावे लागतील.

स्वायत्त महाविद्यालयाचा कारभार एखाद्या विद्यापीठाप्रमाणे चालेल. त्यासाठी त्या महाविद्यालयामध्ये व्यवस्थापन मंडळ, विद्वत्सभा, अभ्यास मंडळ यांसारख्या समित्या असतील. याशिवाय आर्थिक समिती, नियोजन आणि मूल्यांकन समिती, प्रवेश समिती, ग्रंथालय समिती, विद्यार्थी कल्याण समिती, अभ्यासेतर उपक्रम समिती इत्यादी समित्या नेमण्यात येतील व त्या महाविद्यालयाच्या विकासाकडे लक्ष पुरवतील.

प्रत्येक वर्षी स्वायत्त महाविद्यालयाने स्वयंमूल्यांकन करावयाचे आहे. या बाबतीत या महाविद्यालयांनी विद्याक्षेत्रीय उद्दिष्टे आणि राष्ट्रिय विकास यांना अनुरूप अशा प्रकारे बाह्य आणि अंतर्गत जबाबदारीचे दंडक ठरवावेत. बाह्य जबाबदारीमध्ये अभ्यासक्रमांचा आशय, त्यांची पुनर्रचना, अभ्यासेतर व अभ्यासपूरक उपक्रम, विद्यार्थ्यांची कामगिरी, प्राध्यापकांचे ज्ञान आणि संशोधन या क्षेत्रातील योगदान तसेच विस्तारसेवा कार्यातील त्यांचा सहभाग इत्यादींचा समावेश होईल. अंतर्गत जबाबदारीमध्ये कार्यक्षमता, साधनसामग्रीतील वाढ, सरासरी कार्यभार व त्याचे व्याख्याने, चर्चासत्रे, प्रकल्प इत्यादींमधील वाटप, ग्रंथालयातील उपलब्ध ग्रंथ आणि नियतकालिके इत्यादींचा समावेश करता येईल.

स्वायत्त महाविद्यालयांना त्यांनी हाती घेतलेले शैक्षणिक प्रकल्प कार्यक्षमतेने राबविण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाने आर्थिक मदतीची योजना तयार केली आहे. त्याप्रमाणे पदवीपर्यंतचे वर्ग असलेल्या महाविद्यालयांना प्रतिवर्षी ४ ते ६ लाख रुपये तर पदवी व पदव्युत्तर महाविद्यालयांना प्रतिवर्षी सात लाख रुपयांपर्यंतचे अनुदान विद्यापीठ अनुदान आयोगाकडून मिळेल. या साधारण स्वरूपाच्या आर्थिक मदतीव्यतिरिक्त आयोग स्वायत्त महाविद्यालयांच्या इमारती, साधनसामग्री, प्रयोगशाळा इत्यादींबाबतच्या गरजांचा त्या त्या विशिष्ट संदर्भात विचार करून अधिक अनुदान देईल. याशिवाय संशोधन, ग्रंथलेखन इत्यादींसाठी आयोगाकडून इतर महाविद्यालयांना मिळणाऱ्या अनुदानयोजनांचा फायदा स्वायत्त महाविद्यालयांनाही घेता येईल.

महाविद्यालयाला देण्यात आलेल्या स्वायत्ततेमुळे प्राध्यापक व इतर कर्मचारीवर्गाच्या सेवाशर्तींमध्ये कोणत्याही प्रकारचा बदल होणार नाही. तसेच विद्यापीठाशी संलग्न असलेल्या महाविद्यालयातील प्राध्यापक व इतर कर्मचारी यांच्या सेवाशर्तींमध्ये वेळोवेळी जे लाभदायक बदल होतील त्याचाही फायदा स्वायत्त महाविद्यालयातील प्राध्यापक व कर्मचारीवर्ग यांना मिळेल.

स्वायत्त महाविद्यालयातून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांना विद्यापीठाच्या किंवा अन्य ठिकाणच्या उच्च पातळीवरील अभ्यासक्रमांसाठी प्रवेश मिळवताना अडचणी उद्‌भवू नयेत याची विद्यापीठांनी काळजी घ्यावी अशी विद्यापीठ अनुदान आयोगाची सूचना आहे.

— ६ —

स्वायत्त महाविद्यालयाच्या या योजनेवर अनेकांनी विशेषतः प्राध्यापक संघटनांनी टीका केली आहे. प्रत्यक्षामध्ये स्वायत्त महाविद्यालयांचा दर्जा सबंध देशामध्ये आतापर्यंत पंधराहून अधिक महाविद्यालयांना मिळालेला नसून त्यांतील बहुतेक महाविद्यालये तामीळनाडूमधील आहेत. या स्वायत्त महाविद्यालयांची त्यांना हा दर्जा मिळाल्यानंतरची कामगिरी फारशी समाधानकारक नाही. यासंबंधी प्राध्यापक संघटनांनी केलेली टीका सहज मान्य होण्याजोगी आहे. या स्वायत्त महाविद्यालयांनी आपल्या दर्जाचा दुरुपयोग केल्याची अनेक उदाहरणे आहेत. या महाविद्यालयांनी स्वायत्ततेचा वापर प्राध्यापकांना त्रास देण्यासाठी केला, परीक्षांमध्ये अनेक गैरप्रकार केले अशा प्रकारची टीका झाली आहे. अभ्यासक्रमांचे आधुनिकीकरण, मूल्यमापनाच्या पद्धतीतील बदल इत्यादी अनेक उद्दिष्टांनी स्वायत्तता देण्यात आली ती प्रत्यक्षात फलद्रूप झाली नाहीत. ही सर्व टीका खरी असली तरी या संदर्भात एकदोन महत्त्वाचे मुद्दे विचारात घेण्याजोगे आहेत. एक तर तामीळनाडूमध्ये ज्या महाविद्यालयांना स्वायत्तता देण्यात आली त्यांपैकी बहुतेक सर्व धार्मिक अल्पसंख्याक संस्थांतर्फे चालविण्यात आलेली महाविद्यालये होती. दुसरी महत्त्वाची गोष्ट




म्हणजे या सर्व अनुभवातून बोध घेऊन विद्यापीठ अनुदान आयोगाने स्वायत्त महाविद्यालयांच्या स्थापनेबाबत नवीन सुधारित मार्गदर्शक तत्त्वे घालून दिली आहेत. त्यामुळे पूर्वीच्या प्रयोगातील त्रुटी मोठ्या प्रमाणावर दूर होण्याचा संभव आहे.

तथापि स्वायत्त महाविद्यालयांवरील प्राध्यापक संघटनांची टीका वैचारिक भूमिकेवरूनही आहे. त्यासंबंधी थोडी चर्चा करणे जरूर आहे. स्वायत्त महाविद्यालयांमुळे समाजातील धनिक वर्गातील मुलांकडे अधिक लक्ष पुरविण्यात येईल. प्रस्थापित हितसंबंधियांची शिक्षणक्षेत्रामध्ये मिरासदारी निर्माण होईल, देशामध्ये गुणवत्तेच्या संवर्धनाच्या नावाखाली काही महाविद्यालयांकडे आर्थिक मदतीचा ओघ वळेल व ती उच्चभ्रू वर्गासाठी असलेली समाजाच्या मुख्य प्रवाहापासून स्वतंत्र अशी बेटे बनतील व अखेरीस सामान्यांची मुले ज्या इतर महाविद्यालयांतून शिकणार त्यांना पुरेशा आर्थिक मदतीविना कायम मागे राहावे लागणार त्या साधारण स्वरूपाच्या महाविद्यालयांच्या पदव्यांचे बाजारामध्ये अवमूल्यन होणार व त्याचे दुष्परिणाम ज्या हुशार विद्यार्थ्यांना एखाद्या लहान गावी शिक्षण घ्यावे लागते वा ज्यांची आर्थिक कुवत नाही अशांना भोगावे लागतील, अशा स्वरूपाची ही टीका आहे.

शिक्षणाच्या क्षेत्रातील समतेसंबंधी आग्रह धरणे हे आपल्या घटनेतील उद्दिष्टांशी अगदी सुसंगत आहे. ज्या लोकशाही समाजवादी समाजाची धारणा भारतीय प्रजासत्ताकामध्ये करावयाची आहे, तेथील शिक्षणव्यवस्था सामाजिक न्यायाच्या तत्त्वांवर अधिष्ठित असली पाहिजे याबाबत दुमत होण्याचे काहीच कारण नाही. तसे पाहिले तर शिक्षणाच्या क्षेत्रातील सामाजिक न्यायासंबंधीची चर्चा ब्रिटिश काळापासून होत आलेली आहे. ब्रिटिश राजवटीच्या प्रारंभी शिक्षणासंबंधीचा झिरपण्याचा जो सिद्धान्त तत्कालीन ब्रिटिश शिक्षण तज्ज्ञांनी मांडला त्यावर महात्मा ज्योतिबा फुले व इतर समाजसुधारकांनी मोठा हल्ला चढवला व त्यांची त्याबाबतची टीका अगदी रास्त होती. परंतु स्वातंत्र्यानंतर आज चाळीस वर्षांनंतर परिस्थिती पूर्णपणे नसली तरी बऱ्याच अंशी बदलली आहे हे अमान्य करून चालणार नाही. अनेक समाजसुधारकांचे प्रयत्न आणि शासनाची मदत यांच्यामागे शिक्षणाची गंगा ग्रामीण भागामध्ये दूरवर पोहोचली आहे. तालुका पातळीवर महाविद्यालये स्थापन झाली आहेत. शासनाने दिलेल्या अनेक सोयी आणि सवलतींमुळे आर्थिक व सामाजिक दृष्टीने मागासलेल्या वर्गातील मुले मोठ्या प्रमाणावर उच्च शिक्षणाचा लाभ घेत आहेत. अशा परिस्थितीमध्ये शिक्षणाच्या संख्यात्मक वाढीबरोबर गुणात्मक वाढीचा गंभीरपणे विचार करण्याची वेळ निःसंशयपणे आलेली आहे.

खरे म्हणजे विद्यापीठ अनुदान आयोगाच्या योजनेप्रमाणे नजीकच्या पंधरा-वीस वर्षांमध्ये अधिकाधिक महाविद्यालयांना स्वायत्ततेचा दर्जा देण्याचा प्रयत्न होणार आहे. तसे झाल्यास स्वायत्त महाविद्यालयाचे फायदे उच्चभ्रू वर्गापुरते मर्यादित राहतील ही टीकाही गैरलागू ठरेल. सोवियत संघ आणि इतर अनेक साम्यवादी देशांमध्येदेखील शैक्षणिक संस्थांतील प्रवेश अनेक तऱ्हेने नियंत्रित केलेला आहे हेही सामाजिक न्यायाच्या पुरस्कर्त्यांनी लक्षात ठेवण्याजोगे आहे. स्वायत्ततेचा दर्जा काही महाविद्यालयांना मिळाल्यानंतर असा दर्जा मिळविण्यासाठी इतर महाविद्यालयांमध्ये एक निरोगी स्पर्धा निर्माण होईल, तसेच मिळालेला स्वायत्ततेचा दर्जा टिकविण्यासाठी स्वायत्त महाविद्यालयांना सातत्याने प्रयत्न करावे लागणार आहेत. या सर्व गोष्टींमुळे उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये नवीन विचारमंथनाला सुरुवात होईल व शैक्षणिक दर्जा उंचावण्यास मदत होईल.

या सर्वांचा अर्थ स्वायत्त महाविद्यालयाचा प्रयोग म्हणजे जादूची कांडी आहे असा नव्हे. शिक्षणक्षेत्रातील स्वायत्ततेच्या मर्यादांचा वर विस्ताराने उल्लेख आलेला आहेच. परंतु त्याबरोबरच स्वायत्त महाविद्यालयांच्या प्रयोगाला विरोध करण्याचे धोरण प्राध्यापक संघटनांनी सोडून हा प्रयोग यशस्वी करण्यासाठी आपल्या बाजूने पूर्ण सहकार्य देण्याचे ठरविले तर ते योग्य होईल असे म्हणावेसे वाटते. स्वायत्त महाविद्यालयांमुळे त्यांचे व्यवस्थापन पाहणाऱ्या संस्थांमध्ये राजकारणाला ऊत येईल व त्याचे परिणाम प्राध्यापकवर्गाला भोगावे लागतील हे प्राध्यापक संघटनांचे मत इशारा म्हणून लक्षात ठेवण्यास हरकत नाही. परंतु त्याचा फार बाऊ करण्यात अर्थ नाही. एक तर विद्यापीठ अनुदान मंडळ व शासन यांची सर्व नियंत्रणे या संस्थांना पाळावी लागणार आहेत. शिवाय प्राध्यापक संघटनांचे सध्याचे बळ पाहता शैक्षणिक संस्था या बाबतीत एका मर्यादेपलीकडे जातील

असे वाटत नाही. आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी की स्वायत्त महाविद्यालयांना विद्याक्षेत्रीय, प्रशासकीय व आर्थिक क्षेत्रांतील स्वायत्तता अनेक मर्यादांसहित देण्यात येणार आहे. त्यामुळे ज्या महाविद्यालयातील प्राध्यापकवर्गाला या प्रयोगाविषयी कळकळ आणि आत्मीयता असेल तेथेच तो यशस्वी ठरेल हे उघड आहे. स्वायत्त महाविद्यालयांमुळे महाविद्यालयांचे दोन वर्ग निर्माण होतील व त्यामुळे इतर साधारण महाविद्यालयांना महत्त्व राहणार नाही असेही प्राध्यापक संघटनांचे मत आहे. या संदर्भात असे लक्षात ठेवले पाहिजे की, सध्या असा कोणत्याही प्रकारचा औपचारिक भेद नसतानाही सर्वसामान्य व्यक्तीच नव्हे तर शिक्षणक्षेत्रातील व्यक्तीदेखील मनामध्ये दोन महाविद्यालये वा दोन विद्यापीठे यांची तुलना करून त्यांचा मनामध्ये काही एक दर्जा गृहीत धरतात. आणि असे असण्यामध्ये सर्वसामान्यतः काही गैर नसते. ज्या महाविद्यालयांना आपला दर्जा सुधारावा असे खरोखरी वाटत असेल त्यांनी त्या दृष्टीने कसोशीने प्रयत्न करणे हेह इष्ट होय. उलट प्राध्यापकसंघटनांनी स्वायत्त महाविद्यालयाच्या प्रयोगाला पूर्ण सहकार्य दिल्यानंतर जर शासनाच्या किंवा विद्यापीठ अनुदान मंडळाच्या अपुऱ्या मदतीमुळे असा प्रयोग अयशस्वी ठरल्यास त्यांना दोष देण्याचा नैतिक अधिकार प्राध्यापक संघटनांना प्राप्त होईल व आज जनमानसामध्ये त्यांची मलिन झालेली प्रतिमा स्वच्छ होण्यास मदत होईल.

स्वायत्त महाविद्यालयांना पर्यायी योजना म्हणून शिक्षणव्यवस्थेचे लोकशाहीकरण, अभ्यासक्रमांची सार्वत्रिक पुनर्रचना, प्राध्यापक-विद्यार्थी यांचे सुयोग्य प्रमाण, सुधारित मूल्यमापन प्रक्रिया इत्यादी उपाय प्राध्यापक संघटनांनी सुचविले आहेत त्याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. प्रश्न एवढाच आहे की, यांतील बऱ्याच गोष्टी (प्राध्यापक-विद्यार्थी यांचे सुयोग्य प्रमाण यासारखा अपवाद वगळून) प्राध्यापकवर्गाला सध्याच्या चौकटीमध्ये राहून करता येण्याजोग्या आहेत. विद्यापीठाच्या विविध घटकांमध्ये वास्तविक प्राध्यापकांचेच बहुमत असते. तरीही या सर्व घटकांमध्ये जे राजकारण चालते त्याचा उल्लेख वर आलाच आहे. तेव्हा शिक्षण व्यवस्थेच्या लोकशाहीकरणाची प्रक्रिया ही एकतर्फी नाही. तिच्यामध्ये प्राध्यापकवर्गाचाही मोठा हातभार असला पाहिजे हे मान्य करावे लागेल. शासन आणि खाजगी संस्था यांची उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील भूमिका फारशी स्पृहणीय आहे असे नाही. त्याचाही उल्लेख सुरुवातीच्या विवेचनामध्ये आला आहे. परंतु प्राध्यापकवर्गाखेरीज शिक्षणव्यवस्थेचा त्रिकोण पूर्ण होत नाही. तेव्हा शासन आणि खाजगी संस्थांचे निमित्त करून प्राध्यापकवर्गाने नकारात्मक भूमिका घेणे हे त्यांना शोभादायक नाही; गेल्या वर्षी महाराष्ट्रामध्ये झालेल्या प्राध्यापक संपाच्या वेळेला संपामध्ये सहभागी न झालेल्या प्राध्यापकांच्या बाबतीत अनेक शहरांमध्ये संपकरी प्राध्यापकांनी जे असहिष्णु वृत्तीचे प्रदर्शन केले त्यावरून शासन व खाजगी संस्थांप्रमाणेच प्राध्यापक संघटनादेखील किती टोकाची भूमिका घेतात ते दिसून आले आहे. शैक्षणिक व्यवस्थेचे लोकशाहीकरण करणे याचा अर्थ अराजक निर्माण करणे खचित नाही.

स्वायत्त महाविद्यालयांना पर्याय म्हणून प्राध्यापकसंघटनांनी महाविद्यालयांच्या विद्यापीठीकरणाचा एक जालीम तोडगा सुचविला आहे. त्यामुळे खाजगी संस्थांच्या ऐवजी विद्यापीठांना महाविद्यालयांच्या व्यवस्थापनाचा अधिकार प्राप्त होईल. अशा प्रकारचे विद्यापीठीकरण योग्य की अयोग्य हा स्वतंत्र चर्चेचा विषय आहे. परंतु त्यामुळे उच्च शिक्षणामध्ये अधिकाराचे आत्यंतिक केंद्रीकरण होण्याचा धोका संभवतो, हे येथे नमूद करावेसे वाटते. सध्या हाती असलेल्या परीक्षा जेथे विद्यापीठ प्रशासनाला वेळेवर पार पाडता येत नाहीत तेथे महाविद्यालयांच्या व्यवस्थापनाची प्रचंड जबाबदारी विद्यापीठे कशी पार पाडतील याबद्दल शंकाच आहे. विद्यापीठाला राजकारणाच्या आखाड्याचे स्वरूप प्राप्त करून देणाऱ्या सध्याच्या उपद्व्यापी व्यक्तींना धुमाकूळ घालण्यासाठी एक विस्तृत क्षेत्र उपलब्ध होईल यापलीकडे त्याची अधिक फलश्रुती होणार नाही. अशा तऱ्हेची मागणी करण्याअगोदर प्राध्यापक संघटनेने सहकारी तत्त्वावर एखादे महाविद्यालय उत्तम रीतीने चालवून दाखविल्यास तो एक आदर्श नमुना म्हणून इतर खाजगी संस्थांना दाखविता येईल.

स्वायत्त आणि महाविद्यालयांना विद्यापीठ अनुदान आयोगाकडून प्रतिवर्षी काही अनुदान मिळणार आहे. सद्यःपरिस्थितीत निदान काही महाविद्यालयांना याचा लाभ घेऊन शैक्षणिक क्षेत्रामध्ये नवीन उपक्रम हाती घेता येतील. अखेरीस शैक्षणिक क्षेत्रातील जिवंतपणा

हा सातत्याने चालणाऱ्या विविध स्वरूपांच्या आणि नवनवीन उपक्रमांवर अवलंबून असतो. स्वायत्त महाविद्यालयांना विरोध म्हणजे शिक्षणक्षेत्रातील प्रयोगशीलतेला आणि चैतन्याला विरोध. एक गोष्ट खरी की स्वायत्त महाविद्यालयांना दिल्या जाणाऱ्या अनुदानाचा वापर सर्व ठिकाणी योग्य रीतीने होईलच असे नाही. त्यामध्ये खोटेपणा, भ्रष्टाचार काही प्रमाणात राहणार हे गृहीत धरलेच पाहिजे. कोणतीही अभिनव आणि हितप्रद योजना प्रत्यक्षात नाकर्तेपणामुळे, अनुत्साहाने वा अप्रामाणिकपणाने अयशस्वी करण्याचे कसब भारतीयांकडे–विशेषतः सुशिक्षित भारतीयांकडे– आहे. परंतु तरीही नवीन उपक्रम हाती घेऊ इच्छिणारे तळमळीचे अध्यापक, संशोधक व संस्था या देशामध्ये ठिकठिकाणी निश्चितपणे आहेत. अनेक महाविद्यालयांतील व विद्यापीठांतील तरुण प्राध्यापक व विद्यार्थी यांना शिक्षणक्षेत्रामध्ये नवपरिवर्तन घडवून आणण्याची इच्छा आहे. त्यांच्या उपक्रमशीलतेची कदर करण्यासाठी तरी स्वायत्त महाविद्यालयांचा प्रयोग अवश्य हाती घेतला पाहिजे. अन्यथा बुद्धिमान तरुण भारतीय संशोधक परदेशी जातात व तेथे स्थायिक होतात अशी टीका करण्याला फारसा अर्थ राहणार नाही.

— ७ —

शिक्षणक्षेत्रातील स्वायत्तता टिकवायची असेल तर फार मोठ्या प्रमाणावर सामाजिक, आर्थिक बदल घडवून आणावे लागतील याचा उल्लेख वर केलाच आहे. परंतु हे सर्व बदल झाल्यानंतर शिक्षणक्षेत्रात परिवर्तन घडून येईल या अपेक्षेने वाट पाहण्याऐवजी आहे त्या परिस्थितीमध्ये शिक्षणाचा दर्जा वाढवण्यासाठी व शिक्षणक्षेत्रातील सध्याचे असामंजस्याचे व कटुतेचे वातावरण निवळण्यासाठी काही व्यावहारिक मार्ग सापडतो का, या दृष्टीने काही सूचना खाली केल्या आहेत.

(१) प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाचा दर्जा सुधारल्याखेरीज उच्च शिक्षणाचा दर्जा कदापि सुधारणार नाही. स्वायत महाविद्यालयांवरील खर्च विद्यापीठ अनुदान मंडळ करणार आहे तेव्हा निवडक प्राथमिक व माध्यमिक शाळांमध्ये नवीन शैक्षणिक उपक्रम हाती घेण्याचा शासनाने प्रयत्न करावा व त्यासाठी सढळ हाताने खर्च करावा. केंद्रसरकारने सुरू केलेल्या नवोदय शाळा व हा प्रयोग याची गल्लत होऊ नये. सध्या शासनाकडून नवीन उपक्रम हाती घेणाऱ्या प्राथमिक व माध्यमिक शाळांसाठी जी प्रेरक अनुदाने दिली जातात ती प्रतीकात्मक स्वरूपाची आहेत. त्यांमध्ये भरपूर वाढ झाली पाहिजे. या बदलाखेरीज सर्व स्तरांवरील विद्यार्थ्यांना नंतर स्वायत्त महाविद्यालयांचा अपुऱ्या तयारीमुळे लाभ घेता येणार नाही.

(२) महाविद्यालयांची आर्थिक परिस्थिती सुधारण्याची अत्यंत मोठी आवश्यकता आहे. यासाठी शासनाने प्राध्यापक संघटना व विद्यार्थी संघटना यांना विश्वासात घेऊन कोणती उपाययोजना करता येईल याबद्दल विचारविनिमय करावा. शासनाचे या बाबतीतील धोरण अत्यंत दिरंगाईचे आहे. महाविद्यालयांना इमारतींसाठी कर्जाऊ रक्कम देण्याचे धोरण वर्षभरापूर्वी जाहीर केले गेले परंतु त्या संदर्भात नंतर कोणतीही हालचाल झालेली नाही. शेतकऱ्यांना कर्जमाफी देण्याइतकाच हा प्रश्नदेखील महत्त्वाचा आहे अशी निकड शासनाला वाटली पाहिजे. महाविद्यालयांना आपल्या इमारतींची देखभाल करता यावी व नवीन सामग्री विकत घेता यावी यासाठी प्रत्येक महाविद्यालयामध्ये एक महाविद्यालय विकास निधी असावा. प्रवेश घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याकडून या निधीसाठी प्रतिवर्षी शंभर रुपये घ्यावेत. सध्या बहुसंख्य विद्यार्थी खाजगी क्लासेसना जाऊन भरपूर फी भरतात. त्यांच्यासाठी ही रक्कम जास्त नाही. तथापि ज्या गरीब विद्यार्थ्यांना एवढीही रक्कम भरण्याची कुवत नसेल अशा विद्यार्थ्यांची ही अतिरिक्त फी शासनाने द्यावी. विकास निधीमध्ये जमा होणारा पैसा व महाविद्यालयाला नियमाप्रमाणे मिळणारे अनुदान यांचा संबंध असू नये. याचा अर्थ असा की विकास निधीमध्ये जमा होणाऱ्या रकमेमुळे महाविद्यालयाच्या नेहमीच्या अनुदानात कोणतीही कपात करू नये.

(३) अभ्यासक्रमांचे आधुनिकीकरण करण्यामध्ये प्राध्यापक संघटनांनी पुढाकार घेऊन प्रत्येक विषयासाठी तज्ज्ञ प्राध्यापकांच्या समित्या नेमाव्यात व त्यांनी सादर केलेल्या अहवालावर चर्चासत्रे आयोजित करावीत. यामुळे प्राध्यापकवर्गामध्ये आपल्या विषयासंबंधी एक नवीन जाणीव निर्माण होऊ शकेल. अशा प्रकारच्या चर्चासत्रांना विद्यापीठ अनुदान मंडळाकडून आर्थिक व इतर साहाय्य घेण्याचा प्रयत्न करावा.

(४) आचार्य विनोबा भावे आचार्यकुलाची कल्पना मांडली होती. ती थोडचा वेगळ्या पद्धतीने प्रत्यक्षात आणता येईल. महाराष्ट्रापुरते बोलायचे झाले तर उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील बऱ्याच समस्या शासन, प्रशासकीय सेवावर्ग, प्राध्यापक संघटना, खाजगी संस्था व विद्यार्थी संघटना यांच्यामध्ये योग्य तो संवाद नसल्याने निर्माण झालेल्या परस्परांबद्दलच्या अविश्वासाच्या भावनेतून उद्भवलेल्या आहेत. यासाठी प्राध्यापक संघटनांनी अथवा शासनाने पुढाकार घेऊन उच्च शिक्षणाबद्दल ज्यांना आस्था आहे असे निःस्पृह शिक्षणतज्ज्ञ, न्यायाधीश, माजी कुलगुरू, वृत्तपत्रसंपादक, सामाजिक कार्यकर्ते यांची एक सल्लागार समिती नेमावी. उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील कोणत्याहि गंभीर समस्येची किंवा संपासारख्या प्रश्नाची या सल्लागार समितीमध्ये अगोदर चर्चा व्हावी. शासन, प्राध्यापक संघटना व विद्यार्थी संघटना यांना एकत्र आणून त्यांच्यातील तणाव नाहीसे करण्याच्या दृष्टीने या सल्लागार समितीने शिफारसी कराव्यात. सल्लागार समितीने सुचविलेल्या शिफारसी कोणावरही बंधनकारक मानू नयेत. परंतु त्यामुळे जनतेसमोर कोणत्याही शैक्षणिक समस्येबाबत तटस्थ भूमिकेतून सर्व बाजू येऊ शकतील.

शिक्षणक्षेत्रातील स्वायत्ततेचा व वर उल्लेख केलेल्या सूचनांचा तार्किक संबंध काय अशी शंका कदाचित कोणाच्या मनात येईल. परंतु बारकाईने विचार केला तर असे लक्षात येईल की उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये निर्माण झालेल्या काही सर्वसाधारण परंतु महत्त्वाच्या समस्यांचे निराकरण झाल्याखेरीज तसेच या क्षेत्रातील असामंजस्याचे व परस्परांबद्दलच्या अविश्वासाचे मळभ दूर झाल्याखेरीज विद्यापीठांची स्वायत्तताही टिकू शकणार नाही किंवा स्वायत्त महाविद्यालयांचा प्रयोगही यशस्वी होणार नाही.

## संदर्भ


1. Dongerkery S. R. – *University Autonomy in India*, Lalvani Publishing House, Bombay, 1967.

2. Goudino Robert L. – *The Indian University*, Popular Prakashan, Bombay, 1965.

3. Shah A. B. (Ed.) – *Higer Education in India*, Lalvani Publishing House, Bombay, 1967.

4. Shah A. B. (Ed.) – *Education, Scientific Policy and Developing Societies.*, Manktales, Bombay, 1967.

5. Raza Moonis, Aggarwal Y. P., Hasen Mabud – *Higher Education in India*; National Institute of Education Planning, New Delhi.

6. Government of India – *The Challange of Education*; 1985.

7. Bangalore University College Teachers Association, *College Autonomy*, Bangalore, 1985.












# महाविद्यालयीन शिक्षणाचे धोरण : संदर्भ आणि समस्या

देवदत्त दाभोलकर

**जागतिक पार्श्वभूमी**

विकसनशील व अतिप्रगत अशा दोन्ही राष्ट्रांतील उच्च शिक्षणाच्या संदर्भातील समस्या वेगवेगळ्या स्तरावरच्या असल्या तरी सामान्यत: एकाच पद्धतीच्या आहेत.

जानेवारी १९८९ मध्ये झालेल्या जागतिक शिक्षण परिषदेने 'उच्च शिक्षण' हा आपला मुख्य चर्चाविषय ठेवला होता. यूनेस्कोचे सभासद असलेल्या सर्व राष्ट्रांचे अधिकृत प्रतिनिधी या परिषदांना उपस्थित असतात. अन्यही काही तज्ज्ञ मंडळी असतात.

या परिषदेपुढे विचारासाठी असलेली उच्च शिक्षणाच्या समस्येची विविध अंगे अशी होती :

(१) उच्च शिक्षणाचा प्रसार प्राथमिक व दुय्यम शिक्षणापेक्षा अधिक वेगाने होत आहे.

(२) यामुळे सुशिक्षितांची संख्या वाढते परंतु सुशिक्षितांमधील बेकारी व अर्धबेकारीचे प्रमाणही वाढते असा अनुभव येत आहे.

(३) समाजातील वंचित वर्गाकडून उच्च शिक्षणाची मागणी जोराने पुढे येत आहे. सामाजिक न्यायाच्या दृष्टीने ते इष्टही आहे. सामाजिक प्रतिष्ठा व आर्थिक लाभ या दोन्ही कारणांनी वंचित वर्गाचा उच्च शिक्षण मिळण्याविषयी आग्रह असतो.

(४) दुय्यम शाळेच्या स्तरावरील शिक्षणाचा विचार केला तर व्यावसायिक शिक्षण व महाविद्यालयीन शिक्षण असे दोन प्रवाह मानता येतील. व्यावसायिक शिक्षणाचा प्रवाह अधिक प्रभावी कसा करता येईल, ही एक प्रमुख समस्या आहे.

(५) उच्च स्तरावरील शिक्षणाच्या गुणवत्तेचा प्रश्न हा राष्ट्राच्या दृष्टीने दोन कारणांसाठी महत्त्वाचा असतो. एक तर आपल्याविरोधी राष्ट्राशी संरक्षण-सामर्थ्याच्या संतुलनाच्या दृष्टीने (जसे अमेरिका-रशिया, किंवा भारत-पाकिस्तान), दुसरे आंतरराष्ट्रिय व्यापारातील आर्थिक स्पर्धेत यश मिळावे यासाठी (जसे, जपान-अमेरिका-पश्चिम यूरोप आदी).

(६) विज्ञान आणि तंत्रज्ञान झपाट्याने प्रगत होत आहे. उच्च शिक्षणाने ही प्रगती सतत आत्मसात करीत राहिले पाहिजे. यासाठी अभ्यासक्रम व अध्ययन-अध्यापनपद्धती अद्ययावत असावयास पाहिजे. तंत्र-विकास झाला की, कालचे सुशिक्षित व प्रशिक्षितही आज अशिक्षित ठरू शकतात. हा अनुभव प्रगत राष्ट्रांमध्ये आता दर पंधरावीस वर्षांनी येत आहे. या लोकांच्या बेकारीचा किंवा नव्याने परत प्रशिक्षणाचा प्रश्न आज प्रगत राष्ट्रांपुढे उभा आहे. यांत्रिकीकरणातून येणाऱ्या बेकारीचा प्रश्न अप्रगत राष्ट्रांतही आज ग्रामोद्योग, लघुउद्योग एवढ्यांपुरताच मर्यादित राहिलेला नाही. कॉम्प्यूटरच्या स्वीकाराला संघटित कामगार वर्गाकडून (बँका आदी) होणारा विरोधही याच प्रकारचा आहे.

(७) उच्च शिक्षणाने व्यक्तीची किंवा एकूण समाजाचीही केवळ भौतिक समृद्धी साधून चालणार नाही, तर, उच्च शिक्षणाने व्यक्तीच्या व समाजाच्या जीवनाला अर्थ प्राप्त करून देतील अशी जीवनमूल्येही शिकविली पाहिजेत असा विचार मांडला जात आहे. 'Gandhi with Satellite' अशी आवश्यकता अल्विन टॉफलर प्रतिपादन करत असतो त्या वेळी समस्येच्या याच अंगाची मांडणी करण्याचा तो प्रयत्न असतो.

या समस्यांची संख्या आणखीही वाढविता येईल. परंतु या प्रश्नाचे महत्त्वाचे पैलू लक्षात येण्याच्या दृष्टीने एवढे निर्देश पुरेसे आहेत.

या समस्यांची संपूर्ण उत्तरे आजवर जगातील कोणत्याही राष्ट्राला मिळालेली नाहीत. मिळणे सहज शक्यही नाही. एक तर ज्या परिस्थितीत या समस्यांची उकल करावयाची असते ती सतत परिवर्तनीय असते.

त्या परिवर्तनाला साथ देणे अवघड असते. परंतु अनेकदा अशी साथ देण्याचे राज्यकर्त्यांच्या मनातही नसते.

येथेही उदाहरण घ्यावयाचे तर आपल्या भारताचे देखील घेता येईल. परकीय सत्ता जाऊन राष्ट्र स्वतंत्र होणे हे मोठे परिवर्तन होते की नाही ? त्या परिवर्तनाचा परिणाम आपल्या शिक्षणक्षेत्रावर काय झाला ? आजही साठ टक्यांहून अधिक लोक निरक्षर आहेत, चाळीस टक्के लोक दारिद्र्यरेषेच्या खालचे जीवन जगत आहेत, व्यावसायिक शिक्षणाच्या प्रवाहाकडे लोक वळत नाहीत, सुशिक्षितांची बेकारी वाढत आहे, राष्ट्राच्या खर्चाने प्रशिक्षित झालेले वैज्ञानिक, इंजिनिअर्स, डॉक्टर्स परदेशात जाऊन स्थायिक होत आहेत,–या अशा गोष्टी स्वातंत्र्य मिळाले या परिवर्तनाचा आपल्या शैक्षणिक धोरणातही योग्य परिवर्तन झाले याच्या निदर्शक मानता येतील काय ?

राष्ट्रांचे अधिकृत प्रतिनिधी ज्या आंतरराष्ट्रिय परिषदेत भाग घेतात तिच्यातील चर्चेतून अशा प्रश्नांची उत्तरे मिळणे अशक्यप्राय आहे, कारण अशी परिषद राष्ट्रातील सत्तेची, वर्गवर्चस्वाची असलेली चौकट गृहीत धरूनच त्या मर्यादेत काही सुचतील ते कमीअधिक प्रमाणात जुजबी असे उपाय लक्षात घेऊ शकते.

राष्ट्रातील सत्तेची चौकटच बदलली गेली पाहिजे असा विचार अशा व्यासपीठावर मांडणे सर्वजण अनौचित्याचे मानतील; काही जण तर राष्ट्रद्रोहाचेही मानतील.

परंतु मूलभूत समस्या समजून घ्यावयाची तर या अंगाचा विचार न करून चालणार नाही. भारताच्या संदर्भात तर नाहीच नाही.

आणि सत्तेची चौकट बदलणे म्हणजे 'अ' पक्ष अधिकारावरून जाऊन 'ब' पक्ष अधिकारावर येणे असा मर्यादित असू शकत नाही. अनेकदा 'अ' आणि 'ब' इत्यादी विविध पक्षही राजकीय सत्तेच्या एकाच चौकटीत एकमेकांशी स्पर्धा करीत असतात.

## भारत

१९४८ मध्ये जवाहरलाल नेहरू यांनी भारतातील शिक्षणमंत्र्यांची एक बैठक बोलावली होती.

'परतंत्र भारतात ज्या ज्या वेळी शिक्षणाचा विचार झाला त्या त्या वेळी तो परकीय राजसत्तेच्या विचारांना अनुसरून झाला व खरे शैक्षणिक परिवर्तन कधीच झाले नाही', हा त्यांच्या मांडणीचा आशय होता.

'This must not happen now' हे असे आता घडता कामा नये हा त्यांचा त्या संदर्भात आदेश होता.

तरीही गेल्या चाळीस वर्षांत काय घडले ?

आजही भारतात साठ टक्क्यांहून अधिक जनता निरक्षर आहे. सरकारी आकडे मानले तरी जवळजवळ चाळीस टक्के लोक दारिद्र्यरेषेच्या खाली आहेत. निरक्षरतेच्या रेषेचा आणि दारिद्र्यरेषेचा अतूट संबंध आहे. आणि दारिद्र्यरेषा जोपर्यंत खाली सरकत नाही तोपर्यंत निरक्षतेची रेषाही खाली सरकणार नाही अशी माझी भूमिका आहे. याचा निर्देश मी अनेकदा 'The Fifty Per Cent Barrier' असा करतो. मूलभूत समस्येशी संबंध येतो तो अशा ठिकाणी येतो. त्याचे अधिक विवेचन थोडे पुढे करू.

उच्च शिक्षणाच्या संदर्भात या चाळीस वर्षांत काय घडले ? महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या संख्येत या कालखंडात जवळजवळ दसपट वाढ झाली. संख्यात्मक वाढ झाली पण गुणात्मक काय झाले ? महाविद्यालयीन शिक्षणाची एकेका राष्ट्रातील वैशिष्ट्ये सांगताना 'the debasement of academic currency in so many institutions in India' (शैक्षणिक नाण्याचे उत्तरोत्तर होत गेलेले भारतातील अवमूल्यन) असा निर्देश करावा असे कार्नेगी कौन्सिलच्या उच्च शिक्षणावरील अहवालाला (१९८०) का वाटले ?

अगदी अलीकडची परिस्थिती काय आहे ? जागतिक बँकेच्या जागतिक विकासविषयक प्रतिवार्षिक अहवालात काही शिक्षणविषयक माहिती दिलेली असते. १९८६ या वर्षाचा अहवाल प्रत्येक राष्ट्रात २० ते २४ या वयोगटातील लोकसंख्येपैकी किती टक्के लोक उच्च शिक्षण घेत आहेत याची माहिती देतो. अशी १२८ राष्ट्रांची माहिती त्या अहवालात आहे. भारत आणि आपल्याला ज्या राष्ट्रांविषयी कुतूहल वाटावे अशा अन्य काही राष्ट्रांतील ही टक्केवारी पुढीलप्रमाणे आहे :

भारत ९, चीन १, पाकिस्तान २, बांगला देश ४, इंग्लंड २०, रशिया २१, जपान ३०, पश्चिम जर्मनी ३०, स्वीडन ३९, कॅनडा ४२, अमेरिका (यू. एस्. ए.) ५६.

संख्याशास्त्राच्या दृष्टीने एवढ्या आकडेवारीवरून आपल्याला तुलनात्मक अचूक असे निष्कर्ष काढता येणार नाहीत. परंतु ढोबळ वस्तुस्थितीचे निदर्शक म्हणून वरील आकडे पुरेसे आहेत.

१९८८ मध्ये विद्यापीठे व विद्यापीठ स्तरावरील म्हणून मान्यताप्राप्त अन्य संस्थांची संख्या भारतात १५९ होती. त्यांपैकी १०५ नेहमीच्या पद्धतीची विद्यापीठे होती. २४ कृषिविश्वविद्यालये होती, ४ वैद्यकीय संशोधन संस्था होत्या आणि १० तन्त्रज्ञानविषयक संस्था होत्या. यांखेरीज काही व्यावसायिक, संशोधनात्मक, वा अन्य काही विशेष शिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या विद्यापीठ स्तराची मान्यता मिळालेल्याही संस्था होत्या. महाराष्ट्रातील उदाहरणे घ्यावयाची तर मुंबईचे टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस् व पुण्याचे टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांची घेता येतील.

स्वातंत्र्य मिळण्याच्या आधी भारतात केवळ अठरा विद्यापीठे होती. पुढील ४० वर्षांत संख्यात्मक केवढी वाढ झाली आहे हे वरील आकडेवारीवरून लक्षात येईल. या सर्व संस्थांतून आज सुमारे चाळीस लाख विद्यार्थी शिक्षण घेत आहे. महाविद्यालयांची संख्या जवळजवळ सहा हजार, महाविद्यालयांत काम करणाऱ्या प्राध्यापकांची संख्या सुमारे एक लक्ष पंचाहत्तर हजार व विद्यापीठांतून काम करणाऱ्या प्राध्यापकांची संख्या जवळजवळ पन्नास हजार आहे. विद्यार्थ्यांमध्ये मुलींची संख्या जवळजवळ एकतृतीयांश आहे.

या संदर्भात नेहमी सांगण्यात येणारी आणखी काही ढोबळ माहिती सांगावयाची तर भारतात शिक्षणावर होणारा खर्च हा संरक्षणावर होणाऱ्या खर्चाच्या खालोखाल आहे. व या खर्चातीलही तुलनात्मक दृष्ट्या पाहिले तर शिक्षणाच्या प्राथमिक व दुय्यम स्तरांवर होणारा खर्च, उच्च शिक्षणावर होणाऱ्या खर्चाच्या तुलनेत कमी प्रमाणात होत आहे.

उच्च शिक्षणाच्या संदर्भात अनेकदा सांगितलेली गोष्ट म्हणजे जगातील राष्ट्रांत शास्त्रज्ञांच्या संख्येच्या दृष्टीने भारत हे तिसऱ्या क्रमांकाचे राष्ट्र आहे. साहजिकच मनात मग प्रश्न येतो की हे जर असे असेल तर भारत अजून इतका मागास का ? आमचे सर्वोत्तम शास्त्रज्ञ अधिक अर्जन व अधिक सुविधा यांच्या शोधात परदेशात जातात व पुढेही तेथेच स्थायिक होतात हे याचे कारण असू शकेल काय ? की 'शास्त्रज्ञां'ची आपल्या राष्ट्राची व्याख्या आणि अन्य राष्ट्रांतील व्याख्या यांत काही फरक असू शकेल काय ? तसे असण्याची खूपच शक्यता आहे; कारण तशी तफावत नसती तर आपल्या विद्यापीठांतील विद्यार्थ्याला त्याच स्तरावर प्रगत राष्ट्रातील विद्यापीठांतही सहज प्रवेश मिळाला असता, तसे होत नाही. हे थोडे तपशीलाने सांगण्याचे कारण की अशी अवधाने राखली नाहीत तर ढोबळ आकडेवारीवर आधारित निष्कर्ष अनेकदा दिशाभूल करणारे ठरू शकतात.

एक आकडा मात्र असा आहे की तो कितीही ढोबळ असला तरीही निर्णायक महत्त्वाचा होऊ शकतो. शिक्षणावर होणाऱ्या एकूण खर्चापैकी ८० टक्क्यांहून अधिक खर्च शिक्षकांच्या वेतनावर होत असतो. प्राथमिक, दुय्यम, उच्च अशा स्तरांवर हे प्रमाण थोडे आगेमागे असले तरी तसेच ठळक आहे. यातून सहज निष्कर्ष निघतात ते असे :

(१) शिक्षकांच्या वेतनश्रेणीचा विचार करताना एकूण शिक्षणावर त्याचा परिणाम कसा होईल याचे अवधान ठेवणे आवश्यक असते. शिक्षकांचे, प्राध्यापकांचे वेतन वाढविण्याऐवजी आपली गुणवत्ता त्यांना वाढविता येईल अशा सुविधा त्यांना उपलब्ध करून द्याव्यात असा विचार मी कोठारी आयोगापुढे मांडला होता. निवास, आरोग्य, प्रवास, ग्रंथखरेदी, महाविद्यालयात स्वतंत्र अभ्यासिका अशा सुविधा माझ्या मनात होत्या. नुसत्या वेतनवाढीने हे साध्य होतेच असे नाही. (भाववाढ लक्षात घेऊन जी वेतनवाढ त्या कारणामुळे करणे आवश्यक आहे ती मात्र वेळोवेळी व त्याच प्रमाणात करीत गेले पाहिजे. त्यासाठी आंदोलनाचीही आवश्यकता असू नये.)

(२) या वेतनाखेरीज अन्य पूरक शिक्षणाची साधने पुरविण्याकडे लक्ष दिले गेले नाही तर एकूण सर्वच खर्च वाया जातो. आपल्या शिक्षणव्यवस्थेत हे घडले आहे व असे घडल्याचे शासनालाही मान्य आहे. Operation Blackboard ची आवश्यकता वाटावी हाच याचा पुरावा आहे. हे प्राथमिक स्तरावर आहे त्याचप्रमाणे दुय्यम व उच्च स्तरांवरही आहे. 'हे घडले याला जबाबदार कोण ?' असा प्रश्न विचारण्याचा मात्र आपल्याकडे प्रघात नाही. परंतु गुणवान शिक्षक व त्यांना आवश्यक ती पूरक साधने असा मेळ घातल्याखेरीज आपल्या शिक्षणाचा स्तर उंचावणार नाही आणि शिक्षणाचे उत्तरोत्तर अवमूल्यन होत असलेला देश या जगाने केलेल्या आपल्या मूल्यमापनाला समर्थ उत्तर देता येणार नाही.



अनुक्रमणिका

शेवटची महत्त्वाची आकडेवारी अशी आहे की उच्च शिक्षणावर होत असलेल्या या सर्व खर्चाचा मुख्य लाभ लोकसंख्येतील सर्वोच्च स्तरावरील वीस टक्के लोकांच्या मुलांना मिळतो. जागतिक बँकेच्या अहवाला-प्रमाणे भारतात या वीस टक्के लोकांच्या हातांत भारताच्या एकूण राष्ट्रिय उत्पन्नापैकी पन्नास टक्के उत्पन्न आहे.

## स्वातंत्र्यसंपादनाच्या आधी

महात्मा गांधींनी १९३७ मध्ये लिहिले होते :

" कॉलेजातील शिक्षणात देखील मी प्रचंड क्रांती करू इच्छितो. त्याचा संबंध मी राष्ट्राच्या गरजांशी जोडू इच्छितो. यंत्रे आणि इतर कलाकौशल्य यांच्यात प्रावीण्य संपादन करण्याबद्दल काही पदव्या असतील. कॉलेजांनी देशातील भिन्नभिन्न कारखान्यांशी संबंध राखावा आणि त्या कारखान्यांनी आपल्याला लागणाऱ्या तज्ज्ञ विशारदांच्या शिक्षणाची तरतूद करावी. सामान्य ज्ञानाची (आर्ट्स) कितीतरी खाजगी कॉलेजे आज स्वतःच्या पायावर उभी आहेत. त्यासाठी राज्यांना स्वतःची कॉलेजे काढण्याची गरज नाही. आयुर्वेदासंबंधी कॉलेजे सरकारमान्य औषधालयांना जोडून काढावीत, आणि ज्या अर्थी अशी औषधालये धनिक वर्गांना लोकप्रिय होतात, त्या अर्थी त्यांनी वर्गणी गोळा करून ती काढावीत, अशी त्यांच्याकडून अपेक्षा करावयास हरकत नाही. राहिली शेतकी कॉलेजे. त्यांना जर आपल्या नावाची लाज राखावयाचीच असेल तर स्वावलंबी व्हावेच लागेल. या शेतकी विद्यालयांतून पदवी घेऊन बाहेर पडलेल्यांचा मला फार निराशाजनक अनुभव आला आहे.

" मग उरला शिक्षकांचा प्रश्न. देशातील आर्थिक मान लक्षात घेऊन एका ठरावीक जीवनवेतनावर आपल्या आवडीचा विषय काही काळ, समजा पाच वर्षेपर्यंत, शिकविण्याची देशातील विद्वानांवर सक्ती करण्यात यावी. उच्चतम संस्थांतील प्राध्यापक व शिक्षक जे लठ्ठलठ्ठ पगार घेत आहेत ते बंद व्हावेत."

गांधीजींनी हे १९३७ मध्ये लिहिले. त्या वेळी विविध राज्यांत १९३५ च्या कायद्यानुसार झालेल्या निवडणुकीत कॉंग्रेस पक्ष अधिकारावर आला होता. १९३९ मध्ये त्या सर्वांनी राजीनामा दिल्यामुळे तो कालखंड आपण सोडून देऊ

## आणि नंतर

परंतु, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काय झाले ?

'This must not happen now.' हा जवाहरलालजींचा आदेशवजा इशारा आपण पाहिला. त्यानंतरच्या दोनतीन वर्षांतच सरदार पटेल यांनी 'आम्हाला शैक्षणिक परिवर्तन करावयाचे आहे हे खरे, परंतु आम्ही अशा एका विचित्र जाळ्यात सापडलेले आहोत की काही करता येत नाही', अशा आशयाचे निराशेचे उद्‌गार एका सभेत काढले होते. त्या उद्‌गारांना उद्देशून विनोबाजींनी पुढे लिहिले होते : 'एखाद्या सामान्य किंवा असामान्यही विचारवंताने असे उद्‌गार काढले असते तर एक वेळ समजू शकले असते, परंतु देशाचे धोरण ठरविण्याचे व ते पार पाडण्याचे राज्यसूत्र ज्यांच्या हातात आहे तेच लोक ज्या वेळी असे उद्‌गार काढतात त्या वेळी अचंबा वाटतो. जाळे कितीही बळकट व गुंतागुंतीचे असो, ते तोडलेच पाहिजे.'

ही राजकीय असमर्थता आकस्मिकपणे निर्माण झालेली होती असे नाही, ती एकूण भारतीय वर्ग-वर्ण वर्चस्वाच्या परिस्थितीतच अनुस्यूत होती. गांधीजींना याचे प्रथमपासून भान होते. १९२२ मध्ये अहमदाबाद कोर्टात त्यांच्यावर चाललेल्या खटल्यात दिलेल्या आपल्या निवेदनात गांधीजींनी भारतीय जनतेच्या दारिद्र्याला दोघांकडून होणारे शोषण जबाबदार धरले होते. एक म्हणजे परकीय ब्रिटिश सत्तेकडून होणारे शोषण व दुसरे भारतातीलच वरिष्ठ वर्गाकडून होणारे शोषण. स्वातंत्र्यसंपादनानंतर पहिल्या प्रकारचे शोषण थांबले होते. परंतु वरिष्ठ वर्गाकडून होणारे शोषण मात्र चालूच होते. ब्रिटिश गेल्यानंतर आपण मतदानाचा अधिकार प्रत्येक एकवीस वर्षे वयाच्या वरच्या स्त्री-पुरुषाला दिला असला तरी प्रत्यक्षात राज्यसत्ता मात्र या वरिष्ठ वर्गाच्याच हातात राहिली.

हे जाळे म्हणूनच तुटत नव्हते; किंबहुना तोडण्याचा खरा प्रयत्नही होत नव्हता.

१९७८ मध्ये राजकोट येथे भारतातील विद्यापीठांच्या कुलगुरूंची वार्षिक परिषद होती. त्या वेळचे पंतप्रधान श्री. मोरारजी देसाई अर्धा दिवस उपस्थित होते. आपल्या प्रदीर्घ भाषणात शेवटी त्यांनी शिक्षणाच्या माध्यमाच्या प्रश्नाचा निर्देश केला. शिक्षणाचे माध्यम महाविद्यालयीन स्तरावर प्रादेशिक भाषाच राहिले

पाहिजे हा विचार त्यांनी आग्रहाने मांडला आणि भाषणाच्या शेवटी विचारले—

' या विचाराच्या कोण विरोधी आहेत ? '

सर्वजण स्वस्थ राहिले. मी उभा राहून म्हणालो :

' ही आपली प्रश्न विचारण्याची पद्धत चूक आहे.'

' चूक असे तुम्ही का म्हणता ? ' मोरारजींच्या आवाजात ते आपला राग झाकू शकले नाहीत.

मी म्हणालो :

' असा प्रश्न तुम्ही विचारलात तर ' मी ', असे कोण म्हणेल ? खरा प्रश्न वेगळा आहे. कुलगुरू बदलतात, शिक्षणमंत्री बदलतात, मुख्यमंत्री बदलतात. पंतप्रधानदेखील बदलतात. परंतु गेली तीन दशके निदान एकच राजकीय पक्ष तर अधिकारावर आहे. असे असतानादेखील इतक्या कालावधीत ही गोष्ट का घडून येऊ शकली नाही हा खरा प्रश्न आहे.'

मोरारजींनी या प्रश्नाचे उत्तर दिले नाही.

ज्या वरिष्ठ वर्गाच्या हातात सत्ता आहे त्या वर्गाची शिक्षणातील मूलभूत परिवर्तनाला मान्यता नाही हे याचे खरे कारण आहे. कारण असे मूलभूत परिवर्तन झाले तर आपल्या आर्थिक व राजकीय सत्तेला धक्का पोचल्याखेरीज राहणार नाही याची कदाचित प्रकट नसली तरी अप्रकट जाणीव त्या वर्गाला आहे.

## समस्या : काही उत्तरे

भारताच्या शैक्षणिक समस्यांच्या संदर्भात काय व कसे घडवावे याचा साक्षेपी विचार सुमारे दहा वर्षांपूर्वी करण्यात आला होता. Citizens for Democracy या संस्थेने या प्रयत्नाला चालना दिली होती. या निवेदनाचा प्राथमिक मसुदा कै. जे. पी. नाईक यांनी तयार केला होता. छोटया छोटया चर्चासत्रांत देशातील अडीचशेहून अधिक शिक्षणतज्ज्ञांनी त्या मसुद्यावर चर्चा केल्यानंतर अखेरचे निवेदन तयार करण्यात आले. भारतातील सुमारे चाळीस विख्यात विचारवंतांच्या व समाजधुरिणांच्या सह्यांसह १९७८ मध्ये हे निवेदन प्रसिद्ध करण्यात आले. ' Education for Our Peaple : A Policy Frame for the Development of Education (1978–1987) असे त्या निवेदनाचे शीर्षक आहे. ' भारतीय जनतेचे शिक्षण ' या शीर्षकाखाली या सुमारे शंभर पृष्ठांच्या निवेदनाचे भाषांतर ' इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशन, पुणे ' या संस्थेने प्रसिद्ध केले आहे.

उच्च शिक्षणाच्या संदर्भात या निवेदनाचा आशय काय आहे ? निवेदन सांगते :

(१) दहाव्या इयत्तेपर्यंत सर्वांना मुक्त प्रवेश असावा. त्यानंतर मात्र आवश्यक तेथे निवडीचे तत्त्व अवलंबावे लागेल.

(२) अशा निवडीच्या तत्त्वामुळे आपल्याला संधी नाकारण्यात येते अशी समाजातील खालच्या वर्गातील लोकांच्या मनातील रास्त भावना आहे. या भावनेला वाव राहणार नाही. त्या वर्गातील बुद्धिमान विद्यार्थ्यांना वाव मिळेल अशाच पद्धतीने निवड केली गेली पाहिजे. बुद्धिमापनाच्या योग्य कसोटया यासाठी तयार कराव्या लागतील.

(३) समाजाच्या सर्व वर्गांतून अशी निवड होणे इष्ट आहे. कारण बुद्धिमान मुले सर्वच वर्गांत, जातिजमातींत सारख्याच प्रमाणात जन्माला येत असतात. त्यांना संधी मिळणे हे केवळ त्यांच्या स्वतःच्या, त्यांच्या कुटुंबाच्या, समाजाच्याच हिताचे आहे असे नाही तर असा गुणवत्तेचा सार्वत्रिक शोध आणि विकास संपूर्ण राष्ट्राच्याच हिताचा आहे.

(४) गरिबांना हे शिक्षण मोफत तर असावेच, परंतु शिवाय अशा विद्यार्थ्यांना ते शिक्षण पूर्ण करण्यासाठी इतर पूरक साहाय्यही देण्यात यावे. वरिष्ठ व श्रीमंत वर्गातील विद्यार्थ्यांकडून या शिक्षणाचा जितका खर्च फी-रूपाने घेतला जाणे शक्य असेल, तितक्या प्रमाणात घेतला जावा. सरसकट समान फी-सवलतीचे धोरण असू नये. ते धोरण श्रीमंतांसाठी अनावश्यक व गरिबांसाठी अन्यायकारक आहे.

(५) राष्ट्राच्या विविध क्षेत्रांतील मनुष्यबळाच्या गरजेचा विचार करून या क्षेत्रांतील विविध शाखांच्या विस्ताराचा व आवश्यक तेथे अशा विस्तारावर बंधने घालण्याचा विचार व्हावा. परंतु अशी बंधने घालतानादेखील सामाजिक न्यायाचे तत्त्व दृष्टिआड होऊ देऊ नये.

(६) अगदी अटळ असेल तेथेच पदवी आणि नोकरी यांचा संबंध जोडला जावा. एरवी नोकरीचा व पदवीचा संबंध ठेवू नये.

(७) ज्यांना उच्च शिक्षण घेता येणार नाही त्यांच्यासाठी निम्न स्तरावरील अन्य व्यावसायिक शिक्षणाच्या संधी उपलब्ध असाव्यात. अशा व्यवसायांतून त्यांना योग्य जीवनमान उपलब्ध होऊ शकेल अशी


अनुक्रमणिका

राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेची रचना व आर्थिक विकासाची गती असावी लागेल.

(८) महाविद्यालयांतून ज्यांना उच्च शिक्षण घेता आले नाही अशांच्यासाठीही त्यांच्या आवडी-सवडी-प्रमाणे उच्च शिक्षण घेण्याची सोय मुक्त विद्यापीठे (Open University) स्थापून करण्यात आली पाहिजे.

या निवेदनावर माझी स्वाक्षरी आहे आणि मी या निवेदनाशी आजही सहमत आहे.

उच्च शिक्षणातील खरे कळीचे प्रश्न : (१) सामाजिक न्यायाचा संदर्भ न तोडता प्रसार, (२) आंतरराष्ट्रिय स्पर्धेत टिकू शकेल अशी गुणवत्ता आणि (३) प्रगतिपर सामाजिक मूल्यांचे पोषण हे आहेत. सामाजिक परिवर्तन व शैक्षणिक परिवर्तन ही दोन्ही साथसाथ व एकमेकांना पूरक आणि पोषक पद्धतीने चालू राहिली तरच हे कळीचे प्रश्न सुटण्याची शक्यता आहे, ही निवेदनाची भूमिका आहे. या पद्धतीच्या कार्यक्रमाला मी Programme ASSET (Action for Simultaneous Social and Educational Transformation) असे नाव दिले आहे. शैक्षणिक गुणवत्तेचे आपले मुख्य कर्तव्य पार पाडीत असतानाच हे इतर कार्य केले जाऊ शकते. त्यातून विद्यार्थ्यांवरील शैक्षणिक व सामाजिक संस्कारही दृढ करता येतात व प्राध्यापकांच्या शैक्षणिक गुणवत्तेचा कस वाढविण्यातही मदत होऊ शकते. याचा तपशीलही मी अन्यत्र मांडला आहे व या पद्धतीच्या कार्यक्रमात रस असणाऱ्यांना तो मी उपलब्ध करून देऊ शकतो.

असे कळीचे प्रश्न सोडविण्याच्या मागील प्रमुख कळ 'प्राध्यापकांची कुवत आणि वृत्ती' ही आहे. दुर्दैवाने गेल्या काही वर्षांत 'प्राध्यापकांचे वेतन' हाच इतका प्रक्षोभक प्रश्न बनविला गेला आहे की या मूलभूत महत्त्वाच्या अंगाकडे लक्ष द्यावयासच कोणाला सवड झालेली नाही. विनोबाजी एकदा तीव्रपणे प्राध्यापकांना उद्देशून म्हणाले होते : 'तुम्ही आपल्या अन्य मागण्यांसाठी कितीही प्रखर आंदोलन करा, त्याला माझी हरकत नाही, परंतु तुमच्या मूलभूत कर्तव्याविषयी दक्षता घेणे तुम्हाला कोणत्याही कारणाने टाळता येण्यासारखे नाही.' मूलभूत कर्तव्य पार पाडण्याच्या दृष्टीने आपली समाजालाही योग्य वाटेल अशी आचारसंहिता तयार करणे व तिची आपण स्वतः कार्यक्षमपणे कार्यवाही करू शकू अशी प्रभावी यंत्रणा तयार करणे हे आद्य महत्त्वाचे काम अद्याप करावयाचे राहिले आहे.

प्राध्यापकांच्या वेतनाचाही या संदर्भात असाच एक स्फोटक प्रश्न बनला आहे. याची प्रमुख अंगे कोणती आहेत ?

यातील मूलभूत प्रश्न राष्ट्रातील एकूण वेतन-श्रेणीचा (wage-structure) आहे. त्या वेतनश्रेणी-तही केवळ संघटित वर्गांच्या वेतनमानाचा परस्परांशी काय संबंध राहावा असा तो मर्यादित प्रश्न नाही. या एकूण वेतनश्रेणींचाच राष्ट्रिय उत्पन्नाशी व राष्ट्रातील खालच्या सत्तर टक्के लोकांच्या जीवनमानाशी काय संबंध असावा असा तो प्रश्न आहे. खालच्या लोकांच्या जीवनमानाशी आपल्या वेतनश्रेणीचा संबंध कधीच नव्हता व आता तर संघटनेच्या सामर्थ्याच्या जोरावर या दोहोंमधील दरी उत्तरोत्तर रुंदावतच चालली आहे. आमदार, खासदार आदी लोक, नोकरशाही, इतर संघटित कामगारवर्ग यांच्या परस्परवेतनश्रेणीच्या संतुलनाच्या स्पर्धेत आता प्राध्यापकवर्गही उतरला आहे. ही स्पर्धा थांबवण्याचे सामर्थ्य आज कोणामध्येही नाही. यामुळे या वृत्तीविषयी नुसती नाराज भूमिका घेऊन कोणताही कार्यभाग होण्यासारखा नाही. अशी 'holier than thou' ('मी तुझ्यापेक्षा अधिक सत्त्वशील') मांडणी केवळ परवंचकच नव्हे तर आत्म-वंचकही होऊ शकते. परंतु राष्ट्राच्या हिताचा विचार करावयाचा तर स्वतःवर अशी बंधने घालून घेऊनच बुद्धिजीवी व समाजाचे वैचारिक नेतृत्व करणारा वर्ग अशी आपली प्रतिमा प्राध्यापकवर्ग निर्माण करू शकतो. वर उल्लेख केलेल्यासारखी आचारसंहिता तयार करून ती कार्यवाहीत आणण्याचे कार्य प्राध्यापक संघटनांनी केले तर त्या आपली सामाजिक विश्वासार्हता परत मिळवू शकतील व इतर संघटनांच्या पुढे एक सामाजिक आदर्शही ठेवू शकतील.

या विश्वासार्हतेवरच उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील सर्वांत महत्त्वाची गोष्ट अवलंबून आहे. ती गोष्ट म्हणजे शैक्षणिक स्वातंत्र्य किंवा स्वनियंत्रण. अध्ययन-अध्यापन-संशोधन-मतप्रदर्शन यांविषयीच्या स्वातंत्र्यांचा यात समावेश होतो. 'शासन न्यायाधीशांना वेतन देते म्हणून त्याला न्यायाचे नियंत्रण करण्याचा अधिकार मिळत नाही, तसेच शिक्षणक्षेत्राचेही आहे.' असे विनोबाजी






एकदा म्हणाले होते. त्यातील आशय सत्य आहे परंतु ही सत्यता टिकविण्याचे उत्तरदायित्व केवळ शासनावर नाही; प्रामुख्याने ते प्राध्यापकांवर व त्यांच्या संघटनांवरच आहे.

आज उच्च शिक्षणात अमलात आणावयाची प्रमुख धोरणे त्यामुळे खालील आहेत :

१) समाजातील सर्व वर्गातील विद्यार्थ्यांना या स्तरावर संधी मिळेल असे निकष तयार करणे.

२) प्राध्यापकांनी स्वत:साठी आचारसंहितेची रचना करणे व तिच्या पालनाची स्वत:ची प्रभावी यंत्रणा उभी करणे.

३) अध्ययन-अध्यापन-संशोधन यांचा स्तर सतत उंचावत नेणे.

४) शिक्षण आणि समाजपरिवर्तन यांतील परस्पर-पूरक अनुबंध कसा राखता येईल याचा विचार करणे आणि त्यासाठी पोषक असे कार्यक्रम आखणे.

आपले राजकारण, आपले अर्थकारण आणि आपले शिक्षण ही सर्व वरच्या वर्गाची मिरासदारी झालेली आहे. खालील वर्गातून थोडे लोक आजच्या परिस्थितीतही वर येतात हे खरे; परंतु खरी समान संधी मिळाली की अशा लोकांची संख्या त्या त्या गटांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात वाढू लागेल. केवळ एवढ्यानेही भागणार नाही; कारण आजही असे वर येणारे लोक वरिष्ठ वर्गात समाविष्ट होण्यातच धन्यता मानतात आणि आपल्या मूळ बांधवांना विसरतात.

या सर्व दुष्टचक्रातून सुटका व्हावयाची असेल तर त्यासाठी जन-आंदोलनाखेरीज अन्य मार्ग नाही. या जन-आंदोलनाचे नेतृत्व कोण करणार ? अशा आंदोलनांचे नेतृत्व वरिष्ठ व मध्यमवर्गातून आलेल्या लोकांनीच प्रारंभीच्या काळात केलेले असते असा जगाचा इतिहास आहे. शिक्षणक्षेत्रातील लोकांचे तर या संदर्भात विशेष उत्तरदायित्व आहे. विचारनिर्मिती आणि विचारजागृती हे तर शिक्षणक्षेत्राचे महत्त्वाचे कार्य आहे. विचारप्रसारातून जनजागृती व जनजागृतीतून जन-आंदोलन अशी ही प्रक्रिया होऊ शकते. या प्रक्रियेचा प्रारंभ प्राध्यापकांनी केला व जाणीवपूर्वक त्या प्रक्रियेला गती दिली तरच त्यांनी समाजापासून जे घेतले त्या ऋणाची फेड काही प्रमाणात तरी त्यांनी केली असे म्हणता येईल. हे घडत नाही ही खरी शोकांतिका आहे. १९७८ मध्ये निवेदनावर सह्या करणारे लोकदेखील राजवट बदलल्यानंतर आपले विचार मांडण्याच्या बाबतीत देखील पुढे आले नाहीत व त्यांच्यापैकी अनेकांनी आपला सूर बदलला ही गोष्टच विचाराच्या क्षेत्रातसुद्धा आपल्या व्यक्तिगत हिताला धक्का न बसेल अशा पद्धतीनेच विचार मांडण्याच्या भारतातील विचारवंतांच्या सार्वत्रिक वृत्तीवरच प्रकाश टाकते.

–आणि मग If all the light that be within you is darkness, how great is that darkness (जर सारा प्रकाशच अंधार झाला तर तो अंधार किती गडद असेल) अशी खन्त मनात निर्माण होते.

– सुदैवाने त्या अंधारात रवीन्द्रनाथांच्या पणतीची थरथर धीर देत राहते.

ʘ ʘ ʘ

# प्राध्यापकांचा कार्यभार – समज, गैरसमज

म. द. हातकणंगलेकर

गेल्या दशकात महाराष्ट्रातील विद्यापीठे आणि महाविद्यालये यांच्या व्यवस्थापनांत आणि दैनंदिन कारभारात महत्त्वाचे बदल घडून आले आहेत. प्राध्यापकांच्या सेवानियमांत, वेतनश्रेणीत, नियुक्ती, बढती, नोकरीतून मुक्त करणे या संदर्भातही आता नियमांची बंधने आली आहेत. खाजगी शिक्षण संस्थांच्या संचालकांना पूर्वीसारखा अनिर्बंध कारभार करता येत नाही. नियमांच्या संदर्भातच त्यांना निर्णय घ्यावे लागतात. मनमानी करता येत नाही. पगार व्यवस्थित होतात, भविष्य निर्वाह निधीत रक्कम नियमितपणे भरावी लागते, सेवकांना ती वेळच्या वेळी अदा करावी लागते. हे नियम अजिबात डावलले जात नाहीत असे नव्हे. सार्वजनिक व्यवहाराच्या इतर क्षेत्रांत जसे नियमबाह्य वर्तन घडते तसे शिक्षणाच्या क्षेत्रातही घडते, पण नियमानुसार दाद मागण्याची आता सोय झाली आहे. शिक्षणक्षेत्रात हे जे संरक्षण निर्माण झाले आहे आणि जे आश्वासक वातावरण पसरले आहे त्याचे श्रेय प्राध्यापक संघटनांच्या कामाला दिले पाहिजे यात मुळीच शंका नाही. प्राध्यापक संघटनांचे काम उत्तरेत आणि दक्षिणेत अगोदरच सुरू झालेले होते. महाराष्ट्रात संघटनेच्या कामाला गेल्या दशकातच गती मिळाली आहे. नागपूर, पुणे, औरंगाबाद, कोल्हापूर या केंद्रांत संघटनेला भरघोस पाठिंबा मिळत गेला. संघटनेचे बळ वाढत गेले. विद्यापीठाच्या आणि शासनाच्या पातळीवर संघटनेला मान्यता मिळाली. गैरप्रकाराची अनेक ठळक प्रकरणे संघटनेने धसाला लावली आणि संबंधितांच्या स्वच्छंदी कारभाराला आळा बसेल अशी जरब निर्माण केली. संघटनेच्या प्रतिनिधींनी राष्ट्रिय आणि आंतरराष्ट्रिय पातळीवर स्थान प्राप्त करून घेतले. परदेशातील संघटनांच्या कामाची माहिती घेण्यासाठी महाराष्ट्र प्राध्यापक संघटनेचे प्रतिनिधी परदेशी जाऊन आले. वेगवेगळ्या निमित्ताने संघटनेच्या वतीने शैक्षणिक विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आले यापेक्षाही महत्त्वाचे म्हणजे संघटनेने खाजगी महाविद्यालयांतील काही गैरप्रकार आणि प्राध्यापकांवर होत असलेल्या अन्यायाची प्रकरणे हाती घेऊन, त्याबद्दल लोकमत जागे केले, कायद्यानुसार शासनाकडे दाद मागितली आणि या प्रकरणाचा योग्य तो निर्णय लागेपर्यंत त्याचा पाठपुरावा केला. हे करताना कोल्हापूरचे गोखले महाविद्यालय, सांगलीचे शांतिनिकेतन, वारणाचे महाविद्यालय यांच्या जबरदस्त संचालक मंडळांशी त्यांना मुकाबला करावा लागला. या कामाचे श्रेय मोठेच आहे. प्राध्यापक संघटनेने केवळ सेवानियमांसाठी आणि सेवाशाश्वतीसाठी लढा दिला असे नव्हे. या लढ्यामुळे संघटनेवरचा प्राध्यापकांचा विश्वास वाढला यात शंका नाही. त्यापेक्षा अधिक विश्वास संघटनेने नव्या वेतनश्रेणीसंबंधी जो आग्रह धरला आणि ही वेतनश्रेणी विनाअट सलगपणे प्राध्यापकांना मिळत जावी यासाठी प्रयत्न केला त्यामुळे सर्व प्राध्यापक वर्गाची कृतज्ञता आणि पाठिंबा संघटनेला मिळाला. या संदर्भात जे प्राध्यापक सेवेत आहेत त्यांची संख्या कमी होणार नाही आणि कोणालाही नोकरीतून कमी केले जाणार नाही, या अटीवरच वेतनश्रेणी स्वीकारण्यासंबंधीचा करार संघटनेच्या नेत्यांनी महाराष्ट्र शासनाबरोबर केला. यामुळे नव्याने रुजू झालेल्या प्राध्यापकांना मोठा दिलासा मिळाला. विद्यापीठ निवडणुका संघटनेच्या वतीने लढविण्याचा निर्णयही संघटनेने घेतला. त्याचे परिणाम सुरवातीला संघटनेला हितकारी वाटले तरी नंतरच्या काळात त्यासंबंधी फेरविचार करावा अशी परिस्थिती उत्पन्न झाली. निवडणुकीला आवश्यक अशा सर्व तंत्रांचा अवलंब करताना साहजिकच संघटनेच्या एकसंधतेला तडा गेला. संघटनेला दोन वेळा राज्यव्यापी आणि देशव्यापी संप पुकारावे लागले. त्याआधी खडू-फळा बंद, एक दिवसाचा लाक्षणिक संप इ. लक्षवेधी प्रकार करावे लागले. मोर्चे, उपोषण, निदर्शने, शासनाच्या अधि-


अनुक्रमणिका

कार्‍यांना मोर्च्यात जाऊन निवेदने सादर करणे आदी सौम्य मार्गही चोखाळावे लागले. व्यापक संपाचे सत्र दीर्घकाळपर्यंत टिकवून धरावे लागले आणि या काळात प्राध्यापकांचे नैतिक धैर्य टिकवून धरण्यासाठी अटोकाट प्रयत्न करावे लागले. इतका दीर्घकाळ संप चालू ठेवल्या-नंतर, संपाच्या इष्टानिष्ठतेबद्दल फेरविचाराला सुरवात होते. तशी ती या संपाच्या वेळीदेखील झाली. सिनियर कॉलेजचे प्राध्यापक, विद्यापीठांतले प्राध्यापक, ज्यु. कॉलेजचे प्राध्यापक यांच्यात एकमत राहिले नाही. प्रत्येकाने आपली वेगळी संघटना जाहीर केली. एका विद्यापीठातली परिस्थिती दुसर्‍या विद्यापीठात उरली नाही. ही परिस्थिती ध्यानात घेऊन अखिल भारतीय पातळीवरच्या नेत्यांनी संप अनपेक्षितपणे मागे घेतला. सर्व संबंधितांनी सुटकेचा निःश्वास टाकला आणि ते गोंधळातही पडले. कोणत्या अटीवर संप मागे घेतला याची स्पष्टता बराच वेळ होऊ शकली नाही. नवी वेतन-श्रेणी मान्य करताना शासन विद्यापीठ अनुदान आयोगाच्या शिफारशीनुसार प्राध्यापकांसाठी वाढीव कार्य-भार सक्तीचा करणार अशी हवा निर्माण झाली होती. त्याबाबतची संदिग्धता होती. आता काही एक उभय-पक्षी तोंडदेखली प्रतिष्ठा राखणारा निर्णय झालेला आहे. या सर्व प्रकरणात मुद्याची गोष्ट वेतनश्रेणीची नसून प्राध्यापकांच्या कार्यभाराची आणि त्यांच्याकडून अपेक्षित असणार्‍या सततच्या व्यासंगाची आहे. वेतन-श्रेणी उंचावल्यानंतर कार्यभाराचे स्वरूप आणि वजन बदलावे हे तत्त्वतः पटण्याजोगे आहे तरी ह्याच मोक्याचा प्रश्न करून त्याभोवती फार मोठे वादंग माजवण्यात येत आहे. त्यामागची प्रमुख कारणे काय आहेत, संघटनेचा कार्यभारवाढीला विरोध का आहे ? एक तर शासनाशी जो करार संघटनेने केला त्यात कार्यभारवाढीबद्दल काही उल्लेख नाही, किंबहुना वेतनश्रेणी मान्य करण्याची ही अट असणार नाही असे या करारात नमूद करण्यात आलेले आहे. दुसरे म्हणजे अन्य राज्यांत जेव्हा नवी वेतनश्रेणी मान्य करण्यात आली तेव्हा कार्यभारात वाढ झाली नाही. तिसरी, संघटनेच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे एकदा कार्यभारवाढीस मान्यता दिली की सध्या उच्च शिक्षणात काम करीत असणार्‍या प्राध्यापकांच्या जागांत कपात होणार आणि ती कायमची राहणार. आज सेवेत असणारे प्राध्यापक जरी सेवेत राहिले तरी भविष्यकाळात



काही जागा कमी होण्याची धास्ती आहेच. संघटनेने आपला जो प्रधान हेतू मानलेला आहे त्याचे हे एक प्रकारे अपयश आहे. या कारणांमुळे प्राध्यापकांच्या कार्यभाराला या प्रसंगी जे महत्त्व प्राप्त झाले आहे ते या सर्व कारणांमुळे झाले आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाने उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील परिस्थितीचा अभ्यास करून शासनाला शिफारशी करणारे काही अहवाल प्रसिद्ध केले आहेत. त्यांत व्यवस्थापनासंबंधीच्या शिफारशी आहेत, महा-विद्यालयातील प्रत्येक वर्गात असणार्‍या विद्यार्थ्यांची संख्या, वर्गांची संख्या, ग्रंथालय, वसतिगृह, स्वच्छतागृहे, खेळाच्या सुविधा, कार्यालयीन सेवकांची संख्या या-संबंधीच्या सूचना आहेत, अभ्यासक्रमाची उद्दिष्टे काय असावीत यासंबंधी सूचना आहेत आणि मुख्य म्हणजे शिक्षकांच्या पात्रतेसंबंधी, व्यासंगासंबंधी आणि गुणवत्ता-वाढीसाठी आवश्यक असणार्‍या प्रशिक्षणासंबंधी महत्त्वाच्या सूचना केलेल्या आढळतात. कसदार शिक्षणासाठी गुणवान, व्यासंगी शिक्षकांची फार मोठी गरज आहे हे ओळखून अशी गुणवत्ता असणारे पदवीधर अन्य व्यवसायांकडे भरघोस आर्थिक लाभासाठी न जाता शिक्षण-क्षेत्राकडे वळावेत यासाठी सुधारित वेतनश्रेणीची शिफारस अनुदान मंडळाने केली. या वेतणश्रेणीतही अधिक गुणवत्तेसाठी उत्तेजन मिळेल अशी तरतूद केली. ही गुणवत्ता संपादन करण्यासाठी एम. फिल., पीएच. डी. काही एका मुदतीत मिळविणे आवश्यक ठरविले. त्याचप्रमाणे सांकेतिक पद्धतीने अध्यापन करण्यावर समाधान न मानता विशेष तयारीनिशी विद्यार्थ्यांशी चर्चा, निबंध-लेखन, संपर्क या मार्गांनी त्यांच्यापर्यंत विषयाचे ज्ञान पोहोचवावे आणि आपले विषयाचे ज्ञानही अद्ययावत ठेवावे अशी अपेक्षा व्यक्त केली. ती योग्यच आहे. प्राध्यापक संघटनेला तत्त्वतः तिला विरोध करणे इष्ट ठरणारे नाही, पण ते सर्वसाधारण प्राध्यापक वर्गास आणि त्याच्या आजच्या धारणेस जाचक ठरणारे आहे. त्यामुळे गुणवत्ताविकासाचे उन्हाळी शिबिरासारखे औपचारिक कार्यक्रम यावर ही गरज भागवावी अशी तडजोड संघटनेने मान्य केली असावी. मुख्य प्रश्न कार्यभाराच्या वाढीबद्दलचा होता. त्यासाठी संप ताणला गेला आणि संघटनेचे मतभेद वाढले. त्याबाबतही उभयपक्षी तोंड-सफाई करण्यात आली आहे. पूर्वीच्या ४५ मिनिटांच्या १७ व्याख्यानांऐवजी आता ५० मिनिटांची १७

व्याख्याने असा कार्यभार मान्य करण्यात आला आहे. अन्य कार्यभार हा संदिग्ध स्वरूपाचा असल्याने त्या-बद्दलचा काटेकोर हिशेब सादर करण्याची अडचण उपस्थित होत नाही. कार्यभाराला जो तात्त्विक स्वरूपाचा विरोध करण्यात आला होता त्याचे काहीसे विश्लेषण करणे अगत्याचे आहे.

पूर्वीच्या काळात म्हणजे जवळजवळ १९७२ सालापर्यंत प्राध्यापकांचा कार्यभार हा वादाचा विषय झालेला नव्हता. त्याची अनेक कारणे होती. एक तर उच्च शिक्षणाचा विस्तार झालेला नव्हता. सर्वसाधारण नोकरी-व्यवसायासाठी पदवीपर्यंतचे शिक्षण आवश्यक मानले जात नव्हते. अनुदानाचे नियम काटेकोर झाले नव्हते. सर्वच खाजगी महाविद्यालयांना अनुदान मिळत नव्हते. प्राध्यापकांची वेतनश्रेणी त्या वेळच्या परि-स्थितीत ठाकठीक होती. अमुकच प्राध्यापक अगर सेवकवर्ग पाहिजे अशी अट नव्हती. एकूण अध्यापनाचे काम आणि शिक्षणाचे क्षेत्र हे ध्येयनिष्ठेचे आणि त्यागाचे क्षेत्र आहे अशी धारणा होती. थोर विद्वानांचे तसे चालतेबोलते आदर्श समोर होते. शिक्षण हे समाजजागृतीचे आणि राष्ट्रिय उत्थानाचे साधन आहे अशी भावना प्रचलित होती. सरसकट प्रसाराने जी शिथिलता आणि व्यवहारी दृष्टी निर्माण होते तशी ती निर्माण झालेली नव्हती. शिक्षणाच्या क्षेत्रातील निष्ठानियम अन्य क्षेत्रांतील नियमांपेक्षा वेगळे असणे श्रेयस्कर होय अशी एकूण श्रद्धा होती. त्या वेळी पूर्ण कार्यभार १५ तासिकांचा होता. अर्धवेळ प्राध्यापकांना ६ ते ८ तासिका घ्याव्या लागत असत. कार्यभारासंबंधीचा निर्णय प्राचार्य घेऊ शकत. व्याख्यानांखेरीज महाविद्यालयात प्रत्येक विषयाचे गृहपाठ असत, चाचणी परीक्षा असे, सहामाही आणि काही वर्गांच्या वार्षिक परीक्षांच्या उत्तरपत्रिका तपासण्याची, परीक्षा घेण्याची कामे प्राध्यापक करीत. खेळ, स्नेहसंमेलने, वसतिगृहाची देखरेख, अभ्यासमंडळे, प्रसिद्ध व्यक्तींची व्याख्याने आयोजित करणे अशी आनुषंगिक कामे प्राध्यापकांना करावी लागत. एका वर्गाच्या अनेक तुकडया नसल्याने एकाच पाठ्य-पुस्तकाचे अध्यापन निरनिराळ्या तुकडयांत करावे न लागता, प्रत्येक वर्गासाठी वेगवेगळी तयारी करावी लागत असे. हे सर्व निष्ठेने आणि कर्तव्यभावनेने पार पडत असे. प्राचार्यांसाठी वेगळा कार्यभार नेमून दिलेला नसे. त्यांचे कार्यालयीन कामकाज मर्यादित असे. खात्याशी अगर विद्यापीठाशी सततचा पत्रव्यवहार, अहवाल पाठविणे, समित्यांच्या भेटी, मान्यता या गोष्टींचे अवडंबर झालेले नव्हते. प्राचार्यांनादेखील अध्या-पनाचीच आवड होती. आपापल्या विषयात फार मोठी मान्यता असणारे ते प्राध्यापक होते. सुरवातीला सरकारी अनुदान नाममात्र होते. नंतर ते मान्य खर्चाच्या ६६% झाले तरीदेखील व्यवस्थेत फार फरक पडला नव्हता. स्वातंत्र्योत्तर काळातील एका टप्प्यावर उच्च शिक्षणाचा झपाटयाने विस्तार झाला. त्यासाठी मोठया प्रमाणावर सवलती मंजूर झाल्या, प्रादेशिक विद्यापीठे, महाविद्या-लये यांच्या संख्येत भर पडली. तालुक्याच्या गावी महाविद्यालये उभी राहिली. आवश्यक ती साधने, सुविधा, पात्र गुणवान शिक्षक उपलब्ध झाले नाहीत ( अर्थात कागदोपत्री पात्रता होतीच ) तरी विस्ताराचा रेटा तसाच वाढत राहिला. शासनाच्या अनुदानाच्या प्रमाणात वाढ झाली, तशी त्यांची नियंत्रणे, नियम वाढले. शिक्षणक्षेत्र हे पदवीधरांच्या नेमणुकांचे महत्त्वाचे क्षेत्र बनले. खाजगी शिक्षण संस्थांच्या संचालकांनासुद्धा हे क्षेत्र किफायतदार दिसू लागले. राजकीय वजन आणि लागेबांधे असणारी मंडळी या शिक्षणविस्तारात हित-संबंधांचे जाळे विणू लागली. या क्षेत्राचे स्वरूप आणि व्यवहार आरपार बदलून गेला. सहकारी उद्योगाप्रमा-णेच अधिकाधिक नोकरभरती करण्याचे हे क्षेत्र बनले. ही संख्या हाताबाहेर जाते आणि खर्च डोईजड होतो असे जेव्हा शासनाच्या ध्यानात आले तेव्हा प्राध्यापकांच्या कार्यभाराचा विचार करणे त्यांना आवश्यक वाटू लागले. मध्यंतरीच्या काळात प्राध्यापक संघटनांचे बळ वाढले होते आणि प्राध्यापकांना सेवासंरक्षण आणि योग्य सेवाशर्ती हे त्यांनी आपले प्रधान कार्य म्हणून स्वीकारले होते. संघटनेचे बळ संख्येवर अवलंबून असल्याने, संख्याकपातीच्या योजनेला त्यांनी विरोध करावा हे क्रमप्राप्त होते, हा प्रश्न क्षेत्रीय गुणवत्तेचा न राहता लौकिक आणि आर्थिक हितसंबंधांच्या रक्ष-णाचा झाला होता. कामगार संघटनांची जी प्रतिज्ञा असते तीच प्राध्यापक संघटनेची झाली होती. आम्ही अन्य क्षेत्रांतील कामगारांसारखे शिक्षणक्षेत्रातील काम-गार आहोत. त्यांच्याप्रमाणेच आमच्या क्षेत्रात आम्ही पाटया टाकण्याचे काम करीत आहोत. जास्त पाटया टाकाव्या लागणे ही एका अर्थाने आमची पिळवणूक

आहे. सर्व शक्तीनिशी याविरुद्ध संघर्ष केला पाहिजे अशी ती भूमिका बनली. अर्थात अधिकचा कार्यभार कसा अनिष्ट आणि अन्याय्य आहे हे सिद्ध करण्यासाठी करण्यात येणारा युक्तिवाद मात्र अधिक संस्कारित आणि चातुर्याचा असावा लागतो. तसा तो असतो याचा प्रत्यय संघटनेची भूमिका कशी रास्त आहे हे दाखविणाऱ्या अनेक लेखांतून, वक्तव्यांतून आणि वृत्तपत्रांत येणाऱ्या पत्रव्यवहारावरून आलेला आहे.

आणखी एका गोष्टीचा निर्देश करणे आवश्यक आहे. शिक्षणावर होणाऱ्या खर्चाचा विचार करताना प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक आणि उच्च स्तर या सर्वांचा विचार करावा लागतो. धोरण म्हणून प्राथमिक शिक्षणाची जास्तीत जास्त तरतूद करण्याची आवश्यकता असताना त्याची पुरेशी– खडू-फळचासारख्या प्राथमिक गरजांवरसुद्धा– तरतूद केली जात नाही अशी सततची तक्रार सर्व संबंधित घटक, जिल्हापरिषदांचे अधिकारीदेखील करत असतात. त्या मानाने उच्च शिक्षणावरचा खर्च एकसारखा वाढताना दिसत आहे. या चार स्तरांवरील शिक्षकांच्या वेतनश्रेणींतही बरीच तफावत, या नव्या वेतनश्रेणीच्या मान्यतेनंतर पडणार आहे. या शिक्षकांच्या कार्यभाराचा विचार करतानादेखील हा फरक जाणवतो. माध्यमिक आणि उच्च माध्यमिक स्तरांपर्यंत कार्यभार २४ ते ३० तासिका इतका असतो. आनुषंगिक कामही बरेच असते. त्या मानाने प्राध्यापकांचा कार्यभार मर्यादित आहे असे दिसते. शासनासमोर हे कार्यभाराचे चित्रदेखील असणार.

प्राध्यापकांच्या वेतनश्रेणी, सेवानियम आणि कार्यभार यांच्या संदर्भात शासनाने संघटनेशी वेळोवेळी जे करार केले, त्यांतील कलमानुसार कार्यभारवाढीचा शासनाचा विचार नाही आणि नवीन वेतनश्रेणीच्या मान्यतेची अगर अंमलबजावणीची अट म्हणून शासन संभाव्य कार्यभारवाढीकडे पाहणार नाही असे म्हटले होते. आता शासनाची भूमिका या संदर्भात बदलणार असेल तर मान्य कराराचा तो एक प्रकारे अवमान आहे असे संघटनेचे म्हणणे आहे. कायद्याच्या दृष्टीने हे बरोबर असेल. संघटनेचे दुसरे म्हणणे असे की, विद्यापीठ अनुदान आयोगाने कार्यभारासंबंधी जशी शिफारस केली आहे त्याप्रमाणे एका वर्गातील विद्यार्थिसंख्या, अध्ययनाव्यतिरिक्त आवश्यक उपक्रम यांसंबंधीसुद्धा शिफारशी केल्या आहेत. शासन आयोगाच्या शिफारशींचा आधार घेऊन कार्यभार वाढविण्याचा विचार करीत असेल तर शासनाने अन्य शिफारशीसुद्धा अमलात आणाव्यात. तसे झाले तर कार्यभारवाढीमुळे प्राध्यापकांच्या जागा कमी होणार नाहीत. ही तांत्रिक परिस्थिती अस्तित्वात आहे यात शंका नाही.

या प्रश्नाचा गाभ्याचा भाग आहे तो कार्यभारवाढीस असणाऱ्या तात्त्विक विरोधाचा. प्राध्यापकांना महाविद्यालयीन, पदव्युत्तर स्तर आणि विद्यापीठात करावे लागणारे काम बौद्धिक स्वरूपाचे असल्याने या कामाचा विचार नेहमीच्या पद्धतीने करून चालणार नाही. एका तासिकेच्या व्याख्यानासाठी वाचन, मनन, अध्ययन अशी तयारी करावी लागते. तिचे मोजमाप सरधोपट हिशेबाने होणारे नाही. या कामाचा भार वाढविला तर बौद्धिक थकवा येईल आणि त्याचा कामाच्या दर्जावर प्रतिकूल परिणाम होईल. सबब १७ + ३ हा कार्यभार, कमाल कार्यभार आहे. यात एका तासिकेचीही वाढ झाली तर शिक्षणक्षेत्रात विपरीत परिणाम दिसून येईल. या युक्तिवादाची शांतपणे आणि वास्तव परिस्थिती ध्यानात घेऊन तपासणी करण्याची आवश्यकता आहे. या तपासणीचे जे निष्कर्ष दिसतील त्यांच्या वस्तुनिष्ठतेला नेहमीच आव्हान देणे तत्त्वतः शक्य आहे याचा विसर पडू देता कामा नये. आपली निष्ठा एका गटाच्या आणि विशेषतः संघटनेच्या हिताशी बांधलेली असली तर आव्हान देण्याची मोठीच गरज तत्परतेने भासते. ही वस्तुस्थिती गृहीत धरणे भाग आहे. आता ही तपासणी थोडक्यात कशी करता येईल ते पाहू. आज महाविद्यालयात सामान्यतः जे अध्यापनाचे काम चालते त्यासाठी फार मोठे बौद्धिक परिश्रम करावे लागतात असे सर्वसाधारण विधान करणे धाडसाचे होईल. गमतीने का होईना, आज असे बोलले जाते की प्राध्यापकांनी शिकवले नाही तरी विद्यार्थी पास होतात. विद्यार्थी आज महाविद्यालयाच्या वर्गाबाहेरच परीक्षा उत्तीर्ण होण्यास आवश्यक असलेला अभ्यास पार पाडीत असतात. अत्यंत हुषार विद्यार्थ्यांची मदारही परीक्षेसाठी तयार केलेली उत्तम मार्गदर्शक पुस्तके, नोट्स आणि कोचिंग क्लासेस यांवर असते. याचा परिणाम म्हणून प्राध्यापकांनाही कसोशीने आपल्या विषयाची पूर्वतयारी करावी आणि ज्ञानशाखा म्हणून आपला विषय विद्यार्थ्यांसमोर सुसंगतपणे मांडावा

अशी खास गरज वाटत नाही. पुन्हा एकदा गंमतीनेच म्हटले जाते की प्राध्यापक विद्यार्थ्यांच्या एक धडा पुढे असतात. कधी कधी हे विधानही अतिशयोक्त वाटते. गेल्या काही वर्षांत या ना त्या कारणासाठी संप झाले. संपात बुडालेले काम भरून काढण्यासाठी सत्राची मर्यादा वाढवण्यात आली. त्या वेळी असे आढळले की अभ्यासक्रम पुरा करण्यासाठी वाढवलेली मुदत लागलीच नाही. विद्यार्थी येण्याचे बंद झाले म्हणून अभ्यासक्रम संपला अगर तो संपवला गेला. तो संपवण्याचा हुकमी मार्ग म्हणजे वर्गात नोट्स लिहून घ्यावयास सांगणे अगर तेही शक्य नसेल तर नोट्स अभ्यासिकेत ठेवून विद्यार्थ्यांना त्या लिहून घेण्यास सांगणे. ज्या प्रकारे या नोट्स उतरवून घेतल्या जातात त्याकडे नजर टाकली तर किती यांत्रिकपणे आणि सर्व तऱ्हेच्या चुका करीत हे काम पार पाडले जाते याची कल्पना करता येते. तरी या सदोष लेखनाच्या आधारे परीक्षेत उत्तीर्ण होता येते असा विद्यार्थ्यांचा अनुभव आहे. शिवाय काही प्राध्यापकांना एकच व्याख्यान अनेक तुकड्यांसाठी द्यावे लागते. त्यामुळे एका वेळच्या तयारीवर अनेक व्याख्यानांच्या तयारीचे श्रेय तत्त्वतः मिळते. काही विषयांची, भाषा विषयाची पुस्तके तीन तीन वर्षांनी बदलतात पण अन्य विषय वर्षानुवर्षे कमीजास्त फरकाने तेच अभ्यासक्रम राबवीत असतात. या अवस्थेत अध्यापनाच्या बौद्धिक कामासाठी मोठ्या पूर्वतयारीची सतत गरज असते हे खरे नाही. हे श्रमही फार होतात असे मान्य करण्यासही जागा नाही. कारण अनेक प्राध्यापक आपले दैनंदिन काम संपवून अन्य कामे, खाजगी शिकवण्याची, स्वतंत्र मोबदला घेऊन पदव्युत्तर अध्यापनात सहभागी होण्याचे अगर अध्ययनाशी संबंधित नसणारे जोडधंदे करण्याची उमेद आणि उत्साह दाखवीत असतात. या वस्तुस्थितीचे सर्वेक्षण करण्यास हरकत नाही. पदव्युत्तर स्तरावरचे अध्यापन विद्यापीठाबाहेरच्या केंद्रातून यापेक्षा वेगळ्या पद्धतीने अगर अधिक परिश्रमपूर्वक चालते असे म्हणता येत नाही. विद्यापीठातील प्राध्यापकांना पीएच्. डी., एम्. फिल. संशोधनाला मार्गदर्शन करण्याचे काम असते आणि त्यासाठी अधिकचे वाचन आणि परिश्रम करावे लागतात. पण तेथे या कामाची मोजदाद कार्यभारात केली जाते. महाविद्यालयीन केंद्रातले पदव्युत्तर अध्यापन आणि संशोधनाचे मार्गदर्शन तसे जुजबी पद्धतीनेच चाललेले असते.

ही सर्वसामान्य परिस्थिती मी स्वानुभवाने मांडली आहे. या परिस्थितीला अपवाद असणारे प्राध्यापक नाहीत असे मला मुळीच सुचवायचे नाही. पण या अपवादामुळे व्यक्तिगत समाधान आणि जाणत्या विद्यार्थ्यांची आणि संचालकांची कृतज्ञता मिळत असली तरी त्यामुळे सर्वसाधारण परिस्थितीत गुणात्मक फरक पडत नाही. सामान्यतः परिश्रम घेण्याबद्दलची अनिच्छा, तुच्छता ही वृत्तीच दिसून येते. अध्यापनाबाहेरचे उपक्रमही व्यासंगाचे निदर्शक असतात असे नाही. वर्षभरात नवीन वाचन काय झाले याचा आढावा गंभीरपणे घेतला तर पदरात फार पडते असे नाही. एखाद्या प्राचार्याने अशी विचारणा करणे हेदेखील बहुसंख्य प्राध्यापकांना रुचत नाही. ग्रंथालयासाठी नवीन संदर्भग्रंथ घेण्याची फारशी आवश्यकता नाही असे उद्गार ऐकू येतात. ग्रंथालयातील बरीच रक्कम क्रमिक पुस्तकांचे संच विकत घेण्यासाठी खर्ची पडते. त्यात पुस्तकांच्या किंमती भरमसाट वाढल्याने फार पुस्तकेही घेणे शक्य होत नाही. या सर्व तपशिलाचा विचार करता पूर्वतयारीसाठी फार वेळ लागतो, मानसिक बळ खर्ची पडते आणि त्यामुळे कार्यभारातली वाढ असह्य आणि अहितकारक ठरते हा युक्तिवाद टिकत नाही. शिक्षणक्षेत्रातील परिस्थितीचे जे अन्य भाग आहेत, सुशिक्षितांच्या बेकारीचा जो बिकट प्रश्न आहे त्यासाठी कार्यभाराबद्दलची संघटनेची भूमिका घेता येईल. पण तो एक वेगळा विचार होईल, बौद्धिक श्रमाचा तात्त्विक निकष तेथे लावता येणार नाही.



# प्राध्यापक आणि संप : नैतिकता व व्यावहारिकता

अ. रे. डिसूझा

प्राध्यापकांच्या संप-संघर्षामुळे उच्च शिक्षणाच्या एकूणच संरचनेकडे, उद्दिष्टांकडे पुन्हा एकदा अंतर्मुख होऊन पाहण्याची गरज आहे.* या सर्व विषयाची चर्चा जेवढी व्यापक व सर्वांगीण झाली पाहिजे तेवढी अजूनही होत नाही. अशा चर्चेमध्ये एका व्यासपीठावर शिक्षणप्रक्रियेतील सर्व घटक शिक्षक-प्राध्यापक, विद्यार्थी-संघटना, शिक्षणसंस्थाचालक, कुलगुरू, शासकीय शिक्षण-प्रशासक, प्राचार्य, राजकीय व सामाजिक कार्यकर्ते, शिक्षणतज्ज्ञ व जागरूक पालक यांनी विचारमंथन करून आपल्या शिक्षणपद्धतीविषयी, तिच्या उद्दिष्टांविषयी व कार्यपद्धतीविषयी चर्चा केली पाहिजे. या चर्चेत सामाजिक स्वायत्तता असली पाहिजे. ही चर्चा शासकीय नियोजनापासून मुक्तही असली पाहिजे. शिक्षणाची गरज व पद्धती समाजाने ठरविली पाहिजे. आपण शिक्षणाची स्वायत्तता ही महत्त्वाची मानत आहोत. म्हणूनच शिक्षणाच्या राष्ट्रियीकरणाचा विचार लोकशाहीमध्ये निषिद्ध मानला जातो.

## १. शिक्षणाची संकल्पना

शिक्षण ही अशी एक संस्थात्मक सामाजिक संरचना आहे की व्यक्तिनिष्ठ पातळीवरील संक्रमित व नवीन ज्ञान जे आत्मरूप असते ते सामाजिक पातळीवर सर्वांकडे नेते. आपण नेहमीच निसर्गतः शिकत असतो. हे शिकणे सलग, सतत पण संमिश्र स्वरूपाचे व वैयक्तिक अनुभूतीने मर्यादित असते. पण शिक्षण मात्र परंपरेने चालत आलेल्या सुव्यवस्थित ज्ञानाच्या सामाजिक संक्रमणामुळे व्यापक व म्हणूनच उपयोगी बनते. शिक्षणाने मानव काळावर व अभिक्षेत्रावर (Time & space) विजय मिळवतो. शिकण्याच्या व्यक्तिगत पातळीवरून शिक्षणामुळे मानव सामाजिक पातळीवर उंचावला जातो. आपण शिक्षणामुळेच हजारो वर्षे चालत आलेल्या मानवसमाजाच्या शहाणपणाच्या पिरॅमिडच्या उत्तुंग टोकाचा भाग बनतो. म्हणूनच कांट म्हणतो की शिक्षण ही मानवालाच आवश्यक असणारी व केवळ मानवानेच निर्माण केलेली रचना आहे. ती मानव करू शकणारी एकमेव अर्थपूर्ण कृती आहे. मानवाच्या चैतन्याचा विवेकपूर्ण विकास म्हणजे शिक्षण. त्या द्वारेच आपणास जडतत्त्वापलीकडे बुद्धीच्या विश्लेषक मर्यादेतून मनाच्या व्यवहारांच्या संश्लेषक अमर्याद व्यापारांकडे जाता येते. त्यातच मानवाच्या विमुक्त मनाचा खरा विकास होतो. म्हणून शिक्षणाचा विचार हा स्वतंत्र स्वायत्त मनाचा सामाजिक विचार आहे. तो स्वायत्त राहिला पाहिजे व त्याचा सामाजिक संदर्भही राखला गेला पाहिजे. ही स्वायत्तता व हा संदर्भ राहिला नाही तर शिक्षण-व्यापार अर्थपूर्ण होत नाही. शिक्षणाची सामाजिक गरज व संयुक्तिकता यांवर समाज शिक्षणास किती मूल्य देतो हे अवलंबून आहे.

## २. प्राध्यापक

प्राध्यापक ही संकल्पना या चर्चेत अत्यंत मर्यादित अर्थाने वापरली आहे. सध्या आपल्या महाविद्यालयांत शिकवणारी व्यक्ती म्हणजे प्राध्यापक असा तो अर्थ आहे. त्याची कर्तव्ये व जबाबदाऱ्या शिक्षणाच्या स्थूल संदर्भात व विश्वविद्यालयीन अभ्यास-अध्ययनाच्या विशिष्ट संदर्भात नक्की करावी लागणार आहेत. तत्पूर्वी प्राध्यापकांच्या नैतिकतेच्या व व्यावहारिकतेच्या संदर्भात मुख्यतः ही चर्चा असल्याने संपाची काही स्थूल निरीक्षणे प्रथम लक्षात घेणे उपयुक्त ठरेल.

### प्राध्यापक-संप– काही निरीक्षणे

आजवर झालेल्या काही प्राध्यापक-संपांची निरीक्षणे केली असता सामान्यतः असे आढळले आहे की–

* जुलै १९८७ चा संप व डिसेंबर १९८८ चा संप दोनच मागण्यांसाठी ५२ दिवस व ३६ दिवस अनुक्रमे झाले– १. नवीन वेतनश्रेणी १ जाने. १९८६ पासून कार्यभार न वाढवता इतर कोणतीही प्रतिकूल अट न घालता लागू करावी. २. महाविद्यालयाच्या वर्गातील, तुकडीतील कमाल विद्यार्थिसंख्या ६० असावी.

अ) या संपांकडे सर्वसामान्य समाज अत्यंत तटस्थतेने, प्रसंगी हेटाळणीने पाहतो. कामगारांच्या संपावेळी जाणवणारी काळजीची व सहसंवेदनेची जाणीव या वेळी समाजात दिसत नाही.

ब) राज्यकर्तेही या संपाकडे व त्यातून उद्भवणाऱ्या परिणामांकडे लक्ष पुरवत नाहीत. तसे त्यांस वाटत नाही.

क) विद्यार्थिवर्ग या संपात निरिच्छ भूमिका घेतात. त्यांच्यामध्ये शिक्षणाच्या सापळ्यातून सुटलो अशी भावना आढळते.

ड) काही प्राध्यापकांस संपकाळ हा अधिक उपलब्ध झालेला फावला वेळ वाटतो.

इ) शिक्षणसंस्था व महाविद्यालयांचे प्रशासन या संपांमध्ये कोणतीही ठाम भूमिका घेत नाही. किंबहुना प्राध्यापक व शासन महाविद्यालयांच्या प्रशासनांस संपप्रक्रियेपासून दूर ठेवण्याची कटाक्षाने काळजी घेतात.

फ) संपांनी महाविद्यालयांच्या प्रशासनाची व संस्थांची स्वायत्तता संपुष्टात आणली आहे. प्रशासकीय, शैक्षणिक व संस्थात्मक उद्दिष्टांचे त्यामुळे विफलीकरण होत आहे.

ग) विद्यापीठेसुद्धा संपासंबंधात स्वतंत्र भूमिका विकसित करीत नाहीत. संलग्न महाविद्यालयांच्या रचनेमुळे तात्त्विक कोंडी झाल्याचे दिसते. खाजगी महाविद्यालयांतील प्राध्यापक खाजगी संस्थांचे सेवक असले तरी त्यांच्या सेवाशर्ती खाजगी संस्थांच्या नसतात तर विद्यापीठाच्या असतात. पण विद्यापीठ त्यांस प्रत्यक्ष काम देऊ शकत नाही. म्हणूनच विद्यापीठाच्या परीक्षांचे काम नाकारण्याचा आपणास हक्क आहे असे प्राध्यापक म्हणतात. परस्परसमंजसपणा होता तोपर्यंत ही व्यवस्था टिकून होती. पण जेव्हा मुद्द्यांचा बारकावा पाहण्याची परिस्थिती निर्माण झाली तेव्हा अनवस्था ओढवली. शिक्षण ही प्रक्रिया स्वेच्छेची व चैतन्यशील असल्याने ती जर प्रत्यक्ष नियम व काम अशा चौकटीत बद्ध केली तर शिक्षणाचे आणखीनच विफलीकरण होईल अशी साधार भीती संपानंतर वाटत आहे.

म) शिक्षणप्रक्रियेतील स्वायत्ततेचा अभाव, जबाबदारीशून्यता आणि समारंभस्वरूपाच्या परीक्षेतील गोपनीयतेचे असलेले वेड याचा संप करून गैरफायदा घेतला जात आहे.

भ) संपानंतर बुडालेले तास भरून काढत ज्या प्रकारची शिक्षणप्रक्रिया होते त्यामुळे एकूणच शिक्षणाविषयी विद्यार्थ्यांच्या मनात अविश्वास निर्माण होत आहे.

न) प्राध्यापकांच्या संपाच्या भूमिकेची चर्चा सविस्तर करण्याची आज गरज आहे. तत्त्वज्ञानात्मक अपुरेपणामुळे या संपाकडे समाजमन जाणीवपूर्वक पाहू शकत नाही, असे वाटते. वृत्तपत्रांतून एकांगी चर्चाच प्राध्यापकांच्या बाजूच्या किंवा प्राध्यापकांची खिल्ली उडवणाऱ्या आलेल्या दिसतात.

य) एकूणच उच्च शिक्षणाची व्यावहारिक उपयुक्तता आज शंकास्पद बनली आहे. १२ वीच्या पुढील शिक्षणाने काय मिळते? असा प्रश्न आपला समाज विचारत आहे. परंपरानिष्ठ व गतानुगतिक पद्धतीने उत्पादन व व्यवस्थापन करावयाचे असेल, उच्च शिक्षण जर केवळ ऐतिहासिक, वर्णनात्मक व चर्वितचर्वण करणारे छद्म संशोधन करून परदेशातून आयात केलेला ज्ञानव्यापार इथे तबकडीवर ऐकवणार असेल तर असे उच्च शिक्षण अनावश्यक आहे असे समाजाचे मत बनत आहे. संपामुळे या निरीक्षणास अनुमोदन मिळत आहे.

र) अशा परिस्थितीमध्ये संप करून शिक्षणप्रक्रिया दीर्घकाळ खंडित करून व परत ती हमखास सुरू करण्याचे आश्वासन देऊन महाविद्यालयीन प्राध्यापक शिक्षणप्रक्रियेबाबतचे अज्ञानच दर्शवतात.

## शिक्षण व उद्योग

शिक्षण ही काही वस्तू-उत्पादनप्रक्रिया नाही. यंत्राची कळ दाबली की उत्पादन सुरू व कळ दाबली की उत्पादन बंद. इथे एक सजीव सजग मन दुसऱ्या सजीव व संवेदनशील मनाशी संबंध साधत असते. त्या वेळी त्यांचा परस्परांवर विश्वास हवा व दोघांचाही ज्ञानप्रक्रियेवर विश्वास हवा. हा विश्वास कागदावर करार लिहून व अटींचे पालन करण्याची हमी लिहून देऊन निर्माण होत नाही.

पण कामगारांचे वस्तू-उत्पादनप्रक्रियेतील तत्त्वज्ञान जसेच्या तसे प्राध्यापक स्वीकारत आहेत. अभ्यासक्रम भरून काढण्याचे मान्य करताहेत. तेही काळाची कृत्रिम चौकट कायम ठेवून, हे टीकास्पद आहे. शिक्षणप्रक्रियेत चिंतन व सात्मीकरणास महत्त्व आहे. रात्रंदिवस गिरणी सुरू ठेवून तीन दिवसांचे उत्पादन एका दिवसात

तीन पाळ्या सुरू करून करता येते. पण रात्रंदिवस तास घेऊन सुट्ट्या रद्द करून शिक्षणप्रक्रिया अपेक्षित उत्पादन देईल हे केवळ अशक्य आहे. तसे मान्य केल्यास प्राध्यापकच सापळ्यात अडकतील. जेव्हा आपण तयारीसाठी व्याख्यानाच्या कालावधीपेक्षा कित्येकपट कालावधी लागतो असे म्हणतो तेव्हा असे परिश्रमपूर्वक तयार केलेले व्याख्यान अखंडितपणे विद्यार्थ्यांच्या कानावर घातले की काम झाले असे कसे म्हणता येईल ? तेथे वेळ नको का ? जसा प्राध्यापक व्याख्यानापूर्वी कित्येक तास त्या व्याख्यानविषयाचे चिंतन करीत असतो/असायला हवा त्याचप्रमाणे विद्यार्थीसुद्धा, विशेषतः विद्यापीठीय शिक्षण घेणारा, तासानंतर कित्येक तास चिंतनात राहायला हवा. तरच त्याचे अध्ययन सफल होईल.

## संप व प्राध्यापकांचा संप

संप म्हणजे सामुदायिक देवघेवीच्या मार्गाने आपले हितसंबंध जपण्यासाठी शोषित श्रमिक वर्गाने उत्पादन-प्रक्रिया थांबवून आपले हितसंबंध जपणारा करार करून घेण्यासाठी दिलेला लढा होय.

प्राध्यापकांनी केलेला कामाचा बहिष्कार हा संप म्हणता येतो का ? प्राध्यापक हे शोषित श्रमिक आहेत का ? शिक्षणाचे स्वरूप सामान्य उत्पादनप्रक्रिया असे आहे का ? कामगारवर्गाला जेव्हा जीवन जगता येत नाही, मानवाची प्रतिष्ठा लयाला जाणाऱ्या शोषणास तोंड द्यावे लागते, त्याचे नाशवंत श्रम उद्दामपणे मातीमोल मूल्याने मर्जीनुसार उत्पादन-संयोजन खरेदी करते तेव्हा शोषित कामगार संघटित होऊन त्या शोषणाविरुद्ध, अन्यायाविरुद्ध संपाचे शस्त्र उपसतो, लढा देतो. हा लढा पुकारताना कामगार जीवन देणारा कारखाना, उत्पादनव्यवस्था सामान्यतः स्वतः नष्ट करत नाही. प्राध्यापकांचा संप या स्वरूपाचा आहे का ? या प्रश्नास उत्तर द्यावे लागेल.

जर प्राध्यापकांची स्थिती संपाकडे लोटलेल्या कामगारांसारखी झालेली असेल तरच प्राध्यापकांचा संप नैतिक आहे असे म्हणता येईल. प्राध्यापकांचे वेतन देशातील जीवनावश्यक वेतनमानाच्या निकषावर तपासूनच त्याच्या संपाची नैतिकता तपासावी लागेल. बौद्धिक, मानसिक स्वातंत्र्य व गळचेपी यांसाठी प्राध्यापक संप करत आहेत असेही काही फारसे आढळत नाही. पूर्ण सेवाशाश्वती व सामाजिक कल्याण योजनांत आज प्राध्यापकांस सहभागी करून घेतले आहे.

काही बाबतीत महाविद्यालयांत अभ्यासिका, इ.च्या सोयी नाहीत; पण तेवढे कारण संप नैतिक ठरविण्याइतके सबळ नाही. बँका, खाजगी अभियांत्रिकी कंपन्या, विमा कंपन्या, पेट्रोलियम व खत उद्योग यांच्याशी तुलना करता प्राध्यापकांचे वेतन कमी आहे. पण त्यावरून प्राध्यापकांस संप करण्याची नैतिकता कशी काय प्राप्त होते ? अर्थात वरील उच्च वेतन असणाऱ्या उद्योगांतही संप अनैतिकच ठरतात. या उद्योगांतील लठ्ठ पगार घेणारे संघटित होऊन समाजास ओलिस धरतात व ते अनैतिक आहे. उच्च नैतिकतेचा आदर्श असणाऱ्या या देशात महात्माजी म्हणत, "माझ्या कोटयवधि बांधवांच्या अंगावर सदरा नसताना मी सदरा घालणे योग्य नाही." शिक्षण व शिक्षक अधिभौतिक भोगांपासून दूर ठेवले नाही तर अनवस्था येईल.

## प्राध्यापकांच्या जबाबदारीचे स्वरूप व संपाची नैतिकता

या लेखाच्या सुरुवातीस शिक्षणप्रक्रियेच्या तात्त्विक बाजूचा थोडा विचार केला होता. इथे संपाच्या नैतिकतेच्या संदर्भात आणखी पुढची चर्चा मांडण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

शिक्षण ही चैतन्यशील, भविष्यदर्शी व स्वायत्त मनोव्यापारांवर आधारलेली संकल्पना आहे. ती मानवी सुसंस्कृत समाजाच्या सातत्यपूर्ण विकासासाठी आवश्यक असणारी पूर्वअट आहे. सोईसाठी या शिक्षण कार्यक्रमाचे प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व विश्वविद्यालयीन/महाविद्यालयीन शिक्षण असे टप्पे पाडण्यात येतात. या टप्प्यांमध्ये अ) प्राथमिक स्तरावर मुलांची ज्ञानेंद्रिये विकसित करणे व भावनिक सामाजीकरण करणे असे उद्दिष्ट असते. इथे मूल शिकते, स्वतःच्या अनुभवांतून ज्ञानेंद्रियांचा वापर करते व सामाजिक अभिवृत्ती समजते. ब) माध्यमिक स्तरावर सांकेतिक प्रशिक्षणास जास्त महत्त्व असते. वाचन, लेखन, गणन, चिंतन, अनुमान व बौद्धिक सामाजीकरण, समाजपरंपरांचे सामयिक व अभिक्षेत्रीय ज्ञान (Spatio Temporal knowledge) यास महत्त्व असते. इथे बौद्धिक शिस्त सर्वांस किमान पातळीपर्यंतची लावली जाते. ज्ञानसंपादनाची साधने कौशल्ये पटवून घेतली जातात.

अनुक्रमणिका







ज्ञानक्षेत्रांचा स्थूल परिचय करून दिला जातो. इथे माहितीपरता जास्त असते. आज इथे ही ज्ञानपरता आणण्याचा प्रयत्न नव्या शैक्षणिक धोरणाने केला जाणार आहे.

विश्वविद्यालयीन/महाविद्यालयीन पातळीवर मात्र ज्ञानपरता (Knowledge Orientation) व काही प्रमाणात शहाणपणा (Wisdom Seeking) यांचे प्रबोधन अपेक्षित आहे. इथे येणाऱ्या प्राध्यापकास आपल्या कामाच्या तात्त्विक बैठकीचे, आपण कोणती जबाबदारी स्वीकारतो आहो याचे पूर्ण ज्ञान हवे. इथे ज्ञानाशी, ज्ञानाच्या व्यावहारिक उपयोजनाशी व त्याच्या चैतन्यशीलतेशी बांधिलकी हवी आहे. सैनिक ज्याप्रमाणे आपली जबाबदारी देशसंरक्षणाच्या भूमिकेतून स्वीकारतो, निष्ठेने स्वीकारतो व आपल्या कृतीने या निष्ठेस, उद्दिष्टास बाध येणारे कृत्य तो नैतिक मानत नाही. तसेच प्राध्यापकाचे, कोणत्याही शिक्षकाचे असायला हवे.

आपल्या कृतीमुळे संपूर्ण ज्ञानप्रक्रियाच धोक्यात येत असेल, त्या प्रक्रियेच्या स्वायत्त व चैतन्यशील तत्त्वास छेद जाऊन तेथे जर आपल्या कृतीने प्राणहीन नियमांची चौकट आपणच आणून बसवणार असलो तर शिक्षणाची विश्वासार्हता नष्ट होईल. शिक्षणच नष्ट करण्याची कृती प्राध्यापकांकडून झाली असे भावी पिढ्या म्हणतील व हे जास्त अनैतिक आहे. प्राध्यापकांनी इतर घटकांचा विचार न करता आपल्या शिक्षणपद्धतीस आपणच जपले पाहिजे. आम्हीच आमचे दीप बनले पाहिजे. ती आपण उमजून स्वीकारलेली जबाबदारी आहे. ती टाळून आपणांस प्राध्यापक म्हणवून घेण्याचा अधिकार उरणार नाही. प्राध्यापकांविषयी किमान अपेक्षा व्यक्त करणारी व्याख्यासुद्धा प्राध्यापकांस या जबाबदारीतून मुक्त करू शकणार नाही. आम्ही संप करून प्रश्न सोडवू हे शिक्षकांस म्हणताच येणार नाही. कारण शिक्षक स्वेच्छेने या व्यवसायात येतो व तसे असेल तरच तो प्रामाणिकपणे ज्ञानव्यापारात सहभागी होऊ शकतो. विद्यार्थ्यांस सहभागी करतो. आज स्वेच्छेने या व्यवसायाकडे येणाऱ्यांची संख्या कमी होत आहे. असे असले तरी एकदा हा व्यवसाय स्वीकारताच त्यांनी त्याची पथ्ये पाळलीच पाहिजेत. संप करणारे कंडक्टर ज्याप्रमाणे बससेवा नष्ट करीत नाहीत, त्याचप्रमाणे प्राध्यापकांनी शिक्षण नष्ट करू नये. संपाने ते होत आहे.

महाविद्यालयीन शिक्षण हे अधिक स्वायत्त आहे. कारण मूलतः पाहता एकदा व्यक्तीला माध्यमिक स्तरापर्यंतचे वाचन, चिंतन, अनुमान यांचा पाया मिळाला, ज्ञानसाधने परिष्कृत झाली की पुढचा ज्ञानमार्ग प्रौढ झालेला ज्ञानसाधक स्वतःसुद्धा चोखाळू शकतो. आपण अशा भ्रमात मुळीच राहू नये की प्राध्यापक मुलांस महाविद्यालयात मार्गदर्शन करतात, तेच त्यांचे त्राते आहेत. (बहुतांशी सर्व प्राध्यापकांस मनातून हे पटलेलेच आहे की आपले विद्यार्थ्यांची ज्ञानप्रक्रिया जागृत करण्यात फारसे स्थान नाही. आपण फारसे काही आजवर केलेले नाही.) आज तर ज्ञानसाधने इतकी झपाट्याने वाढत आहेत की महाविद्यालयीन मार्गदर्शनाची फारशी गरजच उरलेली नाही. विद्यापीठ अनुदानाच्या व नव्या शैक्षणिक कार्यक्रमात असे स्पष्ट म्हटले आहे की नवीन ज्ञान इतक्या वेगाने वाढत आहे की शिक्षकास त्याचे अवधान राखणे कठीण जाणार व शिक्षक जुना होत जाईल तसे हे अधिकच होणार. म्हणून महाविद्यालयीन शिक्षकाकडून मुख्य अपेक्षा आहे ती दिशा दाखवण्याची व विश्वविद्यालयीन ज्ञानप्रक्रियेचा वेगळेपणा समजावून देण्याची. ज्ञानअनुभूती घेण्याची वृत्ती जागृत करण्याचे व ज्ञानाचे उपयोजन समजावून देण्याचे काम महाविद्यालयीन शिक्षकांनी केले पाहिजे. जर हे होत नसेल तर आपली महाविद्यालये चुकीच्या नावाच्या संस्था आहेत असे म्हटले जाईल. संपाद्वारे आपण असे दाखवून देतो आहो की मुक्त समाजाप्रमाणे केवळ उच्च शिक्षणाच्या मूठभर संस्था ठेवून इतर सर्वांसाठी १२ वीपर्यंत शिकवा. पुढे सामान्य लोकांनी स्वतंत्रपणे अभ्यास करून मुक्त विद्यापीठांच्या पदव्या घ्याव्या. कला, वाणिज्य शाखांबाबत हे धोरण येण्याची जास्त शक्यता संपाद्वारे आपण निर्माण करीत आहो. या दृष्टीने संपाची व्यावहारिकता महाविद्यालयांच्या विस्तारावर व वाढीवर प्रहार करणारी ठरेल.

कामगारांचे संप होताच व्यवस्थापन ज्याप्रमाणे यांत्रिकीकरण, उत्पादनतंत्रात बदल यांच्या शोधात राहते तीच गोष्ट महाविद्यालयांबाबतही संभवते. १२ वीच्या परीक्षांवरील बहिष्कारामुळे परीक्षांचे स्वरूपच बदलण्याचा व संगणकाद्वारे उत्तरपत्रिका तपासून घेण्याचा विचार नक्कीच पुढे येणार आहे.





संपाचा महाविद्यालयांबाबत विशेषतः शिक्षणाबाबत एक सुपरिणाम होण्याचीही शक्यता आहे. तो म्हणजे शिक्षणसंस्था अधिकाधिक स्वायत्त होण्याचा. प्रत्येक महाविद्यालयावर तेथील शिक्षण दर्जेदार करण्याची जबाबदारी घेणार व त्यामुळे स्वातंत्र्य मिळणार. प्रश्न साधनसंपत्तीचा आहे. पण सर्वच साधनसंपत्ती सरकारनेच का पुरवायची ? शिकणाऱ्या मुलांनी चांगल्या शिक्षणासाठी चांगले शिकवणाऱ्या संस्थांस साधनसंपत्तीची मदत पुरवायची हे नवे तत्त्वज्ञान वाढत्या सामाजिक-आर्थिक समृद्धीबरोबर येणार आहे. गालब्रेथ यांनी म्हटल्याप्रमाणे " समृद्ध समाजाचे, समृद्ध शिक्षणपद्धती निर्माण करण्याचे उत्तरदायित्व असतेच." विनाअनुदान अभियांत्रिकी व वैद्यकीय महाविद्यालयांस अशी अधिक साधनसामग्री समाजातील " आहेरेंनी " उपलब्ध करून दिलेली नाही का ? या संपानंतर सरकार अधिकाधिक आर्थिक जबाबदाऱ्याही समाजाकडे हस्तांतरित करील. स्वायत्तता व आर्थिक साधनसंपत्ती मिळवण्याच्या स्वातंत्र्यातूनच व्यावहारिक व अर्थपूर्ण जबाबदार उच्च शिक्षणाचे नवे पर्व महाराष्ट्रात या संपातून उद्भवलेल्या प्रश्नांमुळे व सरकारवरील आर्थिक ताणामुळे सुरू झाले तर ती शुभ घटनाच ठरेल. कारण तेव्हाच " काम करणारे शिक्षण " (Education that works) आपली महाविद्यालये देतील; कारण तेव्हाच ती स्वतंत्रपणे विद्यार्थ्यांस, पालकांस, समाजास उत्तर देण्यास जबाबदार राहतील.

या चर्चेचा अर्थ असा नाही की महाविद्यालयीन अध्यापकांचे काहीच प्रश्न नाहीत. अनेक प्रश्न आहेत. नवे शैक्षणिक धोरण–१९८७–प्रोग्रॅम ऑफ ॲक्शनमध्ये असे प्रांजळपणे नमूद केले आहे की–

'Grievance Removal– (Higher Education)

Removal of grievances will be effected by the creation of a suitable machinery which could take speedy action. Grievances pertaining to pay scales, or service conditions ect. which relate to many colleges or institutions cannot be resolved at the institutional level. Hence an inter–institution or state level machinery will be created to examine such grievance within limited time. Unfortunately in our institutions numerous individual grievances accumulate over time and lead to good deal of discontent. Steps will be taken to examine if an ombudsman type of senior person conld be appointed at the pro-vice-chancellor's level in every University only to look into all the records, in the case of individual grievances, and tender his advice to the vice-chancellor and the executive council/syndicate for remedial action.'

( New Policy of Education 1986 Programme of Action.)

**प्राध्यापक-संपाची व्यावहारिकता :**

प्राध्यापक संपाची नैतिकता सविस्तर पाहिल्यानंतर व्यावहारिकता पाहणे उचित व उपयुक्त आहे. व्यावहारिकता या शब्दातच नैतिकता सांभाळणे शक्य नाही असा ध्वन्यर्थ आहे. जेव्हा नैतिकता पाळणे अशक्य होते तेव्हा नैतिक भूमिका व्यावहारिक नाही. सद्यः देशकाल-मान पाहून जसे वागणे शहाणपणाचे समजले जाते त्यास व्यावहारिकता म्हणतात. व्यावहारिकता म्हणजे शहाणपणाचा मार्ग. तो आदर्शवादही नाही.

ही व्यावहारिकता प्राध्यापक-संपाच्या संबंधात त्रिविध स्वरूपाची आहे–

अ) प्राध्यापकांच्या दृष्टीने, ब) विद्यार्थ्यांच्या दृष्टीने व क) समाजाच्या दृष्टीने.

अ ) **प्राध्यापकांच्या दृष्टीने व्यावहारिकता–** आजच्या संघर्षमय, लोकशाही समाजवादी अर्थव्यवस्थेत व राजकीय जीवनात समान आर्थिक हितसंबंध असणारे लोक संघटित होणे व त्यांनी आपल्या अधिकाधिक हितासाठी व आर्थिक लाभासाठी संघटना करणे उचित समजले जाते. त्यामुळे प्राध्यापकही आपण संघटना करणे व आपल्या आर्थिक लाभासाठी व पिळवणूक, छळणूक होऊ नये म्हणून सामुदायिक देवघेव व करार करण्यासाठी सर्व मार्ग वापरणे योग्यच आहे असे मानतात. संप हा एक आपले आर्थिक व इतर हक्क मिळवण्याचे साधन आहे, त्यामुळे ते आपण वापरणे यात व्यावहारिकता आहे असेच प्राध्यापक-संघटनांचे

न. भा. १०







अनुक्रमणिका

मत आहे. संपाच्या मार्गानेच शासनाला जाग येत असल्याने तोच एक व्यावहारिक मार्ग आहे असे प्राध्यापकांचे मत आहे. प्राध्यापकांचे प्रश्न स्वतःहोऊन व्यवस्थापन, शासन व विद्यापीठे सोडवत नाहीत, सोडवू इच्छीत नाहीत. अशा वेळी नैतिक आदर्शवादी भूमिकेचे पालन अशक्य ठरते. त्यातून पिळवणूक व गुलामी निर्माण होते. म्हणून त्यापासून मुक्ती मिळवण्याचा व्यावहारिक मार्ग संपच आहे असे प्राध्यापक-संघटना मानतात.

ब) विद्यार्थ्यांच्या दृष्टीने संपाची व्यावहारिकता ही पूर्णपणे असमर्थनीय स्वरूपाची दिसते. आपल्या केवळ कालबद्ध अभ्यासक्रमपूर्तता करण्याच्या पद्धतीत संपामुळे विद्यार्थ्यांचे अपरिमित नुकसान होते. आपण अभ्यासक्रम प्रथम ठरवून नंतर तो कालबद्ध करतो असे न होता प्रथम आपण किती वर्षांचा अभ्यासक्रम हे ठरवतो व तेवढ्या वर्षांमध्ये अभ्यासक्रमाचे तुकडे करून टाकतो. काळाची चौकट ही आपण अधिक महत्त्वाची मानतो. म्हणजे आपण अभ्यास पूर्ण झाला की नाही, हे न पाहता वर्ष वाया जाते की नाही, हे पाहतो. त्याला जास्त महत्त्व देतो. संपामुळे दिवस वाया जातात तेव्हा विद्यार्थ्यांना काळजी असते ती अभ्यास वाया जाण्याची नव्हे तर वर्ष वाया जाण्याची. संप संपण्यामध्ये म्हणूनच विद्यार्थ्यांस फारसे स्वारस्य नसते कारण त्यांना अनुभवाने माहीत असते की त्यांचे वर्ष काही वाया जाणार नाही. शासन ते होऊ देणार नाही. प्राध्यापक अभ्यास "भरून" काढणार. पण हे असे अध्ययनापेक्षा काळाच्या चौकटीला चिकटून राहणे व्यावहारिक नाही हे विद्यार्थ्यांच्या लक्षातच येत नाही. विशिष्ट अभ्यासक्रम व अध्ययनपूर्ती झाल्याशिवाय शिक्षण पूर्ण कसे होणार? प्राध्यापकांच्या संपामुळे उद्‌भवणाऱ्या परिस्थितीमध्ये उरलेल्या अल्पकाळात प्राध्यापक केवळ बाह्यात्कारी अभ्यासक्रम पूर्ण करण्याची केविलवाणी धडपड करतात. विद्यार्थ्यांचे प्रयोग, कसोट्या कशाबशा पूर्ण केल्या जातात परिणामतः विद्यार्थ्यांस प्रचंड शारीरिक व बौद्धिक ताणास तोंड द्यावे लागते. विद्यार्थ्यांचा उरलासुरला शिक्षणावरील विश्वासच उडतो. तो अवैध मार्गाकडे ढकलला जातो. थोडक्यात, संपामुळे शिक्षणामधील अप्रामाणिकतेस एक छद्म समर्थन प्राप्त होते व हे सर्वांत अव्यावहारिक आहे. ज्ञानव्यापाराची हानी करणारे आहे.

क) सामाजिक दृष्टचा संपाची व्यावहारिकता समाजात शिक्षण व शिक्षक यांविषयीची मूल्यधारणा वेगळी असते. समाजातील इतर घटक अनैतिक व विधिनिषेधशून्यपणे वागत असले तरी शिक्षणक्षेत्रात मात्र उच्च नैतिकता असलीच पाहिजे, असा त्यांचा आग्रह असतो. कारण शिक्षक व शिक्षण यांचे समाजविकास व समाजबांधणीतील स्थान ते तडजोडीच्या पलीकडचे समजतात. चुकीचे सिमेंटप्रमाण वापरून इमारतीच्या बांधकामात भ्रष्टाचार करणाऱ्यास किंवा जीवनावश्यक वस्तूंचा काळा बाजार करणाऱ्यास बाराखड्या चुकीच्या शिकवणे, किंवा अभ्यासक्रमात शिक्षकाने कुचराई करणे मान्यच नाही. कारण विद्यार्थी हा सजग व सजीव घटक आहे. त्याच्या विकासात झालेली चूक ही चिरस्थायी होते. समाजाची कायमची हानी करते. विशेषतः प्रगत समाजात शिक्षणाचे अखंड सातत्य ही सर्वांत महत्त्वाची बाब मानली जाते. शिक्षणप्रक्रियेत खंड पडणे म्हणजे देशाच्या विकासात खंड पडणे होय. संप ही घटना असा खंड निर्माण करते. त्यामुळे ती सामाजिक दृष्टचा व्यावहारिक नाही. काही रसायनांच्या कारखान्यात जशा काही सातत्यपूर्ण प्रक्रिया असतात त्या बंद पडू देऊन चालत नाही त्याचप्रमाणे शिक्षण ही अखंड चालू राहण्याची गरज असणारी प्रक्रिया आहे. ती थांबवणे हे अव्यावहारिक आहे.

भारतामध्ये नालंदा, तक्षशिला येथील आपल्या अस्सल भारतीय ज्ञान–शिक्षणपद्धतीमध्ये खंड पडले व भारत ज्ञानाच्या क्षेत्रात दूर फेकला गेला. थोडक्यात, शिक्षणप्रक्रिया अखंड व प्रामाणिकपणे चालू राहणे समाजाच्या गरजेचे आहे. कच्चा माल, उत्पादनप्रक्रिया व उत्पादन हे उद्योगाचे मॉडेल शिक्षणप्रक्रियेस लागू पडत नाही. कारण इथे "कच्चा माल" प्रक्रिया झाल्यानंतर ते "उत्पादन" योग्य नाही म्हणून बाद करता येत नाही. तो एकूण समाजाच्या प्रवाहचक्रामध्ये येतोच व प्रदीर्घकाळ समाजाच्या व देशाच्या विकासावर प्रतिकूल प्रभाव पाडतो. म्हणून उच्च शिक्षणात संप होऊ देणे सामाजिक दृष्टचा मुळीच व्यवहार्य नाही.

पाश्चात्य देशांतील विद्यापीठांचे इतिहासही हेच दाखवतात. "युनिव्हर्सिटी" याचा अर्थच मुळी विश्वसमाज ( Universal Community ) असा होता. जेव्हा युरोपमध्ये युद्धे होत तेव्हाही पिसा, हायडेलबर्ग, बुडापेस्ट, गोयटिंगन व सोरबा इ. विद्यापीठांतील






विद्यार्थी व प्राध्यापक अखंडपणे अध्ययन-चिंतनात मग्न असत. मित्रदेश व शत्रुदेश हा विचार त्यांच्या संचारावर परिणाम करीत नसे. कारण ज्ञान हे वैश्विक महत्त्वाचे म्हणून विश्वविद्यालयीन शिक्षणात खंड निर्माण करणारी कोणतीही घटना ही अयोग्य व अव्यवहार्यच असते.

**संपाशिवाय समस्या कशा सुटतील ?**

आता प्रश्न असा निर्माण होतो की आज जेव्हा आदर्शवादी व निवृत्तीपर समाज नाही व भोगपर प्रवृत्ती व वर्गीय हितसंबंध हाच जीवनाचा आधार बनला आहे तेव्हा शोषित प्राध्यापकांनी काय करावयाचे ? कोणता मार्ग अवलंबावयाचा ? हा प्रश्न शिक्षणक्षेत्राने आपल्या स्वतंत्र प्रतिभेच्या साहाय्याने सोडवावा अशी अपेक्षा आहे. दुसऱ्यांच्या मार्गाची उसनवारी करून नव्हे.

शिक्षणात आपण आज स्वतंत्र चिंतनास, स्वतःच्या स्पष्टीकरणास महत्त्व देत आहो. तेच खरे ज्ञान आहे असे म्हणतो. म्हणून आपल्या समस्याही स्वतंत्र व चिंतनशील मार्गानेच सोडविल्या पाहिजेत. हा प्रश्न शिक्षणक्षेत्रातील सर्व जबाबदार घटकांच्या एकत्र-एका व्यासपीठावरील चर्चेनेच सुटणार आहे. त्यासाठी संपासारख्या संपूर्ण शिक्षणक्षेत्रास खीळ घालणाऱ्या कृती करण्यापूर्वी प्राध्यापकप्रतिनिधी, कुलगुरू, संस्थांचे प्रतिनिधी, प्राचार्यांचे प्रतिनिधी, शैक्षणिक विचारवंत, युवक नेते, विद्यार्थी नेते, शासकीय प्रशासनाधिकारी व राजकीय नेतृत्व इ. या सर्वांनी मिळून बारकाईने चर्चा करूनच प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठी अशी चर्चा घडवण्याचा प्रयत्न प्राध्यापक संघटनेने केला पाहिजे. अलीकडच्या प्राध्यापक-संपांच्या निर्णयापूर्वी अशी व्यापक चर्चा झालेली नाही. त्यामुळेच या संपांची नैतिकता, व्यावहारिकता व फलश्रुती कुणासही समाधान देणारी झालेली नाही. उच्च शिक्षणप्रक्रियेच्या विश्वासार्हतेमधील एक वीट मात्र निखळली हे नक्की.



# महाविद्यालयीन शैक्षणिक साधने : अपेक्षा व वस्तुस्थिती

स. न. होनप

भारत स्वतंत्र झाल्यानंतर आपल्या शासनाच्या साहाय्याने शिक्षणक्षेत्रात आमूलाग्र बदल अपेक्षित होते. स्वातंत्र्यपूर्व काळात एकूण समाजापैकी अतिशय थोडया व्यक्ती शिक्षणाचा लाभ घेऊ शकत होत्या.

प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण, महाविद्यालयीन शिक्षण व विश्वविद्यालयीन शिक्षण पूर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या भारताच्या लोकसंख्येच्या तुलनेत नगण्य होती.

भारत स्वतंत्र होऊन आता एकेचाळीस वर्षे पूर्ण झाली. या कालावधीत शिक्षणाच्या साहाय्याने आपण भारतीय विद्यार्थ्यांना अभ्यासू, आत्मनिर्भर नवनवीन ज्ञानशाखांत प्रावीण्य मिळविणारे, समाजहितैषी बनवू शकलो नाही ही वस्तुस्थिती आहे. याची कारणे अनेक असली तरी हा लेख महाविद्यालयातील शिक्षणाचा अविभाज्य घटक असलेल्या शैक्षणिक साधनांपुरता व ती हाताळणारा प्राध्यापकवर्ग व त्या साधनांच्या साहाय्याने प्रयोग करून आपल्या ज्ञानाला सघन बनविणारा विद्यार्थिवर्ग यांच्यापुरताच मर्यादित आहे.

## शैक्षणिक साधने

१) **सुसज्ज ग्रंथालय** : मानवाच्या शरीररचनेत मेंदूला जे महत्त्व तेच महत्त्व महाविद्यालयात ग्रंथालयाला आहे. या ग्रंथालयात एन्सायक्लोपीडिआसारखे संदर्भ-ग्रंथ, शब्दकोश, नकाशासंग्रह, प्रत्येक विद्याशाखेला आवश्यक असणारे सर्व प्रकारचे ग्रंथ, त्याशिवाय विद्यापीठाने नेमलेली पुस्तके, या सर्वांची योग्य देखभाल करणारा ग्रंथपाल, साहाय्यक, पुरेसा उजेड, स्वच्छ हवा, धुळीपासून संरक्षण, पुरेशी टेबले, खुर्च्या व सकाळी सात ते रात्री अकरापर्यंत विद्यार्थी अगर प्राध्यापक यांना तेथे निवान्तपणे अभ्यास करता येईल अशी व्यवस्था होणे आवश्यक आहे.

वस्तुस्थिती अशी आहे की ग्रंथालयाकडे शासन, शिक्षणसंस्था, प्राचार्य, प्राध्यापक व विद्यार्थी या सर्वांचेच अक्षम्य दुर्लक्ष झालेले आहे.

मुळात आपण पुस्तक वाचून आवश्यक तो मजकूर वाचून टाचणे तयार करावीत, प्रश्नांची उत्तरे लिहावीत, ती संबंधित प्राध्यापकांकडून तपासून घ्यावीत, आपापसांत चर्चा करावी ही कल्पनाच नाहीशी होत चालली आहे. नकारात्मक कारणे अनेक असली तरी त्यांवर मात करणे हे प्रत्येक विद्यार्थ्याचे कर्तव्य आहे. प्रश्नांची तयार उत्तरे पाठ करणे (गाईडमधून) हे ज्ञानार्जन नव्हे. विषय आपल्याला उत्तम समजला याची सोपी खूण म्हणजे तो विषय दुसऱ्याला समजेल अशा रीतीने शिकविता आला पाहिजे. त्यावरील प्रमेये, प्रश्न व उदाहरणे सोडविता आली पाहिजेत.

या संदर्भात आत्मपरीक्षणाकरिता खालील प्रश्नावली तयार केलेली आहे.

### प्राध्यापक

१) आपण आपल्या प्राप्तीचा कितवा हिस्सा पुस्तकांच्या खरेदीसाठी खर्च करता ?

२) दिवसाच्या चोवीस तासातील किती तास, आपण शिकविण्याच्या विषयांचे वाचन, टाचण तयार करणे, जादा वाचन यांकरिता वापरता ?

३) आपण ग्रंथालयातून जी पुस्तके स्वतःच्या नावाने नोंद करून घेता ती किती कालावधीत आपण ग्रंथालयात परत करता ? ज्या पुस्तकांची विद्यार्थ्यांना गरज आहे ती आपल्या नावावर घरी नेऊ नयेत ही खबरदारी आपण घेता का ?

४) आपण ज्या वेळी वर्गात एखाद्या विषयाचे विवरण करता त्या वेळी आपण वाचलेल्या संबंधित पुस्तकांची यादी, त्यातील महत्त्वाचा मजकूर याची चर्चा, स्वाध्याय व विद्यार्थ्यांना सहभागी करून विषयाचे संपूर्ण ज्ञान विद्यार्थ्यांना होईल याची खबरदारी घेता का ?

५) दररोज किमान अर्धा तास तरी आपण विद्यार्थ्यांच्या शंकांचे निरसन करणे, त्यांच्या इतर



अनुक्रमणिका

अडचणींचे निवारण करणे याकरिता वेगळा काढून ठेवता का ?

६) आपण जो विषय शिकवितो त्याचे अद्ययावत ज्ञान आपल्याला आहे असा सार्थ अभिमान बाळगण्या-इतकी आपली तयारी आहे का ?

७) आपल्या महाविद्यालयात, गावात, शहरात आपल्या विषयाची चर्चा करता येईल अशी मंडळे स्थापन करण्याचा, त्यांत सहभागी होण्याचा प्रयत्न आपण केला आहे का ?

८) शिक्षणाची प्रक्रिया अखंड चालणारी असते. आपला दुवा कच्चा राहता कामा नये याकरिता आपण नक्की कोणते उपक्रम राबविता ?

९) परीक्षांकरिता प्रश्नपत्रिका तयार करताना त्यातील गणिते आपण स्वतः तयार केलेली असतात का ?

१०) पुढील वर्षी आपण जे विषय शिकवावयाचे ठरवले आहे त्या सर्व विषयांची पूर्ण तयारी आपण शिक्षणसत्र तयार होण्यापूर्वी केलेली असते का ?

११) नेमलेल्या पाठ्यपुस्तकांपलीकडे संबंधित विषयाचे ज्ञान वाढावे अशी धडपड आपण करता का ?

१२) शक्य असेल तेव्हा गरजू विद्यार्थ्याला पुस्तके विकत घेऊन देणे, विद्यार्थ्यांच्या अभ्यासाच्या प्रगतीवर वैयक्तिक लक्ष ठेवणे, सर आपल्या पाठीशी आहेत असा सार्थ अभिमान बाळगणारे विद्यार्थी तयार करणे या सर्व गोष्टींत आपल्याला रस आहे का ?

१३) कच्चे विद्यार्थी हेरून त्यांना जादा वेळ देऊन त्यांच्याकडून विषयाची उत्तम तयारी ( परीक्षे-पुरती नव्हे ) करून घेणे हीच अखेर आपण स्वीकार-लेल्या व्रताची कसोटी आहे असे आपण मानता का ?

१४) आपल्या घरी दर महिना काही पुस्तके विकत घेऊन आपण स्वतःचे ग्रंथालय तयार केले आहे का ?

१५) (अ) वर्गात आधी विषय उत्तम समजावून देणे, नंतर आवश्यक वाटल्यास थोड्या नोट्स देणे व एखादे तरी उदाहरण सोडवणे व विद्यार्थ्यांना प्रश्न विचारून त्यांनी दिलेल्या उत्तरांची चर्चा करणे, (आ) विद्यार्थ्यांना समजते किंवा नाही याची शहानिशा न करिता विद्यार्थ्यांना नोट्स लिहून घ्यावयास लावणे, व शेवटी विषय शिकवून संपला असे जाहीर करणे, आपण यांपैकी कोणत्या प्रकारात मोडता ?

या सर्व प्रश्नांना समर्थपणे उत्तरे देता येत असतील तर त्याचे मूळ ग्रंथवाचनात आहे. प्रत्येक खेड्यात एक ग्रंथालय हे तर सर्व भारतीयांचे स्वप्न असावयास हवेच. पण जसा मुख्यमंत्री-निधी, पूरग्रस्त, धरणग्रस्त, वादळग्रस्त यांच्याकरिता निधी गोळा केला जातो त्याच-प्रमाणे इन्कमटॅक्स, सेल्सटॅक्स व्यवसायकर, घरपट्टी, पाणीपट्टी, ग्रामपंचायतकर, वीजबिलावर आकारले जाणारे कर यांतील काही भाग तरी ग्रंथालयसंख्येत वाढ, ग्रंथालयसमृद्धी, प्रशस्त ग्रंथालये यांसाठी उप-योगात आणणे अत्यावश्यक आहे. "गाव तेथे ग्रंथालय" ही काळाची गरज आहे.

गावातील सर्व शाळा, महाविद्यालये व्यवस्थित चालावीत, प्राध्यापकांत एकजूट असावी, आपल्या पाल्याची सर्वांगीण प्रगती व्हावी एवढ्या माफक अपेक्षा पालकांच्या व अन्य नागरिकांच्या असतात. यामुळे कॉलेज-व्यवस्थापन, प्राध्यापक, विद्यार्थी, पालक व अन्य नागरिक यांच्यात सौहार्द असणे आवश्यक आहे.

(२) **प्रयोग-शाळा** : सुसज्ज प्रयोगशाळा, त्यात उत्तर दिशेला मोठ्या खिडक्या, व्हेंटिलेटर्स, एक्झॉस्ट फॅन, प्रशस्त टेबले, भरपूर उपकरणे, चालू स्थितीत असलेली सर्व विजेची उपकरणे, धुळीपासून संरक्षण व्हावे म्हणून सर्व स्पेक्ट्रोमीटर, गॅल्व्हनोमीटर, इले-क्ट्रॉनिक उपकरणे यांना प्लास्टिकची आवरणे, उत्तम स्थितीत असलेले भौतिक-रासायनिक प्रयोगशाळेत वापरले जाणारे तराजू, सर्व उपकरणांची दैनंदिन देखभाल करू शकेल व किरकोळ दुरुस्त्या करू शकेल असा प्रयोगशाळा-साहाय्यक, वीजवापर, विजेची उपकरणे यांची माहिती असलेला सेवकवर्ग व ह्या सर्व गोष्टींवर व्यवस्थित लक्ष ठेवू शकेल असा तज्ज्ञ प्राध्या-पक; प्रत्येक विद्यार्थ्याला स्वतंत्रपणे प्रयोग करता आलाच पाहिजे, त्याने स्वतः घेतलेल्या निरीक्षणांचीच नोंद करून जर्नल पूर्ण केले पाहिजे. (१) निरीक्षण, (२) नोंद, (३) पृथक्करण, (४) कलन, (५) रीत, (६) उत्तर, (७) उत्तरातील त्रुटींची संभाव्य कारणे व त्यांवर उपाय, (८) आवश्यक तेथे आकृत्या या किमान आवश्यक गोष्टींची येथे नोंद केली तरच तो प्रयोग पूर्ण झाला असा आग्रह प्रयोगशिक्ष-कांनीच धरला पाहिजे. प्रयोग करण्यामुळे वेगवेगळी उपकरणे हाताळण्याच्या कौशल्यात वाढ, मोजमापात अचूकता येणे, निरीक्षणांची नोंद केल्यानंतर प्रत्येक

नोंदीची अचूकता किती, कशामुळे त्रुटी निर्माण होऊ शकतात, निश्चित काय मिळवावयाचे आहे याचे भान या सर्व बाबींत विद्यार्थ्यांचा आत्मविश्वास वाढतो. विद्यार्थ्याला जास्तीत जास्त काल प्रयोगशाळेतील सुविधा उपलब्ध करून देणे हे प्रयोगशाळाप्रमुखाचे कर्तव्य आहे.

प्रयोगशाळेत शांतता
स्वच्छता
उपकरणांची
व
संदर्भ ग्रंथांची
तसेच
प्रयोगशिक्षकाची
पूर्ण वेळ उपलब्धता
या किमान आवश्यक गोष्टी आहेत.

वेळप्रसंगी स्वच्छतेकरिता हातात झाडू घेण्याची विद्यार्थ्यांची तसेच प्राध्यापकाची तयारी असली पाहिजे.

या विज्ञानयुगात प्रयोगशाळा ही देवालये आहेत. वेगवेगळी उपकरणे, साधने हीच परमेश्वराची विविध रूपे आहेत. त्यांच्या साहाय्याने प्रयोग करणे हीच मंत्र-पुष्पांजली आहे.

'योगः कर्मसु कौशलम्।'
Work is Worship
'Start from where you are.
Do something;
Never be satisfied.'

ही ध्येयवाक्ये समोर आणावयास हरकत नाही.

(३) **पूरक साधने :**

अ) सध्या अनेक महाविद्यालयांत रेडिओग्राही, दूरचित्रवाणी संच, दूरदृश्यअभिलेखक, दोलनदर्शक (oscriloscope), टंकलेखनयंत्र, झेरॉक्स मशीन वगैरे अनेक साधने उपलब्ध असतात. या साधनांच्या आंतररचनेचे ज्ञान व त्यांची दुरुस्ती करू शकणारे तंत्रज्ञ सेवकवर्ग, प्राध्यापक, विद्यार्थी यांतूनच तयार झाले पाहिजेत व ही प्रक्रिया अखंड चालू राहिली पाहिजे. याकरिता स्वतंत्र कार्यशाळा हे प्रत्येक महाविद्यालयाचे अविभाज्य अंग असले पाहिजे.

आ) महाविद्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती, देखभाल, रंगरंगोटी, लाकडी फर्निचरला पॉलिश, रोजची झाडलोट, बागेची निगा, नळदुरुस्ती, स्वच्छतागृहांची स्वच्छता, कॅन्टीनचे संचालन, विद्यार्थी-भाण्डाराचे संचालन इत्यादी अनेक बाबींत प्राध्यापकांच्या सक्रिय मार्गदर्शनाखाली विद्यार्थ्यांच्या श्रमातून शिक्षण यातूनच उद्याचा समर्थ, जबाबदार, इतर समाजघटकांना आदर्श वाटावा असा सुबुद्ध नागरिक तयार होणार आहे. या प्रक्रियेतून विद्यार्थी गेल्यानंतर त्याला कोणतेही काम हलके वाटणार नाही.

इ) सहली, पर्वतारोहण, स्काउटिंग, पोहोणे, व्यायाम, स्पर्धा, इतर कोणत्या ना कोणत्यातरी खेळात प्रावीण्य यांकरिता विद्यार्थ्यांना सुविधा उपलब्ध करून देणे ही शासनाची व संस्थाचालकांची प्राथमिक जबाबदारी आहे.

वरील सर्व विवेचनानन्तर सद्य:स्थिती पाहिली तर मन भयाकुल, विषण्ण, निराश होते. पण येथे थांबून चालणार नाही. समाजातील सर्व घटकांनी ही परिस्थिती सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

विद्यार्थ्यांची अफाट संख्या, अपुऱ्या सुविधा, पोटार्थी, शिकविण्यात रस नसणारे व भरपूर पैशाच्या व आरामाच्या आशेने कुवत नसताना व विद्यार्थ्यांविषयी सुतराम आत्मीयता नसताना या क्षेत्रात घुसलेले व नोकरीच्या कालावधीत विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्यांचे व पर्यायाने त्यांच्या कुटुंबांचे कधीही भरून न येणारे नुकसान करणारे तथाकथित प्राध्यापक ही समाजपुरुषाला लागलेली कॅन्सर अगर महारोग यापेक्षाही भयानक अशी कीड आहे. याला शासन, शिक्षणसंस्थाचालक, विद्यापीठनिरीक्षक सर्वस्वी जबाबदार आहेत.

शिक्षक हा जन्मत:च शिक्षक असावा लागतो. विद्यार्थ्याला शिकविण्याची, त्याचे सर्वांगाने संवर्धन करण्याची त्याला आच असते. प्रसंगी पदरमोड करून, उपाशीपोटी राहूनही त्याच्या विद्यार्जनात व विद्यादानात खण्ड पडत नाही. असे शिक्षकच समाजाचे खरे आधारस्तंभ असतात. हे शिक्षक सर्वत्र सर्वदूर पसरलेले असतात. त्यांना हुडकून काढून, त्यांच्या प्रापंचिक गरजा भागतील एवढे मानधन त्यांना देऊन त्यांच्या ज्ञानाचा फायदा सर्व समाजाला होईल अशी व्यवस्था करणारे शिक्षणसंचालन ही काळाची गरज आहे.

रामायण, महाभारत हे तासभर दूरदर्शनवर पाहून विसरून जाण्याचे विषय नाहीत. त्यातील ज्ञानाचे जणू भाण्डार असे आचार्य, एकलव्यासारखे एकनिष्ठ शिष्य,

गुरुवर्यांपुढे नतमस्तक होणारे राजेमहाराजे यांतून आपल्याला खूपच शिकण्यासारखे आहे.

युरप, अमेरिका, इंग्लंड या देशांत विद्वानांची कदर केली जाते म्हणूनच त्या देशांच्या सर्वांगीण प्रगतीची घोडदौड अजूनही चालू आहे.

आइनस्टाइन, एन्रिको फर्मी, रॉबर्ट ओपेनहायमर, चार्ल्स स्टाइनमेट्झ वगैरे स्वतःच्या देशात थारा न मिळालेल्या प्राध्यापकांना अमेरिकेत आश्रय मिळाला व याच प्राध्यापकांच्या साहाय्याने अणुविघटनाची साखळीप्रक्रिया (फर्मी), नियंत्रित अणुभट्टी, अणु-बॉम्बची यशस्वी चाचणी (ओपेनहायमर), हजारो ॲम्पिअर विद्युत्प्रवाह ज्या तडिताघातामुळे निर्माण होतो अशी स्थिती प्रयोगशाळेत निर्माण करणारा स्टाइनमेट्झ, दक्षिण-अमेरिकेत अतिरिक्त कपाशीच्या लागवडीने नापीक झालेल्या जमिनीला भुईमुगाची लागवड करून संजीवनी देणारा व एकच सूट अठ्ठावीस वर्षे वापरणारा जॉर्ज वॉशिंग्टन कार्व्हर, 'The man who thought with his hands' असा हेन्री फोर्ड, 'Research is one percent inspiration and ninetynine percent perspiration' असे म्हणणारा टॉमस् आल्वा एडिसन, अशी किती उदाहरणे सांगावीत !

सर्व साधनांचा उपयोग करून आपली उन्नती साधणे व आपल्या विद्यार्थ्यांना ज्ञानसोपानाच्या पायऱ्या चढून जाण्याचे सामर्थ्य प्राप्त करून देणे हे कार्य जन्मभर निष्ठेने करेल तोच खरा प्राध्यापक.










अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# प्राध्यापक संघटनेची व्यावहारिकता, नैतिकता आणि अकादमिक धोरण

अ. श्री. भडकमकर

प्राध्यापक संघटनेचे आंदोलनात्मक मार्ग आणि संघटनेचे ध्येयधोरण तसेच संघटनेची प्रत्यक्ष कार्यपद्धती यांवर खुली चर्चा करण्यासाठी संघटनेची नेहमीच तयारी असते.

मी या लेखाप्रारंभीच एक गोष्ट स्पष्ट करतो की माझे या लेखातील विचार हे महाराष्ट्र राज्यातील मध्यवर्ती संघटनेच्या अगदी प्रारंभापासून कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांचे विचार आहेत. पण हे राज्यसंघटनेचे किंवा **शिवाजी विद्यापीठ महाविद्यालयांतील शिक्षक संघाचे अधिकृत निवेदन नव्हे. या लेखातील ज्या त्रुटी असतील त्यांची वैयक्तिक जबाबदारी माझी आहे.**

उच्च शिक्षणाच्या विविध घटकांशी संबंधित अशा विविध प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी आणि शिक्षणाचे जे महत्त्वाचे घटक शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या न्याय्य हक्कांच्या पूर्ततेसाठी प्राध्यापक संघटना नेहमीच बांधील राहिलेली आहे.

शिक्षणामध्ये विद्यार्थी आणि शिक्षक हे दोन केंद्रबिंदू महत्त्वाचे मानले तर या दोन्ही घटकांच्या हितासाठी शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि बौद्धिक विकासासाठी संघटन हेच संघटनेच्या वाटचालीचे सूत्र राहिले आहे.

अखिल भारतीय विद्यापीठ व महाविद्यालयीन शिक्षक संघाने तसेच या संघटनेच्या राज्यसंघटनांनी उच्च शिक्षणाचा विकास हे उद्दिष्ट तर महत्त्वाचे मानले आहेच पण बौद्धिक किंवा 'लिबरल' शिक्षण आणि त्याच्याशी संबंधित असे तांत्रिक, व्यावसायिक, अभियांत्रिकी, वैद्यकीय व औषधी, विधी, शेती, शिक्षण, प्रशिक्षण अशा सर्व क्षेत्रांत काम करणाऱ्या अध्यापक-प्राध्यापकांच्या विविध शैक्षणिक व व्यावसायिक प्रश्नांत रस घेऊन हे प्रश्न उकलण्यासाठी जरूर तो पुढाकार घेतला आहे, सहकार्य दिले आहे.

एवढेच नव्हे तर सध्या या संघटनांचे कार्यक्षेत्र, त्यांची सेवाशाश्वती, वेतनवाढ, नव्या वेतनश्रेणींची कार्यवाही एवढ्यापुरतेच मर्यादित वाटत आणि दिसत असले तरी संघटनेचे अंतिम उद्दिष्ट अत्यंत व्यापक आणि शिक्षणप्रक्रियेच्या सर्व बाबींशी सुसंगत आणि संबंधित असेच आहेत.

प्राथमिक शिक्षण क्षेत्रात कार्य करणाऱ्या अध्यापकांपासून ते संशोधन पातळीवर काम करणाऱ्या उच्च शिक्षण क्षेत्रातील प्राध्यापकांपर्यंत सर्वांचे सुसूत्रीकरण, संघटन व्हावे, शिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या सर्व संबंधित विद्याशाखांच्या अध्यापकांचा तसेच विविध स्तरांवर काम करणाऱ्या शिक्षक संघटनांचा महासंघ व्हावा हेच प्राध्यापक संघटनेच्या महासंघाचे अंतिम व्यापक उद्दिष्ट आहे. महाविद्यालयीन किंवा विद्यापीठ स्तरांवरील अध्यापकांच्या संघटना व्यावसायिक आहेत, जरूर, पण त्यांचा दृष्टिकोण केवळ 'भाकरी' आणि 'भाकरीसाठी' चाकरी एवढाच मर्यादित नाही.

आजकाल दोन मुद्द्यांची फार चर्विष्ट चर्चा केली जाते.

१) शिक्षकाला नोकरीची हमी मिळाल्यामुळे तो आळशी झाला आहे, आत्मतुष्ट झाला आहे. यामुळे तो अकार्यक्षमतेकडे वळत आहे.

२) शिक्षकाने फक्त शिक्षणाचे काम करावे. व्यवस्थापक प्रक्रियेत त्याला सहभाग हवाच कशाला ?

या दोन्ही प्रश्नांच्या उत्तरात प्राध्यापक संघटनेची तात्त्विक आणि व्यावहारिक बैठक उलगडली जाईल.

कारण शिक्षकांना सेवाशाश्वतीची आणि वेतनाची हमी मिळाली नाही तरच म्हणजे ही पराणी टोचूनच त्यांच्याकडून काम करून घ्यावे हा दृष्टिकोण आणि शिक्षणप्रक्रियेत शिक्षकाने शिकवावे म्हणजे नेमके काय करावे यासंबंधीची अपुरी समजूत यांमध्ये वरील दोन आरोपांच्या निर्मितीचे बीज आहे. शिक्षकाच्याच नव्हे तर लोकशाही समाजरचनेतील कोणत्याही घटकाच्या आणि कर्मचाऱ्यांच्या कामाच्या अपेक्षेसंबंधीचे हे मर्यादित दृष्टिकोण आहेत.








भारताचे पहिले पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांनी भाक्रा-नानगल धरणाच्या ( पंजाब) निर्मितीच्या वेळी तिथे काम करीत असलेल्या कर्मचाऱ्यांना उद्देशून केलेल्या भाषणात अशा आरोपांना स्पष्ट उत्तर ( अध्याहृत ) दिले गेले आहे. पं. नेहरू म्हणाले होते,

" आपण या धरणयोजनेवर काम करीत आहोत म्हणजे केवळ भाकरी मिळविण्यासाठी काम करीत नाही तर भारताच्या भाग्याचे आलेख रेखाटण्याचे काम करीत आहोत, या धरणाच्या निर्मितीने हजारोंना रोजगार मिळेल, हजारोंच्या जीवनात संजीवनी निर्माण होईल आणि पर्यायाने भारत मोठा होईल. "

पं. नेहरूंनी केलेल्या भाष्याची जाणीव सुदैवाने अध्यापक-संघटनेची स्थापना करणाऱ्या नेत्यांना आहे. शिक्षण क्षेत्रात शिक्षकाने नेमके काय व कशासाठी करावयाचे याचे सूत्र त्यांना ज्ञात आहे. सतत भेदरलेला, असुरक्षित, पूर्ण काम करूनही वेतनाची खात्री नसणारा, लाचार शिक्षक, कोणाच्या तरी धाकाखाली काम करणारा शिक्षक हा खरोखरीच ' शिक्षणाचे कार्य सुरळीतपणे आणि यशस्वीपणे करू शकेल काय ? ' शिक्षकाचे आणि विद्यार्थ्यांचे प्रश्न हे अंतिम शिक्षणाचेच आहेत. शैक्षणिक प्रक्रियेशीच संबंधित आहेत. म्हणून शिक्षक हा पुरेसा सुरक्षित आणि निर्भय असलाच पाहिजे. याबाबत खुद्द केंद्र शासनाने जाहीर केलेल्या नव्या राष्ट्रिय शैक्षणिक धोरणात शिक्षक आणि त्यांच्या शिक्षक संघटना यांविषयी काय अपेक्षा केल्या आहेत यांचा विचार करू.

शैक्षणिक धोरण १९८६– यामध्ये पुढील अपेक्षा व्यक्त केल्या आहेत.

* शिक्षकांच्या राहणीमानात आणि काम/सेवाशर्तींमध्ये सुधारणा.
* गाऱ्हाणी नाहीशी करण्यासाठी परिणामकारक यंत्रणेची निर्मिती.
* शिक्षणाच्या नियोजन व व्यवस्थापनामध्ये शिक्षकांचा सहभाग.

(रा. शै. धो., पृ. ४३५)

हे धोरण पुढे म्हणते,

" शिक्षकांचे व्यावसायिक आचरण योग्य तऱ्हेचे असावे, तसेच शिक्षकांची प्रतिष्ठा व हक्क यांचे संरक्षण व्हावे म्हणून बळकट एकसंध व जबाबदार शिक्षक संघटनांची आवश्यकता आहे. अशा संघटनांची वाढ होण्यास प्रोत्साहन देणे इष्ट ठरेल. शिक्षकांमध्ये आपली व्यावसायिक वाढ व विकास करण्याची जाणीव निर्माण करण्याचे काम करण्यासाठी व्यावसायिक शिक्षक संघटनांना उत्तेजन देण्यात येईल. या सर्व संघटनांचे काम लोकशाही पद्धतीनेच चालेल यावर भर दिला पाहिजे." (रा. शै. धोरण, १९८६, पृ. ४४१)

शिक्षक संघटनेकडून शासन आणि समाज यांची असलेली वरील अपेक्षा महाविद्यालयीन शिक्षक संघटनेला तत्त्वत: मान्य आहे. एवढेच नव्हे तर शैक्षणिक क्षेत्रातील स्वायत्तता आणि भारतीय राज्यघटनेत सर्व सार्वभौम प्रजासत्ताक राज्यांसाठी ठेवलेली व्यापक उद्दिष्टे आणि त्यांची प्रत्यक्ष कार्यवाही यासंबंधीची संघटनेची धोरणेही स्पष्ट आणि सुसंगत आहेत. लोकशाही समाजरचना, शोषणविरहित समाजनिर्मिती, धर्मनिरपेक्ष विज्ञाननिष्ठ राष्ट्रवादी दृष्टिकोण, राष्ट्रिय एकात्मता इत्यादी उद्दिष्टांसाठी लोकशाहीने मान्य केलेल्या मार्गांचा अवलंब करूनच आपले कार्य करणे हे महाविद्यालयीन शिक्षक संघटनांनी आपले व्यापक उद्दिष्ट मानले आहे– "शैक्षणिक उपक्रम कार्यान्वित करण्याचे आणि शिक्षण सुसंघटित करण्याचे शिक्षक हे प्रमुख साधन आहे. शिक्षकांसंबंधी ज्या वेळी आम्ही बोलतो त्या वेळी त्यात शैक्षणिक संस्थांचे प्रमुख, चाकोरीबद्ध शिक्षणसंस्थांमधील पूर्णवेळ काम करणारे शिक्षक, चाकोरीबाहेरील, व प्रौढ शिक्षण केंद्रांचे निर्देशक, दूरशिक्षणाच्या विविध तंत्रांमध्ये मार्गदर्शन करण्यात गुंतलेले शिक्षक आणि काही विशिष्ट काळासाठी, विशिष्ट भूमिका पार पाडण्यासाठी नियुक्त केलेले अंशकालिक व स्वयंसेवी ( व्हालेंटरी ) शिक्षक यांचा समावेश होतो. शैक्षणिक संस्थांत पूर्णवेळ काम करणाऱ्या शिक्षकांच्या बाबतीत त्यांची महत्त्वाची भूमिका आपल्या विद्यार्थ्यांना केवळ वर्गाध्यापन व ट्युटोरियलद्वाराच शिकविणे ही नसून प्रत्यक्ष सहवासातूनच व त्यांचे चारित्र्य घडविण्यास जे विविध मार्ग अवलंबिले जातात त्यांच्याद्वारे शिकविणे व मार्गदर्शन करणे हीच राहील.

सर्वच स्तरांवरील शिक्षकांकडून त्यांनी संशोधन कार्य, निरनिराळे प्रयोग आणि नावीन्यपूर्ण उपक्रम अंगीकारावेत अथवा त्यांना उत्तेजन द्यावे अशी अपेक्षा करण्यात येते. विस्तारसेवा व समाजसेवा यांत शिक्षकांना महत्त्वाची भूमिका आहे. शैक्षणिक संस्था आपले

कार्यक्रम पार पाडण्यासाठी ज्या विविध प्रकारची सेवा व उपक्रम करतात, त्यांच्या व्यवस्थापनातही त्यांना (शिक्षकांना) सहभागी व्हावे लागते. ... इ."

(राष्ट्रिय शैक्षणिक धोरण, पृ. ४३६)

रा. शै. धोरणात व्यक्त केलेल्या अपेक्षांशी आणि शैक्षणिक ध्येयधोरणांशी प्राध्यापक **संघटना, तात्त्विक दृष्टया संमत** आहेत. फक्त **गुणवत्तेच्या** नावाखाली शिक्षणाचा '**संकोच**' होऊ नये आणि सेवाभावाचे निमित्त करून शिक्षकांवर विविध 'अशैक्षणिक' बाबींची सक्ती होता कामा नये एवढीच या शैक्षणिक संघटनांची शासन व संबंधित शिक्षण संस्थांकडून माफक अपेक्षा आहे. आता आपण **संघटनेच्या व्यावहारिक** बाजूकडे वळू.

महाराष्ट्र राज्यातील प्राध्यापक संघटनांच्या निर्मितीची पार्श्वभूमी व या संघटनांची उद्दिष्टे :– महाराष्ट्रात राज्यस्तरावरील प्राध्यापक महासंघाची स्थापना सन १९७५ मध्ये झाली (प्रा. डॉ. एल. बी. केणी, मुंबई, सुप्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ आणि सामाजिक कार्यकर्ते हे या संघटनेचे पहिले अध्यक्ष आणि प्रा. किशोर टेकेडत हे पहिले कार्यवाह). महाराष्ट्र राज्यातील सर्व विद्यापीठांतील प्राध्यापक संघटनांचा यात समावेश आहे. ही संघटना अखिल भारतीय विद्यापीठ व महाविद्यालयीन शिक्षक (राज्य) महासंघाची सदस्य आहे.

एम्फक्टो ही महाराष्ट्र राज्य शासनाने मान्यता दिलेली एकच अधिकृत संघटना आहे. या संघटनेचे पदाधिकारी हे पूर्णवेळ शिक्षक आहेत. कोणत्याही राजकीय पक्षाशी ही संघटना प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे संलग्न नाही. प्राध्यापकांनी मान्यता दिलेली, प्राध्यापकांनी चालविलेली पण प्रत्यक्ष **व्यवहारात** महाविद्यालयीन शिक्षकांचेच नव्हे तर शिक्षणातील सर्व घटकांचे प्रश्न घेऊन निर्भयपणे लढणारी ही संघटना आहे. २६ जून १९७७ साली संपूर्ण भारतात आणीबाणी पुकारण्यात आली होती. त्या वेळीसुद्धा ही संघटना उघडपणे प्राध्यापकांच्या हक्कांसाठी झगडत होती.

शासनाने १९७५ मध्ये नव्या वेतश्रेणीच्या संदर्भात (७००–१६००) जी. आर. काढला. आणीबाणीचा फटका प्राध्यापकांनाही बसला. यु. जी. सी. (विद्यापीठ अनुदान मंडळाच्या) मूळ धोरणाविरुद्ध अनेक कलमे त्यात घातली होती.

मुंबईच्या प्राध्यापकांच्या सभेत आणीबाणीच्या काळातही डॉ. केणी, टेकेदत्त यांनी या जी. आर. विरुद्ध भाषा पुकारली आणि त्याबद्दल १ नोव्हेंबर १९७५ पासून १७ महिने तुरुंगवास भोगला.

१९७५ मध्ये काढलेल्या शासकीय परिपत्रकामध्ये कार्यभार, सुटयांचे दिवस, प्राध्यापकांची शैक्षणिक अर्हता, परीक्षेचे मानधन, संघटनास्वातंत्र्य, इतर उपक्रम करण्याचे स्वातंत्र्य इ. बाबतींत अनेक अन्याय्य कलमे होती. या परिपत्रकाविरुद्ध मुंबई उच्च न्यायालयात 'रिट' अर्ज करून मनाई आणण्यात आली. याच काळात महाराष्ट्रातील सर्व बिगरशेती विद्यापीठांच्या कुलगुरूंचे एक मंडळ (जेवीव्हीसी) कार्यप्रवण झाले. या मंडळामार्फत सर्व विद्यापीठांची धोरणे, कारभार, एकसूत्रीकरणाचा प्रयत्न करण्यात आला. (तत्वतः यात काही चूक नाही पण कायदेशीर दृष्टया या मंडळाला काहीही अधिकार नाही. राज्याचे राज्यपाल म्हणजे राज्यातील सर्व विद्यापीठांचे कुलपती या मंडळाचे अध्यक्ष असतात.)

१९७५ मध्ये आणीबाणीच्या परिस्थितीचा फायदा घेऊन या मंडळाने प्राध्यापकांकरिता एक नमुन्याचे सेवानियम तयार केले. त्यांत प्राध्यापकांच्या शैक्षणिक आणि इतर स्वायत्ततेवर घाला होता. 'गुलामगिरीचा जाहीरनामा' म्हणून वर्तमानपत्रांतून टीकेची झोड उठली. प्राध्यापक महासंघाने स्पष्ट भूमिका घेतली. राज्यातील इतर सेवक संघटनांच्या तुलनेने त्या काळात प्राध्यापकांचीच संघटना अधिक क्रियाशील होती. आणीबाणीचा या संघटनेने स्पष्ट शब्दांत ठराव करून निषेध केलेला होता.

संघटनेच्या स्थापनेपासून संघटनेची तात्त्विक आणि व्यावहारिक भूमिका अतिशय स्पष्ट आहे.

## संघटनेच्या मागण्यांचे स्वरूप

प्राध्यापकांची संघटना ही इतर संघटनांप्रमाणेच व्यावसायिक संघटना असल्याने इतरांप्रमाणेच सेवाशाश्वती व नियमित पगार या उद्दिष्टांसाठी, किंवा सेवक म्हणून शिक्षक-प्राध्यापकांना त्यांच्याकडून अपेक्षित असलेले कार्य सुरळीतपणे बजावता यावे म्हणून आवश्यक असणाऱ्या **किमान** सुविधा मिळविण्यासाठी ही संघटना प्रयत्न करीत राहणार हे उघडच आहे. परंतु प्राध्यापकांच्या संघटनेने आपल्या मागण्यांचे स्वरूप एवढेच मर्यादित ठेवलेले नाही. आपली संघटना **शिक्षकांचीच आहे** याचे भान तिने सतत राखले आहे.

केंद्रशासन आणि राज्यशासन यांनी वेळोवेळी निरनिराळे आयोग व समिती नेमून जे निर्णय घेतले,




त्यांतील जे निर्णय शिक्षक व शिक्षण, तसेच शिक्षणातील इतर घटक (उदा., विद्यार्थी, पालक, संस्थाप्रमुख, शिक्षणसंस्था) यांच्या हिताचे होते, त्यांचे वेळोवेळी स्वागतच केले आहे इतकेच नव्हे तर त्यांच्या कार्यवाहीसाठी रास्त आग्रह धरला आहे. महाराष्ट्रापुरते बोलायचे झाले तर, महाविद्यालयीन शिक्षणाचा प्रसार सुरू झाल्यावर अनेक शिक्षणसंस्था सुरू झाल्या. तालुकास्तरांवर व छोट्या गावांतही महाविद्यालये सुरू झाली. अशा वेळी तेथे नेमलेल्या प्राध्यापकांनी, प्रारंभी अनेक गैरसोई सहन करून, अपुरे वेतन घेऊन प्रसंगी मानहानी सहन करून मोठ्या निष्ठेने काम केले व त्या संस्था नावारूपाला आणण्यास संस्थाचालक व संस्थाप्रमुख यांना संपूर्ण सहकार्य दिले.

तत्कालीन शिक्षणसंस्था, संस्थाचालक आणि त्यांचे शैक्षणिक कार्य कोणत्या प्रतिकूल परिस्थितीतून चालले आहे याचीही जाणीव प्राध्यापकांना होती. पण हळूहळू खासगी शिक्षणसंस्थांच्या संचालनपद्धतीत अनेक अपप्रवृत्ती निर्माण झाल्या, शिक्षणाचे व्यापारीकरण होऊ लागले, संस्थाचालक आणि राज्यशासन या दोघांचेही शिक्षक आणि शिक्षणप्रक्रियेची यशस्विता यांकडेच दुर्लक्ष होऊ लागले. म्हणूनच अध्यापकांना संघटित होणे भाग पडले.

फुले, आगरकर, राजर्षी शाहू, कर्मवीर भाऊराव पाटील इतकेच नव्हे तर चिपळूणकर, टिळक यांचा वारसा सांगणाऱ्या शिक्षणसंस्थांतही गटबाजी, राजकारण इ. अशैक्षणिक अपप्रवृत्ती शिरल्याने शिक्षणप्रक्रिया आणि शिक्षक यांची किमान 'सु' रक्षितता धोक्यात आली म्हणूनच 'शिक्षणप्रक्रिया' सुरळीत चालावी म्हणून आपल्या न्याय्य हक्कांसाठी शिक्षकांना संघटित होऊन हळूहळू अर्ज, विनंती, मोर्चा, सामुदायिक रजा, खडू-फळा-बंद आंदोलन, लाक्षणिक संप, उपोषण, धरणे, घेराव आणि प्रसंगी बेमुदत संप अशांसारखे मार्ग स्वीकारून रस्त्यावर यावे लागले.

नैतिकतेच्या दृष्टीने पाहिले तर शिक्षणाचे उद्दिष्ट आणि पावित्र्य यांच्या रक्षणासाठीच शिक्षकांनी हे लढे दिलेले आहेत हे दिसून येते.

प्राध्यापक संघटनेने पहिल्या परीक्षा बहिष्कार व खडू-फळा आंदोलनापासून (सन १९७४-७५ व सन १९७८-७९) ते ४ ऑगस्ट १९८७ व १२ डिसेंबर १९८८ (अनुक्रमे ५२ दिवसांचा व ३७ दिवसांचा असे दोन दीर्घकालीन संप) अशा ज्या आंदोलनात्मक कृती केल्या, त्यांची आवश्यकता, औचित्य व या कृती नेमक्या कोणत्या कारणांसाठी व कोणत्या परिस्थितीत केल्या यासंबंधी प्राध्यापकांनी आणि त्यांच्या संघटनांनी वेळोवेळी जाहीर निवेदने केली आहेत. वृत्तपत्रांमार्फत एवढेच नव्हे तर टी. व्ही., नभोवाणी या शासनाच्या प्रसारमाध्यमांतून वेळोवेळी आपली बाजू मांडली आहे, भूमिका स्पष्ट केली आहे. खेदाची गोष्ट ही, की शिक्षणाशी संबंधित अशा सर्व घटकांनी आपले पूर्वग्रह बाजूस ठेवून वस्तुस्थिती समजून घेण्याचा पुरेसा प्रयत्न केलेला नाही.... काही ढोबळ व पूर्वापार चालत आलेल्या समजुतींच्या आहारी गेल्यामुळे **सर्वसाधारणपणे** अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत शिक्षणाचे कार्य निष्ठेने पार पाडण्याचे काम करणाऱ्या शिक्षकांच्या गाऱ्हाण्यांकडे या घटकांचे दुर्लक्षच झाले आहे.

शिक्षकानी संप करू नये असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा नेहमीच्या परिस्थितीत, शिक्षण आणि शिक्षक यासंबंधी आपण आपले कर्तव्य पार पाडतो का? याचे भान ठेवले जात नाही. दुसरे म्हणजे **आजच्या शिक्षकाकडून ज्या अपेक्षा केल्या जातात तो शिक्षक समाजातील इतर घटकांप्रमाणेच आधुनिक जगात, आधुनिक परिस्थितीमध्ये काम करीत असतो याचीही जाणीव ठेवली जात नाही.**

ज्या वेळी महाराष्ट्रातील असंख्य शिक्षकांना किमान सेवाशाश्वती नव्हती, अपुरे वेतन होते, त्यांपैकी अनेकांना नोकरीसाठी दरवर्षी, ३१ मार्चला 'नोटीस' मिळाल्यानंतर वणवण हिंडावे लागत होते; त्या वेळी समाजातील कोणतेही घटक पुढे आले नाहीत. इतर व्यावसायिकांप्रमाणे शिक्षकांनाच पुढे येऊन त्यांची संघटना बांधावी लागली व त्यांच्या न्याय्य हक्कांसाठी लढावे लागले. यात तसे पाहिले तर काहीच अस्वाभाविक नाही. पण इतरांपेक्षा 'शिक्षकांना' वेगळे काढून केवळ शिक्षणाच्याच नव्हे तर साऱ्याच सामाजिक परिस्थितीतील बिघाडाचे आणि भ्रष्टाचाराचे ओझे एकट्या शिक्षकावर लादणे हे मात्र अस्वाभाविक आहे, अयोग्य आहे. **तसे पाहिले तर शिक्षकांचे प्रश्न हे एका व्यापक अर्थाने शिक्षणप्रक्रियेचे प्रश्न आहेत– म्हणजे खऱ्या अर्थाने ते समाजाचेच प्रश्न आहेत.** त्यामुळे मला असे प्रांजळपणे वाटते की शिक्षकांची आंदोलने किंवा बेमुदत संपासारख्या बाह्यतः **अतिरेकी वाटणाऱ्या कृती या शिक्षणप्रक्रियेच्या स्वरूपाबद्दल, महत्त्वाबद्दल उदासीन आणि बेफिकीर राहणाऱ्या सुशिक्षित मध्यमवर्गीय** समाजाला त्यांच्या

**निष्क्रियतेचे मिळणारे हे एक फळच आहे.** माझ्या दृष्टीने सर्व बाजूने, अगदी अकादमिक बाजूने पाहिले तरी ही आंदोलने पूर्णतः समर्थनीय आहेत; कारण आपल्या समाजाला शिक्षणाचा प्रसार थांबविता येणार नाही तसेच गुणवत्तेकडेकडेही दुर्लक्ष करता येणार नाही. या सर्व संदर्भात जर प्राध्यापकांनी संप करू नये असे शासनाला आणि शिक्षणाच्या सर्व संबंधित घटकांना वाटत असेल, तर समाजातील अशासकीय संस्था व इतर जबाबदार घटकांनी एकत्र येऊन एक अशी यंत्रणा निर्माण करावी, की केवळ प्राध्यापकांचाच नव्हे तर इतर कोणत्याही व्यावसायिक संघटनांचा जर संप जाहीर झाला तर या लवादयंत्रणेने मध्यस्थी करून शासन आणि संबंधित व्यावसायिक संघटना यांच्या बाजू समजावून घेऊन जर संघटनेची बाजू न्याय्य असेल आणि संप अपरिहार्य असेल तर शासनावर दडपण आणून संबंधितांच्या मागण्या मान्य करणे शासनाला भाग पाडावे. किंवा उलट परिस्थिती असेल तर संप-सूचना मागे घेण्यास संबंधित व्यावसायिक संघटनेस सांगावे. समाजातील विचारवंत व सल्लागार **शासन किंवा सत्तारूढ आणि अन्याय झालेले किंवा शासनाच्या निर्णयाचे जे 'शिकार' झालेले असतात ते शासन आणि कर्मचारी यांच्या संघर्षात** एक तर तटस्थ राहतात अन्यथा **सरकारी बाजू** अधिकृत मानून स्वस्थ राहतात. अगदी शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या, ज्या निःस्पृह आणि प्रामाणिक व्यक्तींना शिक्षण क्षेत्रात संप नको असे प्रामाणिकपणे वाटत असते अशा व्यक्ती आणि प्रवृत्तीही एक तर प्रत्यक्ष कृती घडेपर्यंत तटस्थ किंवा निष्क्रिय असतात अन्यथा प्रत्यक्षाप्रत्यक्ष शासनाच्या चालणाऱ्या एकतर्फी प्रचाराला आणि भूमिकेलाच अधिकृत ठरवून मोकळे होतात.

**ज्यांना शैक्षणिक क्षेत्रात अशांतता नको अशांनी शासन, शिक्षणसंस्थाचालक, शिक्षक, पालक यांना एकत्रित आणणारी यंत्रणा उभारलेली नाही.**

संस्थेत प्रत्यक्ष एखाद्या व्यक्तीवर अन्याय होत असताना बघ्याची भूमिका घेणे 'गांधारी'सारखी दुर्लक्षाची पट्टी डोळ्यांवर बांधणे किंवा संबंधित व्यक्तीलाच 'हे असेच चालावयाचे असे' म्हणून सबूरीने घेण्याचा सल्ला देणे असे वारंवार घडत असते. त्यामुळे कोठेतरी खदखदलेला असंतोष स्फोटरूपाने व्यक्त होणे अपरिहार्य होते. उदा., नुकत्याच घडलेल्या दोन प्रदीर्घ संपांच्या फलश्रुतीचे वस्तुनिष्ठ मूल्यमापन केले तर काय दिसून येते ? एवढा लढा देऊनही कोंडी फुटलेली नाही.

**कधीही नव्हे एवढा अभूतपूर्व, देशातील सर्व राज्यांतील महाविद्यालयीन शिक्षकांचा संप घडल्यावरही प्रत्यक्ष परिस्थितीत फारसा समाधानकारक बदल घडला नाही.**

पहिल्या संपात महत्त्वाचे असे मुद्दे होते– १) केंद्रशासन व विद्यापीठ अनुदान मंडळाने जाहीर केलेल्या वेतनश्रेणीतील भेदाभेद नष्ट करून सुधारित वेतनश्रेणींची संख्या तीनच ठरवा. महाविद्यालयीन स्तरावर अधिव्याख्यात्यासाठी एकच सलग वेतनश्रेणी असावी. रिडर (प्रपाठक) व प्रोफेसर (प्राध्यापक) या जागा पदव्युत्तर शिक्षण केंद्रे शक्य असलेल्या व प्रत्यक्षात असलेल्या पदव्युत्तर शिक्षण केंद्र असणाऱ्या महाविद्यालयातील अध्यापकांना मिळाव्यात. प्राध्यापकांचा गुणवत्तावाढीस विरोध नाही परंतु उजळणी अभ्यासवर्ग सक्तीचे करण्यापूर्वी पुरेशा सुविधा उपलब्ध कराव्यात. प्राध्यापकांत भेदाभेद करून त्यांच्यात संभ्रम आणि असंतोष निर्माण करू नये. शिक्षणाच्या गुणवत्तावाढीसाठी पुरेशा आर्थिक आणि शैक्षणिक सोईसवलती उपलब्ध कराव्यात.

५ सप्टें. १९८७ रोजी शिक्षकांची अधिकृत मध्यवर्ती संघटना आणि केंद्रशासन यांत जो समझोता झाला तो पुरेसा समाधानकारक नसूनही, **शिक्षण, विद्यार्थी** आणि पालक यांच्या अडचणी आणि त्यांची वाढती अस्वस्थता लक्षात घेऊनच संघटनेने व्यवहार्य मार्ग काढला.

एवढे रामायण घडूनही संबंधितांनी कोणताच बोध घेतला नाही. वेतनवाढ आणि कार्यभारवाढ यांचा अकारण संबंध जोडण्यात आला.

वास्तविक ज्या नव्या वेतनश्रेणी जाहीर झाल्या आहेत, त्या (१) अधिव्याख्याता २२००–४००० (२) आठ वर्षांच्या अनुभवानंतर ३०००–५००० (३) आणि आणखी आठ वर्षांच्या अनुभवानंतर ३७००–५७०० म्हणजे खरे तर ही २२००–५७०० अशी सलग वेतनश्रेणी जाहीर करण्यात हरकत नव्हती. त्यासंबंधी शासनाने आणि विद्यापीठ अनुदान मंडळाने ज्या अटी जाहीर केल्या आहेत त्याही स्थूलमानाने प्राध्यापक संघटनेने मान्य केल्या आहेत.

तरीही महाराष्ट्र राज्यात मान्य झालेल्या बाबींच्या पूर्ततेसाठी १२ डिसेंबर १९८८ पासून दुसरा बेमुदत संप करावा लागला.

हा संप मुख्यतः दोनच कारणांसाठी होता–

(१) कार्यभार न वाढविता व इतर कोणतीही प्रतिकूल अट न घालता केंद्र सरकारची सुधारित वेतन-श्रेणी १ जाने. १९८६ पासून द्यावी व तिची कार्यवाही तावडतोब अमलात आणावी.

(२) महाविद्यालयाच्या वर्गातील किंवा तुकडी-तील कमाल संख्या ६० इतकी असावी.

यावर भाष्य करताना– 'विद्यापीठीय व महा-विद्यालयीन शिक्षकांचा संप– शासनाची भूमिका' या अधिकृत परिपत्रकात महाराष्ट्र राज्यशासन म्हणते,

"जर विद्यापीठ अनुदान आयोगाचा कार्यभार शिक्षकांनी स्वीकारला तरच सुधारित वेतनश्रेणीबाबत निर्णय घेता येईल अशी शासनाची भूमिका आहे, असे जे चित्र उभे राहात आहे ते संपूर्ण सत्य नाही. गेल्या काही वर्षांत संघटित प्रयत्नांच्या जोरावर शिक्षक संघटनांनी जे जे फायदे पदरात पाडून घेतलेले आहेत त्या प्रमाणात उच्च शिक्षणाचा दर्जा सुधारत नाही, असे पालकांचे अभिप्राय आहेत."

असे म्हणून पुढे दहा पृष्ठांत वस्तुस्थिती म्हणून जी मल्लिनाथी केली आहे ती म्हणजे बौद्धिक 'बनवा-बनवी'चा उत्तम नमुना आहे. आणि परिपत्रकाचा शेवट– "आज जे कार्यभारवाढीला विरोध करीत आहेत ते उद्या गुणवत्ता-वाढीच्या इतर योजनांनाही विरोध करणार नाहीत याची काय शाश्वती ?" असा केला आहे. त्या निवेदनात अनेक गोष्टी अर्धसत्याच्या स्वरूपात मांडल्या आहेत. तर केंद्रशासन आणि राज्य-शासन यांनीच सुचविलेल्या अध्यापककल्याण आणि शैक्षणिक विकासवाढीच्या **उपाययोजना** अपुऱ्या आर्थिक बळाची कारणे देऊन आपण बासनात गुंडाळून ठेवल्या आहेत ही वस्तुस्थिती दडवून ठेवली आहे.

नव्या वेतनश्रेणींचा संबंध हा महागाईशी आहे आणि प्राध्यापक हा समाजातील इतर घटकांप्रमाणेच प्रतिष्ठित घटक आणि वर्ग आहे असे एकीकडे स्वतःच जाहीर करावयाचे आणि स्वतःच **आर्थिक** कारणे दाखवून स्वतःची जबाबदारी टाळायची असा हा प्रकार आहे.

'उच्च शिक्षण ही आमची जबाबदारी नाही' असे राज्यशासन म्हणते आणि विद्यापीठ व शैक्षणिक संस्था यांचे शैक्षणिक स्वातंत्र्य व इतर घटनेने दिलेले हक्क यांवर बंधने आणते.

**महाराष्ट्रातील विद्यापीठे आणि शैक्षणिक संस्था यांनी आपले स्वातंत्र्य त्यांच्याच गैरकारभारामुळे आणि आर्थिक भ्रष्टाचारामुळे गमावलेले आहे. सर्वच शिक्षणसंस्था** यात सामील आहेत असे मला म्हणा-वयाचे नाही हे येथे स्पष्ट व्हावे. **यात प्राध्यापकांना ओढणे चुकीचे** आहे. एका बाजूने प्राध्यापक संघटना केवळ आपलेच प्रश्न नव्हे तर संपूर्ण शिक्षणाच्याच अस्तित्वासाठी झगडा देत आहे तर दुसऱ्या बाजूला विद्यापीठयंत्रणा, संस्थाचालक आणि प्राचार्यमंडळी शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या प्रश्नांवर तटस्थ आणि बघ्याची भूमिका घेत आहेत असे हे विसंगत आणि विचित्र चित्र आहे. कार्यभारवाढ, शिक्षकांची गुणवत्ता, त्यांचा आर्थिक लाभ इ. विषयांवर अनेक ठिकाणी सुदीर्घ चर्चा झाल्या आहेत. परस्परविरोधी दृष्टिकोण प्रकट झालेले आहेत. त्यांचा परामर्श या एका लेखात घेता येणे शक्य नाही. महाविद्यालयीन शिक्षकांची देशात आणि महाराष्ट्र राज्यात जी विविध स्तरांवर आंदो-लने झाली ती फक्त वेतनवाढी आणि सेवाशर्ती या संदर्भातच झाली असे जे भासवले जात आहे ते रास्त नाही व वस्तुस्थितीला धरूनही नाही. शिक्षकांच्या मागण्या– शासनाची आश्वासने– प्रत्यक्ष मागण्यांच्या पूर्ततेसाठी धरावा लागणारा आग्रह– कार्यवाहीच्या पातळीवर होत असणारा विलंब आणि फुटणारे फाटे यांमुळे एक दुष्टचक्र निर्माण झाले आहे.

१७ जाने. १९८८ पासून संघटना आणि राज्य-शासन यांच्यात झालेल्या कराराची प्रत्यक्ष पूर्तता अजूनही झालेली नाही यामुळे अजूनही गोंधळाचीच परिस्थिती आहे.

या सर्व विवेचनाच्या पार्श्वभूमीवर हे स्पष्ट होईल की राज्यशासन फक्त **आर्थिक** कारणांचा बाऊ करणार, शासकीय यंत्रणा आणि संबंधित अधिकारी परि-पत्रकांचा स्वतःला सोईस्कर असा अर्थ लावणार, विद्या-पीठयंत्रणा, संस्थाचालक, प्राचार्य, पालक, संबंधित घटक एक तर बघ्याची भूमिका घेणार किंवा 'परोप-देशे पांडित्य' करणार ही सर्व परिस्थिती जोपर्यंत बदलणार नाही तोपर्यंत **प्राध्यापकांची आंदोलने– अगदी** बेमुदत संपसुद्धा– **अटळ आहेत**. एरवी रा. शै. धो. १९८६ मधील शिफारशी प्राध्यापक संघटनांना तत्वतः मान्य आहेतच.



# महाविद्यालयीन शिक्षण : अभ्यासक्रम, अध्यापन आणि परीक्षा

यशवंत कळमकर

महाविद्यालयीन शिक्षणाची गुणवत्ता पदवी परी-
क्षेचा वेगवेगळ्या विषयांचा अभ्यासक्रम काय आहे
यावर अवलंबून असते. हा अभ्यासक्रम कसा राबविला
जातो, त्याचे अध्यापन आणि मूल्यमापन कसे होते या
महत्त्वाच्या गोष्टी आहेतच. पण अभ्यासक्रम ही मूल-
भूत महत्त्वाची गोष्ट. असा हा अभ्यासक्रम ठरविण्या-
साठी विद्यापीठांत प्रत्येक विषयासाठी अभ्यास-मंडळे
असतात. या मंडळांनी तयार केलेल्या अभ्यासक्रमांकडे
नजर टाकली तर काही गोष्टी सहज लक्षात येतात
त्या अशा :

१) अभ्यासक्रम म्हणजे मुख्यतः विषयांतील प्रकरणांची ( topics ) यादी असते. त्याखाली क्रमिक पुस्तके आणि / किंवा संदर्भ ग्रंथांची नावे असतात. जर भाषा विषय असेल तर नेमलेली पुस्तके आणि संदर्भ ग्रंथ यांची यादी असते.

२) प्रश्नपत्रिकेचे स्वरूप आणि गुणांची वाटणी यानंतर दिलेली असते. या स्वरूपात ‘ व्यापक ( broad ) प्रश्न ’, ‘ टिपणे द्या – ४ पैकी २ ’ असे फक्त उल्लेख असतात.

या अभ्यासक्रमाचा उद्देश काय, विद्यार्थ्यांनी यातून
काय आत्मसात करायचे आणि कशासाठी– म्हणजे
अभ्यासक्रमाच्या ध्येयधोरणाविषयी कुठे उल्लेख केलेला
सहसा आढळत नाही. खरे म्हणजे पदवी परीक्षेच्याच
एकूण अभ्यासक्रमाचा उद्देश काय असावा यासंबंधी
विद्यापीठांनी आपल्या तीन वर्षांच्या अभ्यासक्रमात
काही मांडलेले आढळून येत नाही. प्राध्यापकांनी हा
अभ्यासक्रम कसा पार पाडावा, कुठल्या प्रकरणासाठी
किती शैक्षणिक तास द्यावेत, अभ्यासक्रमातील उप-
विषयांना किती महत्त्व द्यावे यासंबंधीदेखील मार्ग-
दर्शनपर विचार मांडलेले दिसत नाहीत. याला एखाद-
दुसरा अपवाद असेलही, तरीपण विद्यापीठीय शिक्ष-
णाचा अभ्यासक्रम तयार करताना त्यामागे काही
विचार आहे असे सध्याच्या अभ्यासक्रमावरून तरी
दिसत नाही.

विद्यापीठीय शिक्षणाच्या दर्जाविषयी १९६५ मध्ये विद्यापीठ अनुदान मंडळाने एक अहवाल तयार केला होता. त्यात अभ्यासक्रम म्हणजे केवळ प्रकरणाची एक विस्तृत यादी मानणे ही फार मोठी चूक आहे असे नमूद केले आहे. ‘ भगवंतम टीम ’ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अभ्यासमंडळाने १९५७ मध्ये सर्वसामान्य शिक्षणाविषयी दिलेल्या अहवालात तीन वर्षांच्या पदवी अभ्यासक्रमाची शिफारस केली होती. या अभ्यासक्रमात आठवड्याच्या ७२ तासांच्या शिक्षणात निदान २४ तास सर्वसामान्य अभ्यासक्रमासाठी राखून ठेवावेत– पदवी परीक्षेच्या पहिल्या वर्षी आठवड्याला १५ तास आणि नंतर ते कमी करीत दोन वर्षात आठवड्याला ९ तास घेतले जावेत; आणि या अभ्यासक्रमामध्ये सर्वच विद्याशाखांसाठी मानव्य, समाजशास्त्रीय आणि निसर्गशास्त्रीय विषयांतून सर्वांसाठी एकच असा अभ्यासक्रम तयार करावा, त्यातून पदवी शिक्षण घेणाऱ्यांना आधुनिक जग आणि वेगवेगळ्या ज्ञान-शाखांतील मूलभूत संकल्पनांचे ज्ञान व्हावे असा विचार त्यांनी मांडला होता. त्यानंतरच्या गोविंद राजुलु कमिटीनेदेखील हे धोरण थोड्याफार दुरुस्त्या सुचवून मान्य केले होते. उदाहरणार्थ, विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना त्यांच्या अभ्यासक्रमातून काय समजायला हवे याविषयी त्या कमिटीमधल्या विज्ञानशाखेचे तज्ज्ञ म्हणतात की, १) विद्यार्थ्यांना वेगवेगळ्या विज्ञान-शाखांचे परस्परसंबंध समजले पाहिजेत. २) विज्ञान क्षेत्रामधल्या एका युगातील संकल्पना आणि त्याच युगातील इतर क्षेत्रांमधील विचार आणि संकल्पना यांचा संबंध त्यांच्या लक्षात आला पाहिजे. ३) विज्ञान ही एक ज्ञानाची शाखा आहे आणि त्यामागे एक वैज्ञानिक विचारपद्धती आहे याची ओळख त्यांना झाली पाहिजे. ४) जीवनविषयक वैज्ञानिक दृष्टिकोण

अनुक्रमणिका

त्यांना समजला पाहिजे, तसेच ५) विज्ञान आणि समाज यांच्यातील संबंधाचेही ज्ञान त्यांना झाले पाहिजे. हे केवळ विज्ञानशाखेबद्दल झाले. यानुसार इतर सर्वच विद्याशाखांच्या उद्देशांचा विचार या मंडळांच्या अहवालांमधून येऊन गेला आहे. पण प्रत्यक्षात सध्याच्या अभ्यासक्रमांकडे पाहिले तर वेगवेगळ्या विद्याशाखांतून शिक्षण घेऊन बाहेर पडणाऱ्या आमच्या पदवीधरांना आधुनिक जगातील वेगवेगळ्या ज्ञानशाखांचा परिचय होईल असे त्यांत काही आढळत नाही. विशिष्ट विषयाचे खास शिक्षण घेऊन बाहेर पडलेले हे पदवीधर तसे अज्ञानीच राहतात. जोस ऑर्तेगा या शिक्षण तज्ज्ञाने आपल्या ' मिशन ऑफ द युनिव्हर्सिटी ' या ग्रंथात अशा पदवीधरांची संभावना ' new barbarians ' म्हणून केलेली आहे. पदवी परीक्षेचा अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या व्यक्तीकडून समाजाची काही अपेक्षा असते. ' पदवीधर मतदारसंघ ' निर्माण करून त्यांना आपण वेगळे स्थान दिलेले आहे. पण वाणिज्य, विज्ञान, अभियांत्रिकी आणि वैद्यकीय शाखेच्या पदवीधरांना त्या विशिष्ट विषयांतील माहितीवजा ज्ञानापलीकडे विशाल दृष्टिकोण देणारे, जीवनमूल्यांचा परिचय करून देणारे शिक्षण त्यांच्या अभ्यासक्रमांतून मिळतच नाही. जगाच्या इतिहासातील महत्त्वाच्या टप्प्यांचे, मानवी संस्कृतीच्या इतिहासाचे त्यांना ज्ञान नसते. आपल्या भोवतालच्या सामाजिक–राजकीय परिस्थितीतील बदलांचा विचार करण्याची क्षमता त्यांच्यात आलेली नसते. खास विषयांच्या एकांगी अभ्यासक्रमातून बाहेर पडलेल्या या पदवीधरांच्या बोलण्यात वजनदारपणा आणि आत्मविश्वास यांचा अभाव असतो. काही दिवसांपूर्वी वर्तमानपत्रांतून आणि दूरदर्शनवर महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या मुलाखती प्रसृत झाल्या होत्या. त्यांच्या बोलण्यातून उथळपणा, सुसंगत विचार मांडण्याच्या कौशल्याचा अभाव, सध्याच्या सामाजिक–राजकीय परिस्थितीविषयी अज्ञान तात्त्विक बैठकीचा पूर्णपणे अभाव याच गोष्टी जाणवल्या. याचे प्रमुख कारण म्हणजे पदवी अभ्यासक्रमात वैचारिक शिक्षणाचा दिसून येणारा अभाव.

दुसरी गोष्ट पदवी अभ्यासक्रम हा मूलभूत स्वरूपाचा अभ्यासक्रम असला पाहिजे हे सर्वच मान्य करतात. पण सध्या देशातल्या काय एका राज्यातल्या विद्यापीठांमध्येदेखील परिस्थिती अशी आहे की विद्यार्थ्यांना अधेमधे एका विद्यापीठातून दुसऱ्या विद्यापीठात जाता येत नाही. खरे म्हणजे पदवी परीक्षेचे विषय आणि त्यांचे अभ्यासक्रम प्रमाणित ( standardised ) असायला काहीही हरकत नसावी. हे अभ्यासक्रम जर प्रमाणित केलेत तर विद्यार्थ्यांना देशात किंवा राज्यात कुठेही शिकायला जाता येईल. शिवाय एका विद्यापीठाचा दर्जा दुसऱ्यापेक्षा कमी किंवा जास्त आहे अशी चर्चा व्हायला वाव मिळणार नाही. विद्यार्थ्यांना महाविद्यालयीन शिक्षणासाठी कुठेही जाण्याची मुभा असणे हे राष्ट्रिय एकात्मतेच्या दृष्टीनेदेखील योग्यच आहे. पदवी अभ्यासक्रम हा पायाभूत (किंवा core) अभ्यासक्रम असतो. त्यात विषयातील मूलभूत संकल्पना पक्क्या व्हाव्यात अशी अपेक्षा असते. प्रत्येक विषयाचा हा अभ्यासक्रम सर्वत्र सारखा असणे अपरिहार्यच आहे. हे अभ्यासक्रम तयार करण्यासाठी प्रत्येक विद्यापीठाच्या क्षेत्रामधून त्या त्या विषयातील तज्ज्ञ शिक्षक आणि शिक्षणक्षेत्राबाहेरचेदेखील तज्ज्ञ बोलाविले तर हे अभ्यासक्रम अर्थपूर्ण होऊ शकतील. ज्या विद्यापीठांना आणि स्वायत्त महाविद्यालयांना आपल्या भोवतालच्या विशिष्ट भौगोलिक आणि सामाजिक परिस्थितीनुसार काही खास विषयांचे अभ्यासक्रम तयार करायचे असतील त्यांनी ते अवश्य करावेत आणि असे विषय ऐच्छिक म्हणून ठेवावेत किंवा त्यांचे पदविका अभ्यासक्रम तयार करावेत. पण पायाभूत अभ्यासक्रम सर्वत्र सारखाच असणे आवश्यक आहे. शिवाय हे तज्ज्ञमंडळ वेगवेगळ्या विषयांच्या ज्ञानात काय भर पडली आहे ते लक्षात घेऊन योग्य वेळी हे अभ्यासक्रम सुधारू देखील शकतील.

सध्या हे अभ्यासक्रम विद्यापीठांतील अभ्यासमंडळे तयार करतात. तयार करतात म्हणण्यापेक्षा आहे तेच अभ्यासक्रम एखाद दुसऱ्या संदर्भग्रंथाची भर घालून किंवा प्रश्नपत्रिकेच्या स्वरूपात थोडा बदल करून पुढे सुरू ठेवतात. ही अभ्यासमंडळे लोकशाही पद्धतीने त्या त्या विषयांच्या विषयप्रमुखांमधून निवडून आलेल्या प्रतिनिधींची बनलेली असतात. अशा रीतीने निवडून येणे हा शिक्षणक्षेत्रातील राजकारणाचा एक भाग झालेला आहे. त्यामुळे ' निवडून येणे ' हे महत्त्वाचे कार्य संपल्यावर वर्षाकाठी जेमतेम २ ते ३ बैठकांतल्या ३ ते ४ तासांच्या कामात अभ्यासक्रमावर काही ठोस चर्चा किंवा विचार होणे फारसे शक्य नसते. कारण त्यांच्या कामकाजात परीक्षकांची पॅनेल्स ठरविणे, नवीन क्रमिक


अनुक्रमणिका

पुस्तके नेमणे, संदर्भ ग्रंथ म्हणून काही ग्रंथ मान्य करणे वगैरे कामे असतातच. बैठकीअगोदर अभ्यासक्रमाबद्दल काही योजना किंवा धोरण सभासदांनी मंडळाकडे किंवा मंडळाने सभासदांकडे पाठवून त्यांना तयारी करून यायला प्रवृत्त केलेले असतेच असे नाही. या अभ्यासमंडळांच्या बैठकांची 'मिनिट्स' पाहिलीत म्हणजे कोणते आणि कसे काम होते याची सहज कल्पना येते. आपल्या अहवालात विद्यापीठ अनुदान मंडळाने स्पष्ट म्हटले आहे की 'मेरिट' हा जर अभ्यासमंडळावर सभासद असण्याचा निकष नसेल तर विद्यापीठांचे अभ्यासक्रम सुधारणे किंवा त्यांचे आधुनिकीकरण करणे दुरापास्त आहे. म्हणून अभ्यासक्रम तयार करण्याची किंवा त्यात योग्य ते बदल करण्याची जबाबदारी या अभ्यासमंडळांवर टाकण्यापेक्षा तज्ज्ञ मंडळांनी तयार केलेले प्रमाणित अभ्यासक्रम स्वीकारणे केव्हाही अधिक श्रेयस्कर ठरेल. विद्यापीठ अनुदान मंडळाने तज्ज्ञांची समिती नेमली होती आणि त्या समितीला अभ्यासक्रमात सुधारणा सुचवावयास सांगितले होते. या समितीने आदर्श अभ्यासक्रमाचे नमुनेही तयार केले, पण पुढे त्याचे काय झाले हा प्रश्नच आहे. विद्यापीठ अनुदान मंडळाने अशीही शिफारस केली होती की विद्यापीठांनी दर काही वर्षांनी आपल्या अभ्यासक्रमांचे काटेकोर मूल्यमापन करावे. हे मूल्यमापन अर्थातच वेगवेगळ्या विषयांच्या अभ्यासमंडळांनी करावयास हवे होते. पण तसे ते झाल्याचे दिसत नाही.

अभ्यासक्रमाबरोबरच तो शिकविण्यासाठी उपयुक्त साहित्य निर्माण करणे, 'लेक्चर मेथड'ला चांगले पर्याय ठरतील असे प्रत्येक विषयासाठी व्यवसाय (Teaching Exercises) तयार करणे, अभ्यासक्रम आपल्या विद्यापीठाच्या क्षेत्रात सर्वच कार्यक्षमतेने शिकविला जावा यासाठी वेळोवेळी चर्चासत्रे, कार्यशाळा (workshops) असे उपक्रम राबविणे हेदेखील अभ्यासमंडळांचे काम आहेच. पण बरीचशी अभ्यासमंडळे केवळ सर्वसामान्य स्वरूपाची व्याख्याने आयोजित करण्यापलीकडे काही करीत नाहीत असे दिसून येते. यात दोन प्रकारच्या अडचणी दिसून येतात. एक म्हणजे अभ्यासमंडळाचा अध्यक्ष निवडणूक प्रक्रियेतून आला असला तर त्याला विद्यापीठातल्या त्या विषयाच्या विभागप्रमुखाचे सहकार्य मिळेलच असे नाही. आणि स्वतः त्याच्याकडे कुठलेही 'अकादमिक' कार्यक्रम अमलात आणण्याची दृष्टी आणि वकुबही नसल्यामुळे नेहमीच्या चाकोरीबद्ध कामापलीकडे अभ्यासमंडळ काही करू शकत नाही. दुसरी गोष्ट; यातूनही एखाद्या अभ्यासमंडळाने काही करावयाचे ठरविले तरी 'फॅकल्टी', "अकादमिक कौन्सिल", 'सिंडिकेट' अशा वेगवेगळ्या मंडळांतून त्याला संमती मिळाली आणि 'बजेट'चा प्रश्न महत्त्वाचा नसला तरच अभ्यासमंडळाची योजना प्रत्यक्षात येऊ शकते. जर विरुद्ध गट या एखाद्या अधिक सत्तावान मंडळात प्रभावी असेल तर अर्थातच अभ्यासमंडळाची कुठलीही योजना धोक्यात येऊ शकते. या अभ्यासमंडळांच्या कामाचे मूल्यमापन करून एक तर त्यांची कार्यक्षमता वाढविण्याचे काही ठोस उपाय करावे किंवा ती बरखास्त करून अपेक्षित कामे वेगवेगळ्या विशिष्ट कालावधीसाठी नेमलेल्या समित्यांकडून करून घ्यावीत. त्यामुळे खर्चही कमी होण्याची शक्यता आहे. सर्वच विद्यापीठांना सारखा असा प्रत्येक विषयाचा प्रमाणित अभ्यासक्रम जर तयार झाला तर अभ्यासमंडळांची गरज फारशी उरतच नाही. विद्यापीठांच्या वेगवेगळ्या मंडळांच्या कामाचे नव्याने मूल्यमापन करून त्यांना शिस्त लावणे हेसुद्धा आवश्यक आहेच.

**अध्यापन**

महाविद्यालयीन अभ्यासक्रम, अध्यापन आणि मूल्यमापन (म्हणजे परीक्षा) या परस्परावलंबी गोष्टी आहेत. अभ्यासक्रमाचे यश अखेर अध्यापनावरच अवलंबून असते आणि या यशाचे मोजमाप परीक्षेत मिळते असे सर्वसाधारण मत आहे. मात्र अभ्यासक्रम सुधारण्याच्या प्रश्नापेक्षाही महाविद्यालयीन अध्यापनात गुणवत्ता आणण्याचा प्रश्न कित्येक पटीने कठीण आणि गुंतागुंतीचा आहे. याचे प्रमुख कारण एकूणच शिक्षण क्षेत्राचा झालेला विस्तार आणि योग्य शिक्षकवर्ग आणि शैक्षणिक साधने यांचा अभाव हे आपण जाणतोच. महाराष्ट्रात तर खाजगी शिक्षणसंस्थांनी आपल्या महाविद्यालयांचे जाळेच पसरविले. त्यांचा आणि त्यांना अशा रीतीने महाविद्यालये सुरू करावयास परवानगी देणाऱ्या सरकारचा आणि विद्यापीठांचा उद्देश चांगला असला तरी त्यामागे नियोजन नव्हते आणि शिक्षणाचा दर्जा राखण्याचा विचार नव्हता. विद्यापीठ अनुदान मंडळ







आणि विद्यापीठे यांचे निकष धाब्यावर बसवून महाविद्यालये सुरू केली गेलीत. अशाच अनेक महाविद्यालयांतून बाहेर पडलेले पदवीधर पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी आले आणि त्यातूनच सध्याचा गेल्या दोन-तीन पिढ्यांचा प्राध्यापकवर्ग तयार झाला. ज्या काळात सरकारी आणि खाजगी क्षेत्रांत तुलनेने चांगले पगार आणि सत्तास्थाने होती त्या काळात चांगले लोक शिक्षण क्षेत्राकडे वळणे शक्यही नव्हते. गावाजवळ असलेल्या माध्यमिक शाळेत किंवा महाविद्यालयात लहान पगारावर नोकरी करून शेती करणे किंवा इतर जोडधंदे करणे ज्यांना परवडले त्यांनी हे क्षेत्र व्यापून टाकले. हा इतिहास आहे आणि वर्तमानदेखील आहे. पण अशा स्थितीतदेखील विद्यापीठांनी आणि शिक्षणसंस्थांनी शैक्षणिक गुणवत्ता राखण्यासाठी काही काळजी घेतली असती तर अध्यापनाचे असे अधःपतन झाले नसते.

महाविद्यालयीन अध्यापनाची परंपरागत पद्धत म्हणजे 'लेक्चर'. आजही आपल्या स्वतःच्या कार्याचा मूल्यमापन अहवाल तयार करताना 'तुम्ही शिकविण्याच्या पद्धतीत काय नावीन्य (Innovation) आणले' या प्रश्नापुढे प्राध्यापक 'लेक्चर मेथड' असे लिहितात. महाविद्यालयात शिकवायचे म्हणजे ४५ ते ५० मिनिटे 'लेक्चर' द्यायचे ही महाविद्यालयीन अध्यापनाची परंपरागत सोपी आणि सुटसुटीत व्याख्या आहे. प्राथमिक आणि माध्यमिक शाळांमधल्या शिक्षकांसाठी अध्यापनतंत्राचा अभ्यास आवश्यक मानला जातो. पण महाविद्यालयात नव्याने शिकवायला येणाऱ्या शिक्षकाला अध्यापनाची काही शिस्त असावी याची सुरुवातीपासूनच कुणाला गरज वाटली नाही. शालेय अध्यापन तंत्राचा महाविद्यालयीन अध्यापनात उपयोग होईलच असे नाही. तरीदेखील ज्याने चांगलं वाचलं आहे तो चांगलं शिकवूदेखील शकेल असे गृहीत धरून 'मास्टर्स' पदवी घेऊन आलेला कुठलाही तरुण महाविद्यालयात शिकवायला पात्र आहे असे मानण्यात आपण काही चूक करतो आहोत असे विद्यापीठांना आणि शिक्षणसंस्थांना वाटले नाही, वाटतदेखील नाही. अशा या प्राध्यापकाला 'लेक्चर मेथड' हे एक वरदानच ठरले. विद्यार्थ्यांच्या नजरेला नजर न भिडविता समोर भिंतीवरच्या घड्याळाकडे किंवा नेहरू, गांधी यांच्या फोटोकडे पाहात ४५ मिनिटे बोलत राहण्यापेक्षा वेगळे काही करणे त्याला शक्य नव्हते. 'लेक्चर मेथड' खूप वाईट आहे असे नाही. एखाद्या विषयावर तयार केलेले मुद्देसूद व्याख्यान चांगले असू शकते. पण हे व्याख्यान जर एकसूरी असले, त्यात समजावण्याची भाषा आणि संभाषण-कौशल्य नसले तर ते कंटाळवाणे होते. अनेक प्राध्यापकांना शिकविण्याची एक भाषा असते, शिकवणे म्हणजे वक्तृत्व नव्हे याची कल्पनाच नसते. समोर ऐच्छिक विषयाचे आठ-दहा विद्यार्थी असोत की आवश्यक विषयाचे शे-सव्वाशे, त्यांचा सूर एखाद्या 'पळपीट' लेक्चरसारखा किंवा हजारो श्रोत्यांपुढे बोलणाऱ्या राजकीय पुढाऱ्यासारखा असतो. आपण विद्यार्थ्यांच्या 'कान' या एकाच ज्ञानेंद्रियाचा उपयोग शिकविण्यासाठी करून घेत आहोत आणि हा एक अत्याचार आहे याचे भान त्यांना राहत नाही. अशा 'लेक्चर्सना' बसणे ही एक शिक्षाच आहे असे विद्यार्थ्यांना वाटल्यास नवल नाही. एके काळी आपल्या 'लेक्चर्स'नी सर्व वर्गाला मंत्रमुग्ध करून टाकणारे प्राध्यापक होते असे म्हणतात. अशा मंत्रमुग्ध झालेल्या विद्यार्थ्यांच्या वहीत त्या लेक्चर्सच्या 'नोट्स' असणं शक्यच नसतं. कारण मंत्रमुग्ध करणारी व्याख्याने नोट्स घेण्यासाठी नसतातच. काही थोडे चांगले प्राध्यापक मुद्दे मांडीत, प्रश्न उपस्थित करीत आणि विद्यार्थ्यांना बोलायला, विचार करायला प्रवृत्त करीत शिकवीत असत. काही विषय (विशेषतः कादंबरी, नाटके), काही प्रकरणे, (उदा., इतिहासातील रोमांचकारक संघर्ष) 'मंत्रमुग्ध' व्याख्याने द्यायला योग्यच असतात यात शंका नाही. पण असे एकपात्री प्रयोग सतत करीत राहणे म्हणजे शिकवणे नाही. या नाट्यमयतेचा वापर योग्य तेवढाच व्हायला पाहिजे याची जाणीव 'लेक्चर मेथड'-मध्ये प्राध्यापकांना राहत नाही. गेली अनेक वर्षे 'लेक्चर मेथड'चे प्रचलित असलेले स्वरूप म्हणजे कधी न बदलणाऱ्या अभ्यासक्रमांवर कित्येक वर्षांपूर्वी तयार केलेली 'नोट्सची' भेंडोळी घेऊन वर्गात जाणे आणि तासाला ८ ते १० पाने या वेगाने 'डिक्टेट' करणे असे आहे.

अध्यापनाच्या या अवस्थेला विद्यापीठे आणि शिक्षणसंस्था जबाबदार आहेतच. प्राध्यापकांच्या नेमणुका कशाही प्रकारे झाल्या तरी त्यांचा अध्यापनाच्या गुणवत्तेवर फार वाईट परिणाम होऊ नये म्हणून विद्यापीठांनी नवीन प्राध्यापकांसाठी निदान एक

अनुक्रमणिका







महिन्याचे तरी कार्यशाळेसारखे प्रशिक्षण वर्ग सुरू करणे आवश्यक होते. शिक्षणप्रसाराचे पवित्र कार्य हाती घेतलेल्या शिक्षणसंस्थांनादेखील गुणवत्तेची फारशी पर्वा नव्हती. त्यांनाही आपण विधिनिषेध न बाळगता नोकरी दिलेल्या प्राध्यापकांकडून काहीतरी बरे शिकवून व्हावे यासाठी प्रशिक्षण वर्गाची गरज कधी वाटली नाही.

वर सांगितल्याप्रमाणे शाळांमधून अध्यापनाचे जे तंत्र वापरले जाते ते महाविद्यालयात उपयुक्त नाही हे खरे असले तरी अध्यापनविषयक मूलभूत महत्त्वाच्या गोष्टी लक्षात घेऊन प्राध्यापकांच्या प्रशिक्षण वर्गाचा अभ्यासक्रम आखला जाणे आवश्यक आहे. जे प्रकरण आपण शिकवीत आहोत त्यातले महत्त्वाचे मुद्दे क्रमवार फळयावर लिहिणे, त्यांवर काही सोपे प्रश्न विचारून विद्यार्थ्यांना विचार करायला लावणे, त्यांची पुढे येणाऱ्या महत्त्वाच्या मुद्द्यांसाठी मनोभूमिका तयार करणे, पूर्वी झालेल्या संबंधित प्रकरणांची आठवण करून देत पूर्वी शिकविलेल्या अभ्यासक्रमाची उजळणी करणे अशी अनेक कौशल्ये प्राध्यापकांनी कशी वापरावीत हे नवीन प्राध्यापकांना शिकविणे आवश्यक आहे. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे मानसशास्त्र त्यांना समजले पाहिजे. ज्या वयोगटातून हे विद्यार्थी येतात त्यांचा विचार करता त्यांच्याबद्दल सहानुभूती आणि मैत्रीची भावना प्राध्यापकांच्या मनात असली तर शिकण्या–शिकवण्याची प्रक्रिया सोपी होते. आपल्याला हा विषय समजतो आहे, आपण उत्तर देऊ शकतो अशी यशाची जाणीव जर विद्यार्थ्यांना झाली तर तीच त्यांना मोठी प्रेरणा ठरू शकते. विद्यार्थ्यांना आपल्या ज्ञानाने दिपवून टाकण्यापेक्षा त्यांना विश्वासात घेऊन यशाची अनुभूती देणे अधिक महत्त्वाचे. पण हे अध्यापनात होत नाही कारण अध्यापनाचा विषय आणि अध्यापनाचे माध्यम ( म्हणजे भाषा ) यांवर जी पकड असायला हवी तीच मुळात नसते.

अध्यापनात पहिली मोठी अडचण येते ती भाषेची. जेथे अध्यापनाचे माध्यम इंग्रजी आहे तेथे तर फारच केविलवाणी स्थिती असते. शिकविण्याच्या माध्यमावर प्रभुत्व नसल्यामुळे प्राध्यापक विशिष्ट हातवारे करतात. लकबी वापरतात; वाक्यपूर्तीसाठी विशिष्ट शब्द किंवा वाक्प्रचार अनवधानाने वापरत राहतात आणि विद्यार्थ्यांचे लक्ष केवळ ते शब्द किंवा लकबी यांवरच केंद्रित होते. प्राध्यापकांच्या प्रशिक्षणात विशिष्ट विषयांसाठी भाषा कशी वापरावी, उदाहरणे कशी द्यावीत, स्पष्टीकरण कसे द्यावे अशा सर्व अध्यापनाशी संबंधित 'Communication Strategies' चा समावेश होणे आवश्यक आहे. हे मातृभाषेत शिकविणाऱ्यांसाठीदेखील आवश्यक आहेच. अध्यापन नैसर्गिक संभाषणाच्या भाषेत झाले तर सुसह्य आणि परिणामकारक होते. आवाजातले चढ-उतार, थांबून बोलणे, वेगळ्या शब्दांत सांगणे, प्रसंगी उपरोध आणि विनोदाचा (फक्त विषयाशी संबंधित विनोदाचा) वापर करणे हे मातृभाषेत शिकविणाऱ्यांनीसुद्धा शिकले पाहिजेच. खडू-फळयांपासून तर वेगवेगळ्या दृकश्राव्य माध्यमांचा उपयोग अध्यापनात केला तर प्राध्यापकांना श्वास घ्यायला वेळ मिळेल आणि 'मटेरियल' संपण्याची धास्तीसुद्धा त्यांच्या मनातून जाईल.

विद्यार्थिदशेत ज्यांनी ग्रंथालय आतून कधी पाहिलेले नसते, क्रमिक पुस्तकांच्या मोजक्या कपाटांपलीकडे ज्यांना ग्रंथालयाची माहिती नसते असे विद्यार्थी जेव्हा प्राध्यापक म्हणून काम करू लागतात तेव्हा ग्रंथालयाची एकंदर व्यवस्था, संदर्भ ग्रंथांतून संदर्भ कसे शोधावेत, आपल्या विषयातले महत्त्वाचे संदर्भग्रंथ कोणते, नियतकालिके कोणती याचेसुद्धा प्रशिक्षण नवीन प्राध्यापकांना मिळायला हवे. एखाद्या महिन्याच्या प्रशिक्षण वर्गात सर्वकाही शिकवून होईलच असे नाही पण अशा अनेक गोष्टींची जाणीव जर नव्या प्राध्यापकांना सुरुवातीलाच झाली तर नोकरीची १०।१५ वर्षे संपल्यानंतर त्यांना जे यथा तथा समजते ते अगोदरच त्यांच्या लक्षात आलेले असेल आणि महाविद्यालयीन शिक्षण म्हणजे केवळ 'a tower of bubble' असे राहणार नाही अशी आशा आपण करू शकू.

**परीक्षा**

अभ्यासक्रम आणि अध्यापन हे परीक्षानुवर्ती नसावे असा एक विचार नेहमी मांडला जातो. पण प्रत्यक्षात तसे कधी होत नाही. परीक्षांचा या दोन्ही गोष्टींवर सतत परिणाम होत राहतो. परीक्षेला प्रत्यक्ष व्यवहारात मोठी किंमत आहे. पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्यावरच आता आपली विद्यार्थिदशा संपली आणि या पदवीच्या जोरावर आपल्याला नोकरी मिळावी अशी प्रत्येकाची आकांक्षा असते. पदवी आणि नोकरी यांचा संबंध तोडण्याचे धोरण अजून तरी फारसे यशस्वी

अनुक्रमणिका

झालेले नाही. त्यामुळे पदवी परीक्षेला फार मोठे महत्त्व आलेले आहे. काय वाटेल ते करून परीक्षेत यश मिळवायचे हेच विद्यार्थ्यांचे ध्येय असते. प्रत्यक्ष किती ज्ञान पदरात पडले याचा आणि नोकरी मिळण्याचा व्यावहारिक संबंध फारसा नसल्यामुळे परीक्षेच्या चक्रातून बाहेर पडणे एवढेच महत्त्वाचे ठरते. साहजिकच पेपर फोडणे, कॉपी करणे, परीक्षकांची नावे आणि पत्ते मिळवून त्यांच्या घरी जाणे वगैरे अनेक 'परीक्षा'-संबंधीचे भ्रष्टाचार सतत सुरू असतात. हे सर्वच आता आपणा सर्वांच्या इतके परिचयाचे झाले आहे की, या स्थितीचे वर्णन करण्यापेक्षा या प्रचंड गोंधळात थोडीफार विश्वासार्हता कशी येऊ शकेल याचा विचार करणे अधिक उपयुक्त ठरेल.

परीक्षेच्या स्वरूपात सुधारणा होणे अत्यंत महत्त्वाचे आहे असे 'युनिव्हर्सिटी एज्युकेशन कमिशन'ने आपल्या अहवालात (१९४८–४९) फार पूर्वीच म्हणून ठेवलेले आहे. विद्यापीठीय शिक्षणात एकच कुठली सुधारणा करावयाची असली तर ती परीक्षेबाबत असे त्यांना वाटत होते. ही परिस्थिती अजूनही कायम आहेच. १९५७ सालच्या डोंगर केरी कमिशनने टचुटोरियल्स, चर्चासत्रे, निरंतर अंतर्गत मूल्यमापन यांबरोबरच कुठली महत्त्वाची सूचना केली असेल तर ती निबंधवजा प्रश्नाऐवजी मूल्यमापनाचे इतर प्रकारचे प्रश्न उपयोगात आणण्याची. तरीही सर्वच विद्यापीठांत निबंधवजा प्रश्न विचारण्याची पद्धत अजूनही रूढ आहेच. त्याच्या जोडीला काही 'थोडक्यात टीपा लिहा' असे प्रश्न असतात. पण प्रश्नपत्रिका मुख्यत: निबंधवजा प्रश्नांनी भरलेली असते. हे प्रश्न अत्यंत पसरटपणे विचारलेले असतात, त्यांची एकापेक्षा जास्त उत्तरे संभवतात. कुठले उत्तर ग्राह्य धरावयाचे हे सर्वस्वी परीक्षकावर अवलंबून असते. परीक्षक आशय, अभिव्यक्ती, उत्तराचे संघटन (organization) वगैरे पैलूंपैकी नेमक्या कुठल्या गोष्टीमुळे प्रभावित होईल किंवा त्याचे मत वाईट होईल हे सांगणे केवळ अशक्य असते. या प्रश्नात एकाच प्रकारच्या उत्तराला वेगवेगळ्या परीक्षकांकडून वेगळेच गुण मिळतात, इतकेच नाही तर तोच परीक्षक काही काळाने याच उत्तराला कमी किंवा अधिक गुण देण्याची शक्यता असते. प्रश्नपत्रिका तयार करणारे नमुना-उत्तरे परीक्षकांना देऊ शकत नाहीत किंवा वेगवेगळ्या पैलूंसाठी परीक्षकांनी किती गुण द्यावे त्याचे मार्गदर्शनही करू शकत नाहीत. प्रश्नांच्या उत्तरांना शब्दांची मर्यादा दिलेली नसते. साधारणत: २० ते २५ पानी ३०० उत्तरपत्रिका विशिष्ट कालमर्यादेत तपासणारा परीक्षक सगळी उत्तर-पत्रिका वाचू शकतोच असे नाही. याबद्दल प्रचलित असलेले विनोद आणि दंतकथा दुर्लक्षित करूनदेखील निबंधवजा उत्तरांचे मूल्यमापन ही अत्यंत अविश्वसनीय गोष्ट आहे यात शंका नाही.

निबंधवजा प्रश्नांच्या बाजूने एक मुद्दा मांडला जातो तो हा की उच्च शिक्षणाचे आपले उद्दिष्ट पदवी परीक्षा उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्याला आपले विचार संघटित करून तर्कशुद्ध पद्धतीने मांडता यावेत, त्याच्याकडे चांगल्या प्रकारचे संदेशन-कौशल्य (communication skill) असावे हे आहे. पण तीन तासांत ५ ते ६ निबंधवजा प्रश्नांची उत्तरे लिहिणारा सर्वसामान्य विद्यार्थी खरोखरच आपले संदेशन-कौशल्य दाखवीत असतो की केवळ तयार केलेली उत्तरे बऱ्यावाईट प्रकारे उतरवून काढून आपल्याला मिळालेल्या ज्ञानापेक्षा आपल्या स्मरणशक्तीची परीक्षा घेत असतो ? खरं म्हणजे बहुसंख्य विद्यार्थी ठराविक निबंधवजा प्रश्नांची उत्तरे तयार करतात. प्रश्न कुठलाही असो ह्या विशिष्ट प्रकरणावरचे तयार केलेले उत्तर लिहिणे हेच त्यांचे प्रामाणिक धोरण असते आणि त्याला यश मिळतेच कारण अशा उत्तर-पत्रिका पूर्णपणे वाचल्या जात नाहीत. त्यामुळे या प्रकारचे प्रश्न विद्यार्थ्यांचे वैचारिक आणि भाषिक संघटना कौशल्य जोखू शकतात असे म्हणणे पटत नाही.

निबंधवजा प्रश्नांचे दोष बरेच आहेत. कोणते प्रश्न विशिष्ट वर्षी विचारले जातील याचा अंदाज या प्रश्नपत्रिकेच्या बाबतीत सहज घेता येतो. त्यामुळे 'सुपर टेन', 'लाइकली ट्वेंटी' अशी मार्गदर्शके ऐन वेळी वाचूनसुद्धा बऱ्यापैकी गुण मिळविता येतात. त्यासाठी क्रमिक पुस्तके किंवा संदर्भ ग्रंथ वाचायची काहीही आवश्यकता नसते. ह्याच मार्गदर्शकावलीतील पाने फाडून ती परीक्षागृहात 'कॉपी' करण्यासाठी सहज वापरता येतात.

याला पर्याय म्हणून वेगवेगळ्या प्रकारचे वस्तुनिष्ठ प्रश्न असलेल्या प्रश्नपत्रिका तयार करणे हाच आहे. परीक्षा विश्वासार्ह असल्या पाहिजेत आणि जे अभ्यासक्रमात आहे किंवा जे शिकविले त्याचेच परीक्षेत मूल्य-

मापन व्हावे या दोन तत्त्वांशी तडजोड करायची नसेल तर आम्ही मूल्यमापनाची नवी पद्धत स्वीकारली पाहिजे. वस्तुनिष्ठ परीक्षा म्हटल्याबरोबर बहुपर्यायी ( multiple - choice ) प्रश्न ( ज्यांत ४ किंवा ५ उत्तरांपैकी एकावर ✓ अशी खूण तरी करायची असते किंवा तो पर्याय लिहून काढायचा असतो ) किंवा 'चूक–बरोबर' प्रश्न असे प्रकार डोळ्यांसमोर येतात. अशा प्रश्नांतून पदवी परीक्षेला असलेला अभ्यासक्रम आणि विद्यार्थ्यांकडून अपेक्षित असलेले सर्वकष कौशल्य ( विशेषतः Composition skill ) कसे परिक्षिले जाईल अशी शंका येणे साहजिकच आहे. पण वस्तुनिष्ठ परीक्षा म्हणजे केवळ या दोन प्रकारचे प्रश्न नव्हेत. वस्तुनिष्ठ मूल्यमापनाच्या पद्धतीत अनेक प्रकारचे प्रश्न आहेत आणि ते वेगवेगळ्या प्रकारचे कौशल्य नेमकेपणाने मोजू शकतात. छोट्या उत्तरांचे निश्चित दिशा दिलेले आणि शब्दमर्यादा घालून दिलेले प्रश्नसुद्धा पुरेसे वस्तुनिष्ठ ठरू शकतात. निखळ वस्तुनिष्ठ प्रश्न आणि छोट्या उत्तरांचे प्रश्न यांचे योग्य प्रमाण वापरून प्रश्नपत्रिका तयार केल्या तर त्या विश्वासार्ह ठरतील आणि ज्या ज्ञानाची परीक्षा आपण घेऊ इच्छितो तेच नेमकेपणाने मोजले जाईल. विद्यार्थ्यांना मूलभूत संकल्पना समजल्या आहेत की नाहीत आणि त्यांना त्यासंबंधी स्पष्टिकरण नेमकेपणाने मांडता येते की नाही या दोन गोष्टी प्रत्येक विषयाच्या परीक्षेत महत्त्वाच्या असतात. त्यांचे मूल्यमापन या प्रकारच्या प्रश्नांनी करता येईल. शिवाय अशा प्रश्नपत्रिकेचा महत्त्वाचा फायदा म्हणजे अभ्यासक्रमातील सर्व प्रकरणांना त्यात त्यांच्या महत्त्वाप्रमाणे स्थान देता येते. याउलट, निबंधवजा प्रश्नांच्या प्रश्नपत्रिकेत ठराविक प्रश्नांपलीकडे जाता येत नाही. सर्व अभ्यासक्रमाची दखल ते प्रश्न घेऊ शकत नाहीत.

यात एकच मोठी अडचण म्हणजे अशा नवीन मूल्यमापनाच्या पद्धतीचे सर्वच प्राध्यापकांना व्यवस्थित आणि सक्तीचे प्रशिक्षण दिले गेले पाहिजे. वस्तुनिष्ठ मूल्यमापनाची प्रश्नपत्रिका तयार करणे कष्टाचे आणि कौशल्याचे काम आहे. त्यासाठी प्रश्नपत्रिका काढणारे प्राध्यापक मूल्यमापनाच्या तंत्रात तज्ज्ञच असले पाहिजेत. ज्या ज्या ठिकाणी अभ्यासक्रमात काही सुधारणा करण्याचा प्रयत्न झाला किंवा परीक्षापद्धतीत सुधारणा करण्याचा प्रयत्न झाला तेथे अपयश आले याचे मुख्य कारण त्यासाठी संबंधित प्राध्यापकांचे योग्य पद्धतीने आवश्यक त्या दर्जाचे प्रशिक्षण झाले नाही किंवा कसलेच प्रशिक्षणच त्यांना दिले गेले नाही. अशा प्रश्नपत्रिकेचा अध्यापन, अध्ययन, यांवर जो परिणाम होईल तो निश्चितच चांगला असेल. यात प्रश्नपत्रिका नेहमीपेक्षा मोठी असेल पण उत्तरे मर्यादित आणि नेमकी असतील. प्रश्नपत्रिकांबरोबर नमुना-उत्तरे देता येतील आणि गुण कसे द्यावेत त्याचे मार्गदर्शन नेमकेपणाने करता येईल. त्यामुळे वेगवेगळ्या परीक्षकांनी केलेल्या मूल्यमापनात मोठा फरक पडणार नाही.

यात एक शंका अशी घेतली जाते की अशा प्रश्नांची उत्तरे छोटी असल्यामुळे परीक्षागृहात दुसऱ्याचे पाहून सहज 'कॉपी' करता येईल. खरे म्हणजे एखाद्या परीक्षापद्धतीच्या गुणावगुणांची चर्चा करताना असे कारण हा काही परीक्षापद्धतीचा दोष ठरत नाही. तरीदेखील अशा प्रकारची प्रश्न-पत्रिका 'कॉपी' प्रकारालासुद्धा काही प्रमाणात आळा घालू शकेल. अशी प्रश्नपत्रिका मोठी असल्यामुळे हुषार विद्यार्थी ती वेगाने संपवायचा प्रयत्न करतील आणि इतर कोणी आपले पाहून लिहीत असेल तर त्याच्यासाठी ते थांबू शकणार नाहीत. दुसरी गोष्ट अनेक वस्तुनिष्ठ आणि छोट्या उत्तराचे प्रश्न या प्रश्नपत्रिकेत असल्याने मार्गदर्शकामधून कोणती नेमकी पाने फाडून घ्यावीत आणि परीक्षेच्या वेळेस 'कॉपी'साठी त्यांचा उपयोग करावा हे ठरविणे कामचुकार विद्यार्थ्यांना बरेच कठीण जाईल. इतकेच काय अशा प्रश्नपत्रिकांसाठी मार्गदर्शक काढणेदेखील खर्चिक आणि त्रासाचे पडेल. अशी मार्गदर्शके निघाली तरी ती तज्ज्ञ प्राध्यापकांच्या मदतीनेच काढता येतील. निदान मार्गदर्शकांची तरी गुणवत्ता त्यामुळे वाढण्याची शक्यता आहे. विद्यार्थ्यांना सर्व अभ्यासक्रमाचा अभ्यास करावयास लावू शकेल अशीच ही प्रश्नपत्रिका असल्यामुळे कॉपी आणि भ्रष्टाचाराचे प्रकार गृहीत धरूनदेखील अशा परीक्षेचा एकंदरीत परिणाम गुणवत्तेस पोषकच ठरेल. मात्र वर म्हटल्याप्रमाणे यासाठी प्राध्यापकांचे प्रशिक्षण सक्तीने करणे आवश्यक आहे.

हे सर्व होईपर्यंत परीक्षेच्या बाबतीत तातडीने अमलात आणण्याचा एक उपाय म्हणजे Central assessment scheme. उच्च माध्यमिक मंडळाच्या पद्धतीप्रमाणे उत्तर-पत्रिकेवरचा विद्यार्थ्याचा अनुक्रम

आणि केंद्राचे नाव हा भाग कापून उत्तर-पत्रिकांना 'कोड नंबर' देऊन त्या परीक्षकांना विद्यापीठ परिसरातच तपासायला द्याव्यात. अलीकडे काही वर्षे परीक्षकांची नावे आणि पत्ते घेऊन विद्यार्थ्यांचे तांडे आणि काही प्रसंगी ओळख काढण्यासाठी त्यांच्याबरोबर त्यांचे प्राध्यापक गावोगाव हिंडत असतात. ही सर्व परीक्षायंत्रणाच कशी भ्रष्ट झाली आहे त्याच्या अनेक कथा प्रत्येक विद्यापीठाच्या क्षेत्रात कानावर येत असतात. भ्रष्टाचार कुठल्याही व्यवस्थेत येऊ शकतो हे खरे असले तरी सध्याचे त्याचे किळसवाणे बाजारीकरण काही प्रमाणात तरी काबूत आणण्याचा विद्यापीठांनी प्रयत्न करावा.

परीक्षेच्या बाबतीत आणखी एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो तो अंतर्गत मूल्यमापनाचा. जे शिकवितात त्यांनीच आपल्या विद्यार्थ्यांच्या गुणवत्तेचे मूल्यमापन करावे हे तत्त्वतः ठीकच आहे. अंतर्गत मूल्यमापन आवश्यक आहेच आणि त्याला पदवी परीक्षेत महत्त्व देणेदेखील आवश्यक आहे. काही विद्यापीठांमध्ये अंतर्गत मूल्यमापनाचे गुण विद्यापीठ परीक्षेच्या गुणांत मिळविले जातात तर काही विद्यापीठांत अंतर्गत मूल्यमापनाचे गुण विद्यापीठ परीक्षेच्या गुणपत्रिकेत वेगळे दाखविले जातात. हे गुण अधिक असले (आणि ते बरेच अधिक असतात, अपवाद म्हणूनच काही ठिकाणी ते कमी दिसतात) तर त्याचा परिणाम म्हणून त्या विद्यापीठात बरेच विद्यार्थी प्रथमवर्गात येतात. या उलट, ज्या ठिकाणी अंतर्गत मूल्यमापनाचे गुण विद्यापीठ परीक्षेच्या गुणांत मिळवीत नाहीत तेथे विद्यार्थ्यांना प्रथमवर्ग किंवा उच्च श्रेणीचा दुसरा वर्ग मिळणे अवघड जाते. विद्यापीठांना या बाबतीत स्वायत्तता देणे ही गुणवत्तेला पोषक गोष्ट नाही. खरे म्हणजे सर्व विद्यापीठांनीच परीक्षेचे स्वरूप आणि अंतर्गत मूल्यमापन यांबद्दल समान धोरण ठेवणे विद्यार्थ्यांच्या तसेच शिक्षणक्षेत्रातील गुणवत्तेच्या आणि न्यायाच्या दृष्टीने आवश्यक आहे. अंतर्गत मूल्यमापनाच्या पद्धतीचेदेखील प्रमाणीकरण केले आणि त्यात वस्तुनिष्ठता आणली तर विद्यापीठात परीक्षा आणि अंतर्गत मूल्यमापन यांत फार तफावत पडणार नाही.

अंतर्गत मूल्यमापन शैक्षणिक दृष्टया कितीही महत्त्वाचे असले तरी विद्यापीठे आणि विशेषतः सरकार याबाबतीत किती गंभीरपणे विचार करते याची शंकाच आहे. अंतर्गत मूल्यमापनासाठी मोठमोठ्या वर्गांची लहान 'टचुटोरियल' तुकडयांमध्ये विभागणी करणे, विद्यार्थ्यांकडून व्यक्तिगत लक्ष देऊन काम करून घेणे आवश्यक असते. यासाठी वर्ग उपलब्ध हवेत, ह्या कामाचा अंतर्भाव प्राध्यापकांच्या कामात व्हायला हवा. पण या सर्व गोष्टींना आर्थिक परिमाण असल्याने हे होणे शक्य नाही. आणि अंतर्गत मूल्यमापन म्हणजे केवळ अंतर्गत लहान परीक्षा एवढेच रूप त्याला येते.

'एज्युकेशन कमिशन'ने आपल्या अहवालात (१९६४-६५) उच्च शिक्षणातील परीक्षांमध्ये सुधारणा घडवून आणण्यासाठी एखादी मध्यवर्ती समिती असावी असे म्हटले होते. N. C. E. R. T. ने सर्व राज्यांतल्या माध्यमिक शिक्षणाच्या मंडळांसाठी मध्यवर्ती परीक्षा सुधार समिती स्थापून जे काम केले तसे विद्यापीठ परीक्षांसाठीदेखील आवश्यक आहे. म्हणून विद्यापीठ अनुदान मंडळाने अशी मध्यवर्ती समिती निर्माण करावी आणि देशातल्या सर्वच विद्यापीठांमध्ये परीक्षा-सुधार घडवून आणून परीक्षांचे प्रमाणीकरण करावे अशी त्यांची शिफारस होती. पण हे काही अमलात आलेले नाही. हे प्रमाणीकरण केवळ परीक्षांचे नव्हे तर, वर सांगितल्याप्रमाणे, अभ्यासक्रमाचेदेखील व्हावे. पण 'एज्युकेशन कमिशन' ला अभिप्रेत असलेला असा 'Central Source' कार्यरत होण्यासाठी केंद्र सरकारने उच्च शिक्षणाचे अधिकार आपल्याकडे घेणे आवश्यक ठरेल. अशा अधिकारा अभावी अशा समित्यांकडून येणारे अहवाल किंवा मार्गदर्शन केवळ शिफारस म्हणून येतात आणि स्वायत्ततेच्या नावाखाली त्यांच्याकडे दुर्लक्ष केले जाते.

विद्यापीठांनी अभ्यासक्रम, परीक्षा आणि प्राध्यापकांचे प्रशिक्षण या बाबतींत काही करण्याची इच्छाशक्ती किंवा क्षमता फारशी दाखविलेली नाही. उच्च शिक्षणाची गुणवत्ता या ना त्या कारणामुळे खालावत चालल्याची जाणीव या शिक्षणाशी संबंधित असलेल्या सर्व घटकांना होत आहेच. याचे एक कारण विद्यापीठे वर्षभर हजारो विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेण्यातच व्यस्त असतात. ह्या परीक्षाही एकापाठोपाठ एक (मार्च-ऑक्टोबर) अशा येत राहतात. विद्यापीठांवरचा हा ताण कमी करण्यासाठी राज्यातल्या सर्व विद्यापीठांचे मिळून एक परीक्षामंडळ निर्माण केले आणि त्या

मंडळाकडे परीक्षा घेण्याचे काम सोपविले तर विद्यापीठांना महत्त्वाच्या 'अकादमिक' कामाकडे लक्ष देता येईल. अभ्यासक्रम, मूल्यमापनासाठी नव्या पद्धती, प्राध्यापकांचे प्रशिक्षण, चर्चासत्रे यांसाठी काही योजना आखता येतील. सध्या वेगवेगळ्या विद्यापीठांमध्ये प्रश्नपत्रिका फुटण्यापासून तर उत्तरपत्रिकांचे गठ्ठे भलत्याच ठिकाणी मिळण्यापर्यंत जी अनेक प्रकरणे घडत असतात त्यांवरून विद्यापीठांपेक्षा एका त्रयस्थ मंडळाकडे परीक्षेचे काम सोपवले तर परीक्षांची विश्वासार्हता वाढेल, गुणवत्ता किंवा दर्जा समान राखला जाईल आणि 'एज्युकेशन कमिशन'ला अभिप्रेत असलेले प्रमाणीकरण आणता येईल.

महाविद्यालयीन अध्यापन आणि परीक्षा यांबद्दल ज्या काही सुधारणा सुचविल्या जातात त्या प्रत्यक्षात येण्यासाठी प्राध्यापक संघटना आणि विद्यार्थी संघटना यांचे संघटित प्रयत्न आवश्यक आहेत. विद्यापीठांमध्ये जे राजकारण आणि भ्रष्टाचार चाललेला आहे त्याच्याविरुद्ध लढण्याचे सामर्थ्य या दोन संघटनांमध्येच आहे. कदाचित गुणवत्तेच्या आणि नैतिक दृष्टिकोणाच्या आग्रहामुळे या संघटनांतच दुफळीदेखील होण्याची शक्यता आहे पण त्या भीतीने जर या संघटनांनी आपल्या कर्तव्याकडे दुर्लक्ष केले तर शिक्षणक्षेत्राची ही घसरण थांबणे शक्य नाही. सरकार आणि सरकारी नोकरशाहीचा शिक्षणाकडे पाहण्याचा संकुचित दृष्टिकोण, विद्यापीठीय मंडळांचा भ्रष्ट कारभार आणि अकार्यक्षमता यांविरुद्ध एक शक्ती उभी राहिल्याखेरीज विद्यापीठांची आणि महाविद्यालयीन शिक्षणाची गुणवत्ता वाढणार नाही. पण दुर्दैवाने सध्यातरी या संघटनांकडे याबद्दल काही ठोस कार्यक्रम आहे असे दिसत नाही. निदान विद्यापीठाच्या सेनेटमध्ये कुणी शिक्षक वा विद्यार्थी प्रतिनिधीने हे विषय उपस्थित केलेले नाहीत. अध्यापन आणि परीक्षा या दोन्ही क्षेत्रांत आपण न्यायसंस्थेकडून जे पावित्र्य आणि निरपेक्षता अपेक्षितो तीच दिसली पाहिजे. यासाठी विद्यार्थ्यांनी वर्गात अध्यापन चोख होते की नाही ते पाहिले पाहिजे. महाविद्यालयीन विद्यार्थी वयाने मोठे म्हणून त्यांच्याकडून जास्त जबाबदारीची अपेक्षा आहे. आणि प्राध्यापकांनी आपल्याकडे असलेले अध्यापन, मूल्यमापन यांचे कामदेखील तितक्याच काळजीने आणि नि.पक्षपातीपणाने पार पाडले पाहिजे. प्राध्यापकांच्या प्रशिक्षणाची सोय नसल्यामुळे इच्छा असूनदेखील प्राध्यापकांना मार्गदर्शन मिळत नाही. सध्या वेगवेगळ्या विद्यापीठांत नवीन पे-स्केलच्या निमित्ताने जे महिन्याभराचे प्रशिक्षण वर्ग सुरू केले आहेत त्यांची कालमर्यादा आणि केंद्रे वाढविली पाहिजेत. शिवाय प्रत्येक विद्यापीठात वेगवेगळ्या विभागांकडे पत्रव्यवहारातून मार्गदर्शनाची कायमस्वरूपी सोय असावी. त्यासाठी प्रत्येक विभागाला जादा प्राध्यापक आणि कर्मचारी मंजूर करावेत. अशा मागण्यांचा पाठपुरावा आता प्राध्यापक संघटनांनीच केला पाहिजे.

⊙ ⊙ ⊙








# प्राध्यापकांच्या कार्याचे स्वरूप व स्वयंमूल्यमापन

रत्नाकर हातेकर

अलीकडील काळात आपल्या देशातील महाविद्यालयीन व विद्यापीठ पातळीवर शिक्षकांच्या कामाच्या स्वरूपाविषयी उलटसुलट चर्चा बरीच झाली. ह्या चर्चेतून असे लक्षात आले की उच्च शिक्षण ही राष्ट्रिय विकासातील एक महत्त्वाची प्रविष्टी आहे याबाबतची जाणीव देशातील उच्च शिक्षणाचे नियमन करू पाहणाऱ्या यंत्रणेच्या ठायी निर्माण होऊ लागली आहे पण कदाचित त्याहून अधिक प्रमाणात ती विद्यार्थ्यांच्या पालकांच्या ठिकाणीदेखील निर्माण होत आहे. कधीकधी ह्या जाणिवेचेच रूपांतर उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात अनुभवाला येत असणाऱ्या घसरगुंडीबद्दल वाटणाऱ्या काळजीने घेतल्याचेही प्रत्ययाला येते. ह्या क्षेत्रातील अध्यापनाचा दर्जा घसरत असल्याची तक्रारही वारंवार ऐकायला मिळते; परंतु त्याचबरोबर हेही खरे आहे की महाविद्यालयीन व विद्यापीठ पातळीवर अध्यापन करणाऱ्याकडून अपेक्षा तरी कोणती आहे, कोणती असावी ह्याविषयी स्पष्टता उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील कर्त्या-धर्त्या घटकांच्या ठिकाणीदेखील नाही, मग सर्वसामान्यांची तर गोष्टच नको. ज्या ज्या वेळी "प्राध्यापकांना आठवड्याला विद्यापीठ पातळीवर केवळ ४ किंवा महाविद्यालयीन पातळीवर १८ तासांइतकेच कमी काम करावे लागते असे का ?" किंवा "प्राध्यापकांना इतक्या जास्त सुट्या का ?" अशांसारखे प्रश्न, शिक्षणमंत्र्यापासून ते शिक्षणाधिकारी व सामान्य नागरिकाकडून विचारले जातात त्या त्या वेळी अध्यापकाच्या कार्याविषयीची जाणीव स्पष्ट नसल्याचे प्रकर्षाने लक्षात येते. यासाठी हे गरजेचे आहे की प्राध्यापकाच्या कामाच्या स्वरूपाविषयी प्रथम स्पष्टता व्हावी आणि नंतर प्राध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करण्याचे दंडक त्या आधारे निर्माण व्हावेत.

अध्यापकांना त्यांचे अध्यापनाचे काम योग्य प्रकारे करता येण्यासाठी त्यांना चांगले वेतन मिळणे ही आवश्यक अट असली तरी ती पर्याप्त अट नाही. ती पर्याप्त अट आहे, त्यासाठी त्यांचा व्यावसायिक दर्जा सुधारत जाणे ही.

प्राध्यापकांच्या वेतनश्रेणीमध्ये सुधारणा करण्याची प्रक्रिया सध्या देशपातळीवर सुरू आहे. त्यामागील विद्यापीठ अनुदान आयोगाचा दृष्टिकोण असा की पूर्वीच्या वेतनपद्धतीमुळे एकदा "व्याख्याता" म्हणून नेमला गेलेला अध्यापक त्याच पदावर निवृत्त होत असे व त्यामुळे गुणवत्तावाढीच्या दृष्टीने त्याच्या सेवाकालात कोणतेही Incentive नव्हते व म्हणून प्राध्यापकासाठी त्यांच्या कार्याच्या मूल्यमापनावर आधारलेली त्रिस्तरीय वेतनश्रेणी असावी. विद्यापीठ अनुदान आयोगच उपरोक्त दृष्टिकोणाला देशातील प्राध्यापकांनी अभूतपूर्व संप करून प्रथम आपला विरोध दर्शविला, परंतु अखेर विद्यापीठ अनुदान आयोगाचाच दृष्टिकोण त्यांनी मान्य केला असल्याचे प्रत्यक्षात दिसत आहे. तेव्हा प्राध्यापकाच्या कार्याचे स्वरूप तरी काय असा प्रश्न अपरिहार्यपणे उपस्थित होतो.

दुर्दैवाने प्राध्यापकांपैकी बहुसंख्यामध्ये आपल्या व्यावसायिक जबाबदारीची जाणीव क्षीण होत असल्याची व पुढील काळात ती उत्तरोत्तर क्षीणतर होत जाईल अशी भीती वाटायला लावणाऱ्या घटनांची संख्या दिवसेंदिवस वाढते आहे. आणि त्याचबरोबर समाजमानसामधील प्राध्यापकवर्गाविषयीच्या आदराच्या भावनेलाही ओहोटी लागली आहे हे उघडच आहे. ते टाळायचे असेल तर प्राध्यापकवर्गामध्येदेखील आपल्या कामाच्या स्वरूपाविषयी स्पष्टता होत राहणे इष्ट वाटते.

पुष्कळदा असे बोलले जाते की अध्यापकाच्या कार्याचे स्वरूपच असे आहे की त्याची व्याख्याच करता येत नाही आणि त्यामुळे त्याच्या कार्याचे मूल्यमापन करणेदेखील शक्य नाही. कारखान्याच्या असेंब्ली लाईनवर काम करणाऱ्या कामगाराच्या कामाचे स्वरूप निश्चित असल्याने त्याची जशी व्याख्या करता येते,

अनुक्रमणिका

त्याला ज्याप्रमाणे कामाचे इष्टांक ठरवून देता येतात व त्याआधारे त्याच्या कामाचे यथायोग्य मूल्यमापन करता येते, तसे ते प्राध्यापकाच्या बाबतीत करणे शक्य नसते. कारण अलीकडील प्रचलित परिभाषेत सांगायचे तर मानवी साधनसंपत्तीचा विकास करणे हे अध्यापकाचे कार्य मानले गेले असल्याने आणि ते स्वभावत:च मोघम स्वरूपाचे व गूढवलयांकित असल्याने अध्यापकाच्या कामाचे मूल्यमापन सार्थपणे करताच येत नाही अशी ह्यामागील भूमिका असते.

गूढतेचे वलय बाजूला सारून विचार करता असे लक्षात येते की अध्यापकाचे कार्य हे विविधांगी आणि गुंतागुंतीचे आहे हे मात्र खरे आहे. असे असले तरीदेखील "चांगला" अध्यापक आणि "वाईट" अध्यापक ह्यांच्यातील फरक ज्यामुळे करता येईल असे काही निकष, अशा काही मूल्यमापनपद्धती जागतिक पातळीवर निर्माण करण्याचे प्रयत्न तुरळकपणे का होईना, पण झालेले आहेत. अर्थात कोणतीही मूल्यमापनपद्धती संपूर्णतः निर्दोष असल्याचा दावा करता येणार नाही हे उघडच आहे. परंतु जगातील अनेक विद्यापीठांतून अध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करण्याच्या पद्धती त्यांतील दोषांसकट ( व दुष्परिणामांसकटदेखील ) वापरल्या जात आहेत. त्यांचाही ढोबळमानाने विचार करण्याचे प्रस्तुत लेखाच्या उत्तरार्धाचे प्रयोजन आहे.

भारतीय परिस्थितीच्या संदर्भात अध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करण्याच्या काहीएक पद्धती रूढ करण्याची वेळ आता आलेली आहे. त्यासाठी इतरत्र आलेल्या अनुभवांचाही फायदा आपल्याला घेता येईल असे वाटते.

१९६३ साली रॉबिन्स कमिटीने प्राध्यापकाच्या कार्याचे विश्लेषण केले त्यानुसार ह्या कार्याची विभागणी सहा विभागांत केली गेली : (१) अध्यापन— ह्यात प्राध्यापकाला दर आठवड्याला द्यावी लागणारी व्याख्याने, प्रात्यक्षिके ह्यांच्याव्यतिरिक्त अध्यापनासाठी करावी लागणारी तयारी, विद्यार्थ्यांनी केलेल्या कामाची तपासणी, ट्युटोरियल्स, गृहपाठ, प्रोजेक्ट वर्क इत्यादी, संदर्भात करावे लागणारे काम, (२) संशोधन, (३) स्वत:साठी केलेले अध्ययन, (४) विद्यापीठ, महाविद्यालय किंवा आपापल्या विभागाशी संबंधित प्रशासकीय कामाची जबाबदारी— जसे, वेगवेगळ्या समित्यांवर केलेले काम, मुलाखती, कार्यालयीन पत्रव्यवहार इ. (५) महाविद्यालय / विद्यापीठाशी संबंधित अन्य काम : जसे विद्यार्थ्यांना त्यांच्या वैयक्तिक स्वरूपाच्या समस्यांबाबत अधिकृत रीतीने मार्गदर्शन करणे, परीक्षांशी संबंधित कामे करणे, आपल्या ज्ञानशाखेशी संबंधित विद्वत्परिषदा, संमेलने ह्यांना हजर राहणे, इ. (६) महाविद्यालयाशी संबंधित नसलेली अन्य कामे : बहि:शाल अध्यापन, इतर ठिकाणी केलेले अध्यापन (आपल्याकडील प्राध्यापकाने 'क्लास'मध्ये शिकवणे हा प्रकार येथे अभिप्रेत नसावा ! ), सल्लागार म्हणून किंवा इतर समित्यांवर केलेले काम किंवा अन्य प्रशासकीय काम.

आपल्याकडील विद्यापीठ अनुदान आयोगाने प्राध्यापकाच्या कामाची जी संकल्पना गृहीत धरली आहे ती रॉबिन्स कमिटीच्या उपरोक्त वर्गीकरणावर काहीशी आधारित असल्याचे दिसते. 'अध्यापन-संशोधन-अध्यापन' हे चक्र सतत सुरू ठेवण्याची जबाबदारी विद्यापीठांची मानली गेल्याने संशोधनकार्याचा अध्यापनात समावेश केला गेला. परंतु ह्यासोबतच प्रयोगशाळांतून संशोधित ज्ञानाचा विस्तार करण्याचे कार्यही विद्यापीठाचेच आहे. ह्या ज्ञानाचे उपयोजन झाल्याशिवाय संशोधनाची पूर्तता कशी होणार ? म्हणून समुदाय-सेवा, अभ्यासेतर उपक्रम, बहि:शाल अध्यापन इ. चा समावेश प्राध्यापकाच्या कार्यात झाला.

अशा प्रकारे संशोधन—अध्यापन व विस्तार ही प्राध्यापकाच्या कार्याची त्रिसूत्री मानली तर तिच्या सुयोग्य अंमलबजावणीसाठी प्रशासकीय यंत्रणादेखील हवीच. परंतु ही यंत्रणा निव्वळ आय. ए. एस. सारख्या सामान्य प्रशासनातील अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करून चालणार नाही; कारण विद्यापीठांच्या कारभारात मतांतर व शिस्त ह्यांचे सुंदर मिश्रण पाहावयास मिळाले पाहिजे. कारण एका अर्थाने विद्यापीठीय विश्व ही असमान घटकांची लोकशाही जीवनपद्धती असते; ज्ञान देणारे व ते घेणारे एके ठिकाणी आलेले असतात. अर्थातच प्राध्यापकांच्या कार्यामध्ये ह्या वैशिष्टयपूर्ण प्रशासकीय कामाचाही समावेश होणे अपरिहार्यच ठरते.

सारांशाने सांगावयाचे झाल्यास, अध्यापनाद्वारे (१) संचित ज्ञान नवीन पिढीपर्यंत नेणे व ते कितपत ग्रहण झाले हे पाहणे, (२) नवीन ज्ञानाची निर्मिती करणे, (३) अध्यापनाच्या क्षेत्रातील आपल्या कार्याचा लाभ उर्वरित समाजाला, विशेषतः त्यातील दुर्बल घटकाला मिळवून देणे व (४) शिक्षणसंस्थेच्या प्रशासनात

सहभागी होणे व तदनुषंगिक कामे पार पाडणे ही अध्यापकाच्या कार्याची विविध अंगे होत.

अध्यापकाने विद्यार्थ्यांना संचित ज्ञान द्यायचे हे खरे; परंतु हे ज्ञान तर सतत वर्धीष्णू असते व ज्ञानाच्या वाढीचा वेग प्रचंड असल्याने अध्यापकाने सतत अध्ययनरत असावे अशी अपेक्षा असते. त्याने केवळ त्याच्या स्वतःच्या विषयापुरतेच हे अध्ययन मर्यादित ठेवून चालत नाही; तर स्वतःसाठी निवडलेल्या ज्ञानशाखेच्या लगत असणाऱ्या अन्य ज्ञानशाखांमध्येही त्याने मुक्त विचरण ( संचार ) करावे हे अपेक्षित आहे. हे साध्य होण्यासाठी अध्यापकापाशी उच्च कोटीची बुद्धिमत्ता तर हवीच, पण भरपूर वेळही हवा. दुर्दैवाने काही अध्यापक सोपा मार्ग निवडतात व जुन्यापुराण्या टिपणांच्या आधारे विद्यार्थ्यांना वर्गात ' लिहून ' देतात. हे जसे खरे आहे तसेच प्रत्येक महाविद्यालयात व विद्यापीठात असेही काही अध्यापक असतात की त्यांच्यासाठी अध्यापन हा एक सर्जनाचा अनुभव असतो. स्वतःच्या बौद्धिक परिश्रमाचे फळ विद्यार्थ्यांच्या पदरात टाकण्याला ते उत्सुक असतात. अशा अध्यापकाच्या अध्यापनात नावीन्य असते. त्याचे प्रत्येक व्याख्यान ही एक कलाकृती असते.

अध्यापन म्हणजे अध्यापकाकडून विद्यार्थ्याकडे होणारा ज्ञानाचा एकतर्फी प्रवास व ह्या प्रवासाचे गन्तव्य म्हणजे परीक्षेत विद्यार्थ्याला मिळणारे यश असा मर्यादित व चुकीचा दृष्टिकोणही प्रचलित आहे. परंतु उच्च शिक्षणातील अध्यापनात ज्याप्रमाणे विद्यार्थ्यांच्या ज्ञानाची खोली वाढविणे, ते अद्ययावत ठेवणे हे अभिप्रेत असते, त्याचप्रमाणे त्याच्या ठिकाणी चिकित्सकवृत्ती व विश्लेषण करण्याची क्षमता निर्माण होणे, प्राप्त ज्ञान सभोवतालच्या वास्तवाशी पडताळून पाहण्याची क्षमतादेखील विद्यार्थ्यांच्या ठिकाणी निर्माण होणे हेदेखील अभिप्रेत आहे. विद्यार्थ्यांच्या ज्ञानग्रहणक्षमतेवर ज्याप्रमाणे अध्यापकाचा प्रभाव अपेक्षित आहे त्याचप्रमाणे त्याच्या ठिकाणी असणाऱ्या प्रवृत्ती, त्याचे चारित्र्य, मूल्ये व समाजाभिमुखता इत्यादींवरदेखील अध्यापकाचा प्रभाव अपेक्षित आहे. ज्या काळी ज्ञान-संचयात होणारी वाढ ही मर्यादित होती त्या काळी अध्यापनाच्या पारंपरिक पद्धती योग्य होत्या. पण ज्ञानाचा परिस्फोट होत असलेल्या वर्तमानकाळी माहिती मिळविणे व त्या माहितीवर प्रक्रिया करण्याची, अशा प्रकारे मिळालेल्या माहितीवर भाष्य करता येण्याची व विवक्षित परिस्थितीत कोणता घटक / कोणते घटक लागू पडतात व कोणते गैरलागू असतात हे ओळखण्याची क्षमता विद्यार्थ्यांच्या ठिकाणी निर्माण होणे गरजेचे आहे त्यामुळे अध्यापनतंत्रात 'ज्ञाना' पेक्षादेखील ' जाणण्या'ला, ज्ञानसमुच्चयापेक्षा ज्ञान मिळविण्याच्या प्रक्रियेला अधिक महत्त्व आले आहे. म्हणूनच शिक्षण हे शिक्षकानुगामी किंवा अध्यापनावर भर देणारे असण्याऐवजी शिष्यानुगामी किंवा अध्ययनावर भर देणारे असावे असा नवा दृष्टिकोण रूढ होऊ पाहतो आहे. आजचा विद्यार्थी ह्या ज्ञानोत्सुक असावा, त्याच्या ठिकाणी शोधक बुद्धी असावी, तो चिकित्सक असावा त्याचप्रमाणे त्याच्या ठिकाणी सर्जनवृत्ती असावी, तो ज्ञान मिळविण्यात सक्रिय असावा. ह्या दृष्टीने विचार करता अध्यापनाचे कार्य केवळ वर्गापुरते मर्यादित करून किंवा एखादी विशिष्ट अध्यापनपद्धती ( उदा., व्याख्यान ) वापरून उच्च शिक्षणाची खरीखुरी उद्दिष्टे साध्य होऊ शकत नाहीत हे लक्षात येते. म्हणून अध्यापकाने वर्गात व वर्गाबाहेरही विविध पद्धतींनी अध्यापन करावयास हवे.

विद्यार्थी–शिक्षक हे प्रमाण आपल्याकडे आदर्श म्हणावे असे नाही व त्यामुळे उच्च शिक्षणात व्याख्यानपद्धतीने अध्यापन करण्यावरच अधिक भर राहणार हे उघड आहे. सभेत श्रोत्यांपुढे ज्या पद्धतीने व्याख्याने दिली जातात त्याच पद्धतीने प्राध्यापकाने वर्गात व्याख्याने दिली तर अध्यापनाचे अगदी मर्यादित उद्दिष्ट म्हणजे प्रतिपाद्य विषय विद्यार्थ्याला समजणे– तेही साध्य होणे कठीण आहे. वर्गापुढे द्यावयाच्या चांगल्या व्याख्यानाची तयारी कुशलतेने करावी लागते व त्यासाठी कष्ट व वेळ खर्च करावा लागतो. प्रतिपाद्य विषयाला सुरुवात कशी करायची, निरनिराळ्या मुद्द्यांचे स्पष्टीकरण कसे करायचे, विद्यार्थ्यांना विषय समजला किंवा नाही हे कळण्यासाठी कोणते प्रश्न विचारायचे, विद्यार्थ्यांनी ग्रहण केलेली माहिती त्यांच्या स्मरणात राहावी म्हणून कशावर भर द्यावा लागेल, व्याख्यानाचा सारांश कसा सांगायचा, ह्याचा विचार करणे तर आवश्यक असतेच; पण प्रतिपादनातील स्पष्टतादेखील महत्त्वाची असते. चांगल्या व्याख्यानासाठी सुनिश्चित दृष्टिकोण, मुद्द्यांचे योग्य प्रकारे संघटन करणे, प्रभावी पद्धतीने मांडणी करणे व विषय विचा-

र्थ्यांना समजण्याच्या दृष्टीने फलकाचा व अन्य अध्यापन-साधनांचा वापर करणे ह्या गोष्टी आवश्यक असतात. सध्या उच्च शिक्षणात व्याख्यानपद्धतीचाच वापर सार्वत्रिक रूढ असल्याने प्रत्येक व्याख्याना-द्वारे विद्यार्थ्यांच्या ज्ञानात भर टाकत असतानाच नेमलेला अभ्यासक्रम व्यवस्थितपणे ठरावीक वेळेत पूर्ण करावयाचा असतो. त्यासाठी संपूर्ण शैक्षणिक कालावधीचा विचार करून अभ्यासक्रमाचे नियोजन करावे लागते. व्याख्यानापूर्वी विद्यार्थ्यांना विषयाचा synopsis (आराखडा) देणे व संबंधित विषयावर त्यांनी काय काय वाचावे ह्याची यादी देणे हे वर्गातील व्याख्यानाला पूरक ठरते.

अध्यापनाचे कार्य प्रभावीपणे होण्यासाठी केवळ व्याख्यानाची एकतर्फी पद्धत फारशी उपयोगाची नसते. व्याख्यानादरम्यान विद्यार्थी व अध्यापक ह्यांच्यात संवाद साधला जाणे, विद्यार्थ्यांची प्रतिक्रिया अध्यापकाला त्यांच्या वर्गातील सहभागाने कळणे आवश्यक असते. प्रतिसाद, प्रतिक्रिया, आव्हान व सुधार हे सहभागी अध्ययनातील महत्त्वाचे घटक असतात. विद्यार्थ्यांचा सहभाग मिळविण्यासाठी अध्यापकाला स्वतः काही कौशल्ये प्राप्त करावी लागतात. स्वाध्याय, गटचर्चा व परिसंवाद ह्या माध्यमांतून सहभागी अध्यापन करणे शक्य असते.

स्वाध्यायपद्धतीत शिक्षकाचे काम हे महत्त्वाचे असते. स्वाध्यायवर्गात विद्यार्थ्याला विचार करायला लावणे, आपले विचार व्यक्त करण्याची क्षमता त्याच्या ठिकाणी निर्माण करणे अभिप्रेत असते. ह्यात शिक्षकाची भूमिका विद्यार्थ्याने केलेल्या कामाची केवळ तपासणी करणे एवढ्यापुरती मर्यादित नसते; तर त्या कामाची विद्यार्थ्याशी चर्चा करणेही ह्यात अभिप्रेत असते.

गटचर्चेत शिक्षकाचे काम केवळ पंचाचे असते असा समज होऊ शकतो; परंतु त्यातही अध्यापकाची भूमिका ही अधिक सक्रिय अशी असते. चर्चेत सहभागी विद्यार्थ्यांना आपली मते मांडण्याला, इतरांच्या मतावर, स्वतःचे मतप्रदर्शन करण्याला पूर्ण वाव देत असतानाच, चर्चा ही मूळ विषयापासून दूर जाणार नाही ह्याची दक्षता अध्यापकाने घ्यावयाची असते. गटचर्चेतून विषयाची अधिक चांगली समज विद्यार्थ्यांच्या ठिकाणी निर्माण तर होतेच परंतु विचारांचे आदानप्रदान कसे करावे ह्याचे कौशल्यही त्यांच्यात निर्माण होते. परि-संवाद हा ह्याचाच अधिक विकसित असा प्रकार आहे. विद्यार्थ्यांना त्यांचे निबंध तयार करण्यात मदत करणे व त्या निबंधांवर होणाऱ्या चर्चेचे मार्गदर्शन करणे हे अध्यापकाकडून अपेक्षित असते. ह्यावरून सहभागी अध्यापनपद्धतीत अध्यापकाला किती वेळ द्यावा लागतो व किती परिश्रम करावे लागतात ह्याची कल्पना करता येईल.

विद्यार्थ्यांना प्रकल्प देऊन त्यांच्या माध्यमातून त्यांचे अध्यापन करताना प्रत्यक्ष जीवनातील समस्यांशी विद्यार्थ्यांचा संबंध येतो. त्यांचे प्रत्यक्ष रीत्या अध्ययन करून ज्ञान मिळविण्याच्या ह्या पद्धतीत अध्यापकाला खूप वेळ द्यावा लागतो व प्रकल्पाच्या प्रत्येक टप्प्यावर सर्व गोष्टींकडे काळजीपूर्वक लक्ष पुरवावे लागते. विद्यार्थ्यांना प्रकल्पासाठी आवश्यक असणारी सामग्री उपलब्ध करून द्यावी लागते. प्रकल्पाची प्रगती होत असताना वेळोवेळी ज्या अडचणी येतात त्यांचे निराकरण करणे, कार्यपद्धतीत योग्य फेरफार करणे इत्यादींबाबत अध्यापकाचे मार्गदर्शन विद्यार्थ्यांना हवे असते. प्रकल्पाचे मूल्यमापन इतर सहकाऱ्यांच्या मदतीने करताना विद्यार्थ्यांनाही त्यात सहभागी करून घेतल्याने त्यांचेही आपोआप शिक्षण होत असते. प्रकल्पपद्धतीमुळे विद्यार्थ्यांची अध्ययनातील गुंतणूक वाढते, त्यांच्या आकलनाची खोली वाढते. स्वतंत्र विचार करण्याची व काम करण्याची संधी मिळते, इतरांशी सहकार्य करण्याची वृत्ती विकसित होते, वेगवेगळ्या प्रकारच्या लोकांशी संपर्क कसा साधावा ह्याचे शिक्षण मिळत असल्याने त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण होऊ शकतो. प्रकल्प हे प्रयोगशाळेत प्रत्यक्ष कार्यक्षेत्रात, ग्रंथालयात पार पाडावयाचे किंवा गृहपाठाच्या स्वरूपाचेही असू शकतात. सामाजिक शास्त्रांतील प्रकल्प हे पुष्कळदा वेगवेगळ्या अभ्यासशाखांतील परस्परसंबंधांची प्रचीती आणून देणारे असतात. विशिष्ट स्थानिक प्रश्नांशी संबंधित असणाऱ्या प्रकल्पांमधून त्या प्रश्नांचे आकलन स्पष्ट होण्यास मदत तर होतेच; परंतु पुष्कळदा ते प्रश्न सोडविण्याला मदतही होऊ शकते. उदा., पिण्याच्या पाण्याचा प्रश्न इत्यादी. अशा प्रकारच्या प्रकल्पांद्वारे विस्तारकार्यही साधले जाऊ शकते.

उच्च शिक्षणाच्या पातळीवर विद्यार्थ्यांनी स्वयं-अध्ययनदेखील करणे आवश्यक ठरते. कारण कोणत्याही विद्याशाखेच्या बाबतीत पाहिले तर ज्ञानात प्रचंड वेगाने भर पडत असल्याने केवळ शिक्षकाने केलेल्या

अध्यापनातून हे सर्व ज्ञान विद्यार्थ्यांपर्यंत पोचणार नाही हे उघड आहे. त्यामुळे अध्यापकाने विद्यार्थ्यांना स्वतःच्या बळावर ज्ञान मिळविण्याला सक्षम केले पाहिजे. विद्यार्थ्यांच्या सामाजिक–आर्थिक परिसराचे भान ठेवून शिक्षकांनी त्यांच्यासमोर काही समस्या मांडून त्यांवर विचार करण्यास विद्यार्थ्यांना प्रवृत्त केले पाहिजे व त्या प्रश्नांचे अध्ययन पद्धतशीरपणे करण्याला त्यांना मदत केली पाहिजे. ह्यासाठी अध्यापकाला कितीतरी शक्ती व वेळ खर्च करावा लागेल. विद्यार्थ्याने प्रश्नाचा त्याच्या परीने अभ्यास केल्यावर त्याच्या प्रयत्नाचे मूल्यमापन अध्यापकाने करणे आवश्यक ठरते. विद्यार्थ्यांच्या प्रयत्नात उणिवा असतील तर त्या दूर करून त्याला योग्य मार्गदर्शन अध्यापकाने करावे; स्वयं-अध्ययनासाठी प्रोग्रॅम्ड् लर्निंग, केलर प्लॅन, संगणकाचा वापर इ. करता येतो. हे विद्यार्थ्यांकडून करवून घेण्यासाठी अध्यापकाला स्वतः त्या बाबतीत तज्ज्ञता मिळवावी लागेल. विद्यार्थ्यांच्या स्वयं-अध्ययनाचे योग्य नियोजन त्याच्याकडून करवून घ्यावे लागेल, त्यासाठी काही साहित्य वा साधने स्वतः तयार करावी लागतील.

अध्यापन करताना फळ्यापासून ते वेगवेगळ्या विद्युतीय उपकरणांपर्यंत अनेक साधनांचे साह्य अध्यापकाला घ्यावे लागेल. ह्यांची उपलब्धता हाही एक प्रश्न सध्या आहेच. परंतु जे काही साधन उपलब्ध असेल त्याचा चांगल्यात चांगला उपयोग कसा करून घ्यायचा ह्याचा विचार अध्यापकाला करावाच लागेल.

वरील सर्व गोष्टी अध्यापकाकडून योग्य प्रकारे पार पाडावयाच्या झाल्यास त्याची त्याच्या स्वतःच्या ज्ञानशाखेतील तयारी अधिक चांगल्या प्रकारे करवून घ्यावी लागेल. त्याचप्रमाणे अध्यापनाच्या त्याच्या क्षमतेत जेणेकरून वाढ होईल असे प्रशिक्षणही त्याला द्यावे लागेल. आपल्या विषयातील अद्ययावत ग्रंथ, प्रकाशने ह्यांची माहिती त्याला सतत मिळत राहिली पाहिजे. अर्थातच हे प्रशिक्षणाचे कार्य अध्यापकाच्या आयुष्यात एकदाच करून भागणार नाही; ते सतत होत राहावे लागेल तरच ते उपयुक्त ठरेल. ह्यात अध्यापकाचा अभिक्रम जसा आवश्यक आहे तसेच या बाबतीत काहीएक संस्थात्मक सोय निर्माण होणेही आवश्यक आहे. सुदैवाने त्या दृष्टीने भारतात विद्यापीठ अनुदान आयोगाचे प्रयत्न अध्यापकासाठी रिफ्रेशर्स कोर्सेस, ओरिएन्टेशन कोर्सेस, इ. सुरू करण्याच्या दिशेने होत आहेत.

अध्यापनाच्या कार्याचे जे त्रोटक वर्णन वर आलेले आहे त्यावरून उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात अपेक्षित असणारे अध्यापनकार्य हे किती आव्हानात्मक आहे व त्यासाठी अध्यापकाला किती कष्ट घेण्याची व वेळ देण्याची आवश्यकता आहे हे ध्यानात यावे.

**मूल्यमापन**

विद्यार्थ्याच्या अध्ययनाला महत्त्व देणाऱ्या अध्यापन-पद्धतीचा स्वीकार केल्यावर विद्यार्थ्याच्या मिळकतीचे मूल्यांकन योग्य प्रकारे होण्याला जास्त महत्त्व येते. सध्या उच्च शिक्षणातील परीक्षापद्धतीत जे संकट निर्माण झाले आहे त्याचे मूळ एकीकडे ब्रिटिश काळातील शासक व शास्ते ह्या संबंधावर आधारलेली शिक्षणपद्धती व दुसरीकडे स्वतंत्र राष्ट्राच्या विकासासंबंधीच्या गरजा ह्यांमध्ये असणाऱ्या अंतर्विरोधात सापडते. वासाहतिक काळातील परीक्षापद्धती ही मुख्यतः कारकून तयार करण्याच्या, कारखान्यातून बाहेर पडणाऱ्या मालावर 'दर्जा'विषयक शिक्के मारण्याच्या स्वरूपाची होती, अशी टीका अनेकांनी केली आहे. उत्पादनाशी फारसा संबंध न येता केवळ 'सेवा'-क्षेत्राची गरज भागविण्याचे उद्दिष्ट तत्कालीन शिक्षण-व्यवस्थेपुढे होते. त्यामुळे त्या अनुषंगाने निर्माण झालेली परीक्षापद्धतीदेखील एकाच साच्याची तयार झाल्यास नवल नाही. शास्तावर्गाने दिले जात असलेले ज्ञान चिकित्सा न करता जसेच्या तसे स्वीकारायचे असल्याने त्या ज्ञानाच्या मिळकतीची मोजणीदेखील एकाच ठरावीक पद्धतीने केली जात असे. त्या पद्धतीत अंतर्गत मूल्यमापनाऐवजी बाह्य मूल्यमापनाला, व विद्यार्थ्याने निबंधवजा उत्तरे लिहिण्याला महत्त्व होते. तसेच मूल्यमापन हे सतत वर्षभर न करता शैक्षणिक सत्राच्या शेवटी एकदाच केले जाई. विकसनशील स्वतंत्र लोकशाही राष्ट्राच्या शैक्षणिक गरजा ह्या मूलतः भिन्न असल्याने त्यांना अनुसरणारी मूल्यमापनाची (परीक्षा) पद्धती असावयास हवी. अशी परीक्षापद्धती ही विविधांगी, अंतर्गत मूल्यमापनावर आधारलेली, व संपूर्ण शैक्षणिक सत्रकालात सतत चालू असणारी अशी असावयास हवी. विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक मिळकतीची चाचणी ही त्याला अध्यापन करणारांकडूनच होणे इष्ट व त्या दृष्टीने अंतर्गत मूल्यमापनपद्धतीचे संचालन,

नियंत्रण हे त्या त्या अध्यापकांकडून होणेदेखील आवश्यक ठरेल. येथे परीक्षा हा अध्यापनकार्याचाच एक अविभाज्य भाग आहे, हे लक्षात घेणे महत्त्वाचे ठरते.

उपरोक्त विवेचनावरून विद्यार्थ्यांच्या ज्ञानाचे मूल्यमापन करणे ही बाब अतिशय गुंतागुंतीची असते हे लक्षात यावे. प्रचलित परीक्षापद्धती अंगवळणी पडल्याने ह्यासंबंधीची जाणीव उच्च शिक्षणातील अध्यापकांच्या ठिकाणीदेखील अभावानेच आढळते ह्यात नवल नाही. ज्ञान हे ठरीव, निरपेक्ष व आयते मिळणारे असते ह्या चुकीच्या ज्ञानविषयक संकल्पनेतूनच त्या ज्ञानाचे संक्रमण विद्यार्थ्यांत कितपत झाले ह्याचे मोजमाप करण्याची साधने आपण तयार केली. अर्थातच परीक्षांचे उद्दिष्ट हे विद्यार्थ्याच्या माहितीचे मोजमाप करणे, अभिजातता किंवा मतभिन्नतेला त्यात वाव न ठेवणे असे ओघानेच आले. आधुनिक काळाच्या गरजांशी व वास्तवाशी ही परीक्षापद्धती विसंगत असल्याचे उघडच आहे.

ज्ञान हे सतत विकसित होत जाणारे, वर्धिष्णू असते हे मान्य केल्यावर त्यानुसार अध्ययन करणाऱ्याच्या शोधक बुद्धीला वाव देणारी, भिन्न दृष्टिकोणाची व अभिजाततेची कदर करणारी परीक्षापद्धती रूढ होणे अगत्याचे ठरते. परंतु ह्या नव्या दृष्टिकोणाला अनुसरणारी पद्धती रूढ करावयाची तर त्यासाठी परीक्षेची नवी तंत्रे निर्माण करावी लागतील व त्यांचा वापर सुयोग्य पद्धतीने करावा लागेल. हे कार्य अत्यंत जिकिरीचे, कष्टाचे व वेळखाऊ असते हे मान्यच करावे लागेल.

वरील शैक्षणिक तत्त्वानुसार विद्यार्थ्यामध्ये पुढील उपलब्धीची अपेक्षा आहे– (१) ज्ञानसंचयाचा पुरेसा पाया तयार होणे. (२) मिळालेल्या ज्ञानाकडे चिकित्सक बुद्धीने पाहण्याची क्षमता. ह्यामध्ये ज्ञानातील अंतर्गत विसंगती पाहण्याची क्षमता, त्याचप्रमाणे बदलत्या परिस्थितीच्या संदर्भात त्यात आढळून येणारी विसंगती ही दोन्ही ओळखता आली पाहिजेत हे अभिप्रेत आहे. (३) परस्परनिगडित घटिते ओळखता येणे, त्यांचे स्पष्टीकरण करता येणे त्याचप्रमाणे त्यांच्याविषयी अनुमान वर्तविता येण्याची क्षमता निर्माण होणे.

वरीलपैकी पहिल्या उपलब्धीची चाचणी योग्य कूटप्रश्न (quiz), बहुपर्यायी प्रश्न, खरे / खोटे ह्या स्वरूपाचे प्रश्न, विधानातील चुका शोधून काढणे, अशा स्वरूपाच्या प्रश्नांद्वारे करता येते. विद्यार्थ्यांच्या ज्ञानाचा पाया कितपत तयार झालेला आहे याची कल्पना त्यावरून करता येते. परंतु असे प्रश्न तयार करण्यामध्ये परीक्षकाच्या क्षमतेचीच कसोटी लागते. म्हणून त्यातून मार्ग काढण्यासाठी तथाकथित 'वस्तुनिष्ठ' प्रश्न दिले जातात. परंतु त्याद्वारे अपेक्षित चाचणी होत नाही. त्याऐवजी लघुत्तरी प्रश्नांद्वारे विद्यार्थ्यांची विविध घटक वेगवेगळे ओळखण्याची क्षमता, संबंधांचे ज्ञान व भाष्य करण्याची कुवत ह्यांची परीक्षा होते. लघुत्तरी प्रश्न कितीही काळजीपूर्वक काढले तरी त्यांतून फार गुंतागुत असणाऱ्या संबंधाविषयीचे ज्ञान विद्यार्थ्याला कितपत झाले ह्याचा शोध घेता येत नाही. साध्या संबंधांच्या बाबतीतच ही प्रश्नपद्धती उपयुक्त ठरू शकते. ही ह्या पद्धतीची मर्यादा म्हणता येईल. त्यासाठी पूर्वापार चालत आलेली लघुनिबंधवजा किंवा दीर्घनिबंधवजा उत्तराची अपेक्षा करणारे प्रश्न जोडीला असणे आवश्यक आहे. अर्थात, ह्या ठिकाणी निबंधवजा उत्तराची अपेक्षा करताना त्याचा मर्यादित उद्देशही ध्यानात बाळगला पाहिजे.

विद्यार्थ्यांमधील चिकित्सक वृत्तीबाबतच्या मिळकतीचे मूल्यमापन करणे हे अत्यंत अवघड काम आहे. त्यासाठी विद्यार्थ्यांना वाचायला लावून त्यावरील त्यांच्या प्रतिक्रिया व्यक्त करायला लावणे, चर्चासत्रातून त्यांचा प्रतिसाद अजमावणे हे व्हावयास हवे. घटिताचे केवळ वर्णन करता येणे व त्याचे विश्लेषण करता येणे ह्या वेगवेगळ्या गोष्टी असतात. ह्याचे ज्ञान विद्यार्थ्याला करून देणे ही त्यातल्या त्यात कठीण वाटावी अशी बाब आहे. ह्या दृष्टीने विद्यार्थ्यांना प्रत्येक सत्रात टर्म-पेपर तयार करायला लावणे व त्याची तपासणी काळजीपूर्वक करणे हाही एक उपयुक्त प्रयोग आहे.

परीक्षेचे काम म्हणजे परीक्षार्थिवर केलेले पर्यवेक्षण, विद्यापीठाच्या परीक्षांचे पेपर्सचे गठ्ठे तपासून पाठविणे व गुणपत्रिका तयार करणे इ. अशी ज्यांची कल्पना असते, त्यांना खरेखुरे मूल्यमापन म्हणजे काय व त्यासाठी प्राध्यापकाला किती वेळ द्यावा लागेल ह्याची जाणीव असणारच नाही.

## संशोधन

उच्च शिक्षणात संशोधनाचा समावेश होतोच. दुय्यम पातळीवरच्या शिक्षणाच्या तुलनेत उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात अध्यापकाकडून संशोधनाचीही अपेक्षा

ठेवली जाते; कारण ज्ञानाची निर्मिती ही तेथेच होते असे मानले जाते. दररोज नवनवी पुस्तके निरनिराळ्या विषयांवर मोठ्या संख्येने प्रकाशित होत आहेत. बौद्धिक क्षेत्रात देशाला स्वाश्रयी बनविण्यासाठी संशोधनाचे महत्त्व वादातीतच आहे. अलीकडे महाविद्यालयीन अध्यापकांमध्ये आपल्या व्यवसायाच्या आरंभीच M. Phil. किंवा Ph. D. साठी नाव नोंदविण्याची प्रवृत्ती वाढत असल्याचे दिसते. परंतु काही विषयांच्या बाबतीत मार्गदर्शक उपलब्ध नसणे ही अडचण असते. Ph. D. मिळाल्यानंतरदेखील अनेक प्राध्यापक U. G. C. किंवा प्राध्यापकांच्या संशोधनाला उत्तेजन देणाऱ्या I. C. S. S. R. सारख्या संस्थांच्या साह्याने संशोधनाचे प्रकल्प घेताहेत. तथापि महाविद्यालयामध्ये काम करणाऱ्या अध्यापकाच्या तुलनेने विद्यापीठात काम करणाऱ्या अध्यापकांना संशोधनाला अनुकूल परिस्थिती व वेळेची उपलब्धता अधिक असते, असे सर्वसाधारणपणे दिसून येते. अध्यापन व संशोधन हे एकमेकांना पूरक ठरण्याऐवजी त्यांच्यात विरोध असल्याचा पुरावा अनेक ठिकाणी आढळलेला आहे. एस. बी. हिरेमठ ह्यांनी ऑस्ट्रेलियातील प्राध्यापकांच्या कार्याचा अभ्यास केल्यानंतर असा विरोधी संबंध त्यांना आढळून आला.[१] डोनल्ड लाईट ह्यांनी अमेरिकन प्राध्यापकांविषयी केलेल्या संशोधनातूनही हाच निष्कर्ष निघाला.[२] प्राध्यापकांच्या कामाचे मूल्यमापन करताना त्याने केलेल्या संशोधनापैकी प्रसिद्ध झालेल्या संशोधनाचाच विचार केला जातो; परंतु तसे करणे सयुक्तिक नसल्याचे मत अमेरिकन शिक्षणतज्ज्ञ ट्रो व फुल्टन ह्यांनी व्यक्त केले आहे.[३] विद्यापीठातून करण्यात येणाऱ्या संशोधनकार्याचे आणखी एक वैशिष्टय असे की हे संशोधन समाजाच्या खऱ्याखुऱ्या गरजांशी संबंधित असू शकेल कारण प्रायोजित संशोधनावर ज्याप्रमाणे त्यांना वित्त-साहाय्य करणाऱ्या कंपन्यांच्या गरजांना अनुसरून संशोधन करण्याची सक्ती असते तशी ती विद्यापीठीय संशोधनावर आपल्याकडे फारशी आढळत नाही.

## विस्तारकार्य व समाजसेवा

दुर्दैवाने आपल्या शिक्षणपद्धतीत श्रम करणे व अध्ययन करणे ह्यांची फारकत झाल्याने विद्यादानाची केंद्रेही समाजापासून अलग पडली. उच्च शिक्षण हे उच्चभ्रू वर्गासाठीच आहे असा समज त्यामुळे रूढ झाला. विस्तारकार्य हे विद्यापीठाच्या किंवा महाविद्यालयाच्या कार्याचेच एक आवश्यक अंग आहे ही गोष्ट पूर्वी आपल्या लक्षातच आलेली नव्हती, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. आधुनिक शैक्षणिक सिद्धान्तामध्ये शिक्षणाचा सामाजिक संदर्भ विचारात घेतला जातो. ज्ञानप्राप्तीचे प्रयोजन बदलत चालल्यानेदेखील शिक्षण हे समाजाच्या गरजांचा, आशा-आकांक्षांचा संदर्भ असणारे असे होऊ पाहात आहे. वर्गाच्या खोलीबाहेर पडून बाहेरच्या समाजात शिक्षणाचा विस्तार होणे ही आता काळाची गरज बनलेली आहे, असे म्हणण्यात अतिशयोक्ती नाही.

नव्या शैक्षणिक धोरणानुसार राष्ट्रीय विकास व सामाजिक परिवर्तनाच्या दृष्टीने उच्च शिक्षणाचे महत्त्व अनन्यसाधारण मानले गेले आहे; त्यामुळे अध्यापकाच्या कार्याचा एक महत्त्वाचा भाग म्हणून ह्या विस्तारकार्याकडे बघितले जाऊ लागले आहे. विद्यापीठात साचू पाहणाऱ्या ज्ञानाचा लाभ उर्वरित समाजाला त्याचे प्रश्न सोडविण्याच्या कामी होणे हे या अविकसित राष्ट्रांच्या दृष्टीने अत्यंत गरजेचे आहे असे म्हणावेसे वाटते.

उच्च शिक्षणावर होणारा खर्च हा इतर शिक्षणावर होणाऱ्या खर्चापेक्षा खूपच जास्त असल्याचे चित्र दिसते. समाज उच्च शिक्षणावर आपल्या मर्यादित साधनांतून इतक्या अधिक प्रमाणात व्यय करावयास तयार झाला असेल तर उच्च शिक्षणक्षेत्रानेदेखील सामाजिक गरजांचे भान ठेवून कार्यरत असणे हे न्यायसंगत ठरते. शिवाय विशेषत्वाने अध्ययनरत असणारा विद्यापीठीय समाज व उर्वरित व्यापक समाज ह्यांच्यातील परस्परदेवाणघेवाण ही परस्परांना उपकारकच ठरणारी आहे, हे सहज लक्षात येऊ शकते. ह्या दृष्टीने विचार केला तर विस्तारकार्य हे अध्यापकाच्या कार्याचा एक ऐच्छिक भाग नसून तो आवश्यक व पूरक भाग आहे असे म्हणावे लागते.

विस्तारकार्य अनेक प्रकारे केले जात आहे. राष्ट्रीय सेवा योजना (एन. एस. एस.), राष्ट्रीय प्रौढ शिक्षण कार्यक्रम, वनीकरण, अवर्षण व पूर अशांसारख्या आपत्तींच्यावेळी केलेले मदतकार्य हा एक प्रकार झाला. ह्यात अध्यापक व विद्यार्थी हे जसे समाजाच्या उपयोगी पडत असतात तसेच समाजाकडून अनुभवाद्वारे शिकत असतात. एका विद्यापीठाच्या भूगर्भशास्त्र विभागाने

शेतकऱ्यांनी अभिक्रमाने स्वबळावर बांधायला घेतलेल्या धरणाच्या कामी तांत्रिक मदत दिली व त्याच विद्यापीठातील विद्यार्थ्यांनी व संलग्न महाविद्यालयातील विद्यार्थ्यांनी धरणाच्या कामावर प्रत्यक्ष श्रमदान केल्याचे उदाहरण ताजे आहे. कृषी विद्यापीठातील अध्यापकांना तर विस्तारकार्यात अधिक गुंतून घ्यावे लागते. एका नगरपालिकेच्या पाणीपुरवठ्याच्या प्रश्नाचा सखोल अभ्यास करून, ह्या प्रश्नावर सार्वजनिक व्याख्याने देऊन एका अध्यापकाने लोकांमध्ये जागृती निर्माण केल्याचे उदाहरण वानगीदाखल सांगता येईल. परंतु येथे असे सुचवावेसे वाटते की निरनिराळ्या ठिकाणी वेगवेगळ्या प्रश्नांच्या संदर्भात केल्या जाणाऱ्या विस्तारकार्यक्रमामध्ये ताळमेळ राहण्याच्या दृष्टीने एखादी मध्यवर्ती संस्था अस्तित्वात असणे आवश्यक आहे.

विस्तारकार्याचे एक अंग महाविद्यालये व माध्यमिक शाळा ह्यांच्यातील परस्परसंबंधाचे आहे. माध्यमिक विद्यालयातून बाहेर पडणारा विद्यार्थी हा पुढे महाविद्यालयात प्रवेश घेतो. ह्या विद्यार्थ्याची तयारी माध्यमिक पातळीवर पुरेशी न झाल्याने उच्च शिक्षणात ज्ञान ग्रहण करताना त्याच्यापुढे अडचणी निर्माण होतात. ह्यासाठी महाविद्यालयातील अध्यापकांनी माध्यमिक अध्यापकांकरिता अध्यापन-सुधार कार्यक्रम हाती घ्यावयास हवे. अशा प्रकारच्या कार्यक्रमांतून, प्रशिक्षणातून माध्यमिक पातळीवरील अध्यापनकार्याचा दर्जा सुधारल्यास त्याचा लाभ महाविद्यालयांना होईल हे उघडच आहे. परंतु असे विस्तारकार्य एवढ्यापुरतेच मर्यादित न ठेवता माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तके तयार करण्याचे कार्यही प्राध्यापकांना करता येते व अनेक प्राध्यापक ते करतात. विकसनशील देशांतील उच्च शिक्षणसंस्था ह्या संपूर्ण शिक्षणव्यवस्थेच्या मज्जासंस्थेचे कार्य पार पाडू शकतात.

अभियांत्रिकी व व्यवस्थापनशास्त्राचे अध्यापन करणाऱ्या अध्यापकांना व्यापार व उद्योगक्षेत्राला सल्ला देण्याचे कार्यही विस्तारकार्याचा एक भाग म्हणून करता येते. छोट्या व्यापाऱ्यांना, उद्योगांना किंवा सार्वजनिक संस्थांना प्राध्यापक व्यक्तिगत पातळीवर किंवा सामूहिक रीतीने सल्ला देण्याचे काम करू लागले तर ते त्यांच्या दृष्टीने हिताचे ठरू शकते.

विस्तारकार्यक्रमाची व्याप्ती विचारात घेता हे काम करणे हे किती जिकिरीचे व वेळखाऊ असते ह्याची कल्पना करता येईल. अध्यापन व संशोधन ह्यांच्याइतकेच ह्या कार्यातदेखील प्राध्यापकाच्या निष्ठापूर्वक केलेल्या प्रयत्नांची कसोटी लागते. अध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करताना ह्या कार्याकडे दुर्लक्ष होते ही दुर्दैवाने वस्तुस्थिती आहे. मूल्यमापनात विस्तारकार्याला योग्य भारमूल्य दिल्याखेरीज प्राध्यापकांना ह्या कार्यात स्वतःला गुंतवून घ्यावेसे वाटणार नाही व राष्ट्रीय विकासाला शिक्षकांचा जो हातभार लागायला पाहिजे तो लागणार नाही अशी रास्त भीती वाटते.

## शिक्षणव्यवस्थेचे व्यवस्थापन

प्राध्यापकाचे उपरोल्लेखित कार्य हे ज्या विद्यापीठीय अथवा महाविद्यालयीन परिसरात पार पडते तो परिसर हा बहुतलीय व वैशिष्टयपूर्ण असा असतो. ह्या परिसरात एकीकडे शिस्त व मतांतर ह्यांचा तोल ज्याप्रमाणे सांभाळावा लागतो, त्याचप्रमाणे दुसरीकडे स्वायत्तता व जबाबदारी ह्यांच्यातही समतोल साधावा लागतो. त्यामुळे आदर्श शिक्षणसंस्था ही एकूण सामाजिक पर्यावरणाशी जैविक संबंध राखून, स्वयं-अनुशासन करत असताना स्वतःत योग्य ते फेरबदल करत करत मार्गक्रमण करीत असते. स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळी विद्यापीठांच्या / महाविद्यालयांच्या प्रशासनाची जी शैली आपल्याला लाभलेली होती, ती ह्या दृष्टीने अपुरी पडत असल्याचे स्पष्टच आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळात विद्यापीठाबाबत झालेले कायदे, अध्यादेश व विद्यापीठाच्या कारभाराचे पडलेले पायंडे इत्यादींमध्ये आपल्या बदलत्या समाजातील ताणतणावांचे, संघर्षांचे पडसाद उमटले असल्यास नवल नाही. आपल्या वासाहतिक वारशाची छायादेखील आपल्या विद्यापीठीय व्यवस्थेवर पडलेली आहे. ह्यातून बाहेर पडण्याच्या दृष्टीने प्रयत्न झाले नाहीत असे नाही. पण त्यांचे यश मर्यादितच राहिले.

उच्च शिक्षणाच्या व्यवस्थापनात स्वातंत्र्योत्तर काळात अधोरेखित झालेला अंतर्विरोध म्हणजे उच्च शिक्षणसंस्थांची स्वायत्तता व त्यांची जबाबदारी ह्यांच्यातील होय. केवळ स्वायत्ततेवर भर दिल्याने नैतिक जबाबदारीच्या जाणिवेचा अभाव दिसू लागण्याची परिस्थिती निर्माण होते व जबाबदारीचा आग्रह धरला तर जाचक अशा कायदे-कानूंच्या माध्यमातून जबाब-

दारीची जाणीव निर्माण करण्याच्या अट्टहासापायी विद्यापीठांची स्वायत्तता संपुष्टात येऊन शिक्षण हा शासनाचा एक विभाग असे त्याला स्वरूप प्राप्त होते. अध्यापकांना त्यांच्या शैक्षणिक अथवा राजकीय विचारांचे मूल्य वृत्तिछेदाच्या रूपाने द्यावे लागले अशा घटनांची संख्या कमी नाही. स्वायत्तता व जबाबदारी ह्यांची गुंफण ज्या पद्धतीने व्हावयास हवी त्या पद्धतीने ती झाल्याचे दिसत नाही. प्राध्यापक हा त्याच्या विभागाच्या संदर्भात स्वायत्त व जबाबदार असावा, तो तो विभाग महाविद्यालयाच्या संदर्भात स्वायत्त व जबाबदार असावा, महाविद्यालय हे विद्यापीठाच्या संदर्भात स्वायत्त व जबाबदार असावे व विद्यापीठ हे समाज व शासनाला त्याच पद्धतीने स्वायत्त व जबाबदार असावे. अशा प्रकारे स्वायत्तता व जबाबदारीची उतरंड निर्माण व्हावयास हवी होती. परंतु प्राध्यापकाच्या कामाच्या तासांबाबत ठरणारे निर्णय हे विद्यापीठाने घेण्याऐवजी सरळ शासन घेते व ते प्राध्यापकांवर लादते ही स्वायत्तता व जबाबदारीच्या तत्त्वाची उघड पायमल्ली ठरत नाही काय ?

प्राध्यापकाच्या अध्यापनकार्यात त्याचे विचारस्वातंत्र्य व अध्यापनातील शिस्त ह्या दोन्हींचा सुरेख संगम पाहावयास मिळावा. तरच ते कार्य सजीव व फलदायी ठरेल हे उघड आहे. त्यामुळे कारखान्याचे किंवा सरकारी कार्यालयाचे व्यवस्थापन ज्या नोकरशाही पद्धतीने केले जाते त्या पद्धतीने विद्यापीठांचे किंवा महाविद्यालयांचे होता उपयोगाचे नाही. तेव्हा, विद्यापीठाच्या व महाविद्यालयाच्या वैशिष्टचपूर्ण व्यवस्थापनाचा मुख्य भार हा अध्यापनकार्य करणारांवरच यावा हे तर्कानेच येते. अध्यापकांपैकी काहींना कुलगुरू, निर्देशक, रेक्टर किंवा प्राचार्य अशांसारख्या प्रशासकीय कामाची जबाबदारी आयुष्यात काही काळ स्वीकारावी लागते. अर्थात ही कामे त्यांना पूर्णवेळ करावी लागतात. परंतु इतर काही प्रकारची कामे उदा., विद्यापीठातील विद्याशाखेचे प्रमुखपद, किंवा अभ्यासमंडळाचे अध्यक्षपद, महाविद्यालयातील व विद्यापीठातील विभागप्रमुखपद ही अर्धवेळ म्हणता येतील अशा स्वरूपाची कामे असतात व प्राध्यापकांपैकी बऱ्याच जणांना ती आपल्या नेहमीच्या अध्यापनकार्याव्यतिरिक्त करावी लागतात. कॉलेज व विद्यापीठपातळीवर अनेक मंडळे, समित्या वेगवेगळ्या कामांसाठी असतात. त्यांवर प्राध्यापकांना प्रशासकीय काम करावे लागते. प्रत्येक महाविद्यालयात अशा समित्या व मंडळांची संख्या बरीच मोठी असते. ह्या कामासाठीदेखील प्राध्यापकाचा बराच वेळ खर्च होत असतो हे फारसे कोणी विचारात घेत नाही असे दिसते. ग्रामीण भागातील महाविद्यालयामध्ये तर प्राध्यापकाला बऱ्याच वेळा विद्यार्थ्यांच्या पालकांची जबाबदारी पार पाडावी लागते, त्याला त्यांच्या शैक्षणिक व इतर स्वरूपाच्या अडचणींमध्ये मार्गदर्शन करावे लागते. कारण बहुतेक विद्यार्थी हे त्यांच्या कुटुंबात प्रथमच उच्च शिक्षण घेणारे असतात व त्यांना घरून मार्गदर्शन मिळू शकत नाही.

काही निवडक प्राध्यापक राष्ट्रीय किंवा राज्यपातळीवरील अनेक समित्यांवर कामे करतात, त्याशिवाय प्रत्येक विषयाच्या वार्षिक परिषदा असतात. त्यांना प्राध्यापकांनी उपस्थित राहावे व त्यांच्या कामात योगदान करावे अशी अपेक्षा असते. अलीकडे प्राध्यापकांच्या संघटना निर्माण झाल्या असून त्यांच्या कार्यातही विविधता येत आहे. प्राध्यापकांना ह्या संघटनांच्या कामासाठीदेखील वेळ द्यावा लागतो. अशा प्रकारच्या प्राध्यापकांच्या संघटनांच्या इष्टानिष्टतेबद्दल एके काळी चर्चा होत असे; परंतु आता शासन व विद्यापीठ अनुदान आयोगासारख्या संस्थांनीदेखील अशा संघटनांवर मान्यतेचे शिक्कामोर्तब उठविलेले आहे.

प्राध्यापकाच्या कार्याचे वर वर्णन केलेले विविधांगी स्वरूप पाहिल्यावर प्रत्येक प्राध्यापक हे सर्व कार्य पार पाडतो व त्याला ते पार पाडण्यासाठी सवड मिळते असे म्हणता येत नाही. वरील कार्यांपैकी कोणते कार्य विवक्षित प्राध्यापक करील हे अनेक गोष्टींवर अवलंबून असते. ह्यात प्राध्यापकांची स्वतःची आवडही महत्त्वाची ठरते. महाविद्यालयात कोणत्या पातळीपर्यंत अध्यापन केले जाते ह्यावरदेखील अध्यापकांमधील संशोधनकार्य अवलंबून असते. पदव्युत्तर पातळीवर अध्यापन करणाऱ्या संस्थांमधून संशोधनकार्य अधिक प्रमाणात व्हावे हे स्वाभाविक असते. त्यामुळे सर्वच स्तरांवर अध्यापन करणाऱ्या प्राध्यापकाकडून संशोधनाची सारखीच अपेक्षा ठेवणे कितपत योग्य आहे असा प्रश्न निर्माण होतो. महाविद्यालयातील अभ्यासेतर कार्यक्रमामध्ये ज्येष्ठ अध्यापकांपेक्षा तरुण अध्यापकांचा उत्साह अधिक दिसतो हेही स्वाभाविक म्हणावे लागेल.... ज्येष्ठ अध्यापकांना वेगवेगळ्या समित्यांवर

काम करण्याची संधी अधिक प्रमाणात मिळते. हेही खरे आहे.

प्रत्येक अध्यापक आपल्या अनुभवाने व कुवती-नुसार आपल्या कार्यात वरील गोष्टींचा कमीअधिक प्रमाणात समावेश करीत असतो; प्राध्यापकाच्या कामावर तो ज्या संस्थेत व वातावरणात काम करतो त्याचाही परिणाम होत असतो; हे वातावरण सर्वत्र सारखे असत नाही. ह्याचा विचार प्राध्यापकाच्या कामाचे मूल्यमापन करताना व्हावयास नको काय ?

– २ –

## उच्च शिक्षणातील अध्यापनाचे मूल्यमापन

प्रत्येक अध्यापक स्वतःच्या अध्यापनाचे मूल्यमापन स्वतःच या ना त्या प्रकारे करीतच असतो; पण ते बहुशः अनौपचारिक स्वरूपाचे असते व पद्धतशीरपणे केलेले नसते. औपचारिक रीतीने प्राध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करण्याच्या रूढ पद्धती दोनच : एक म्हणजे विद्यार्थ्यांनी केलेले मूल्यमापन व दुसरी म्हणजे त्याच्या विषयात विद्यार्थ्यांनी परीक्षेत मिळविलेले यश.

अलीकडे विद्यापीठ अनुदान आयोगाने प्राध्या-पकासाठी स्वयंमूल्यमापनाची पद्धती रूढ करण्याचे ठर-विले आहे. परंतु ह्या पद्धतीविषयी अजूनही बहुसंख्य प्राध्यापकांमध्ये योग्य जाणीव अभावानेच आढळते. ह्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे आजवर केवळ रूढ पद्ध-तीचा वापर करूनच मूल्यमापन करण्यावर सर्वत्र भर दिला जात होता हे के. ओ. एल्ब[४] आणि आर. आय. मिल्लर[५] ह्यांनी केलेल्या पाहण्यांवरून दिसून येते. ह्या-उलट, प्राध्यापकाने स्वयंमूल्यमापन करणे किंवा त्याच्या सहकाऱ्यांनी त्याच्या कामाचे मूल्यमापन करणे ही पद्धती फारशी कुठेच रूढ नसल्याचे दिसते.

ख्रिस्तोफर ओर्पेन, क्रॉनबाक्[६] कुलीक व मॅक्केची[७] इ. शिक्षणशास्त्रज्ञांनी प्राध्यापकांच्या स्वयंमूल्यमापनाचे हेतूनुसार दोन प्रकार कल्पिले आहेत. पहिला प्रकार लाभप्रेरित स्वयंमूल्यमापनाचा. हा प्राध्यापकाची पदोन्नती, त्याचे वेतन ह्यांच्याशी संबंधित असतो. अशा मूल्यमापनाशी प्राध्यापकाची अर्थार्जनक्षमता निगडित झाल्याने प्राध्यापक स्वयंमूल्यमापन अवास्तव करण्याची भीती असते. स्वयंमूल्यमापनाचा दुसरा प्रकार विकास-प्रेरित मूल्यमापनाचा म्हणता येईल. ह्या प्रकारच्या मूल्यमापनाचा हेतू प्राध्यापकाच्या अध्यापनात सुधारणा करण्यास कोणता वाव आहे ह्याचा शोध घेण्याचा असतो. अर्थार्जनाशी त्याचा संबंध नसल्याने प्राध्या-पकाकडून मानसिक दडपणाशिवाय प्रामाणिकपणे स्वयं-मूल्यमापन होण्याची शक्यता अधिक असते.



### लाभप्रेरित स्वयंमूल्यमापन

अनेक विद्यापीठांत, विशेषतः अमेरिकन विद्या-पीठांत प्राध्यापकाच्या कामाचे मूल्यमापन करताना स्वयंमूल्यमापनाचा समावेश, विद्यार्थ्यांनी केलेल्या व वरिष्ठांनी केलेल्या मूल्यमापनासोबतच केला जातो. प्राध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करताना त्याने स्वतःच्या कार्याचे केलेले मूल्यमापनदेखील विचारात घ्यावे असा आग्रह अमेरिकन असोसिएशन ऑफ युनिव्हर्सिटी प्रोफेसर्सने १९७४ साली धरला व त्याला अनुसरून तेथील प्राध्यापकांना स्वयंमूल्यमापनाची संधी दिली जाते.

लाभप्रेरित स्वयंमूल्यमापनातील उपरोल्लिखित दोष लक्षात घेता प्राध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन करताना केवळ ह्या एकाच पद्धतीवर अवलंबून राहता येत नाही हे स्पष्टच आहे. कारण अशा प्रकारच्या स्वयंमूल्यमापनात अनुकूल बाबी अतिशयोक्तीने सांगणे व प्रतिकूल बाबी कमी करून सांगणे हा प्रकार घडतो असे डॉयल व क्रिटन ह्या संशोधकांना आढळून आले.[८]

लाभप्रेरित स्वयंमूल्यमापनात संबंधित अध्यापक हा ते मूल्यमापन काटेकोरपणे करू शकेल व तसे ते करण्याची त्याची इच्छा आहे, इतकेच नव्हे तर त्याच्या भवितव्याबाबतचे महत्त्वाचे निर्णय ह्या मूल्यमापनाने प्रभावित होणे त्याला मान्य आहे हे गृहीत धरावे लागते. अशा प्रकारचे मूल्यमापन करण्यासाठी जो प्रमाणित फॉर्म भरावा लागेल त्यात अध्यापकाने स्वतः अथवा त्याच्या विभागप्रमुखांच्या साह्याने अध्यापनाची जी उद्दिष्टे ठरविलेली असतील त्यांची पूर्तता किती झाली हे सांगता येण्याची सोय केलेली असावी. ह्या फॉर्मची रचनाच अशी असावी की, ज्यावरून अध्यापकाच्या वर्गातील अध्यापनाव्यतिरिक्त त्याचे संशोधन, विद्या-र्थ्यांना केलेले मार्गदर्शन, केलेली सामाजिक सेवा, त्याची परिषदांमधील उपस्थिती, त्याने केलेले प्रशास-कीय काम इ. बाबींबाबतचे स्वयंमूल्यमापन त्याला शक्य व्हावे. अर्थातच वरील सर्व कामे ही आपल्या अध्यापन-विषयक कर्तव्याचाच अविभाज्य भाग असल्याचे त्या अध्यापकाला मनापासून मान्य आहे हे गृहीत धरले जाते.

अनुक्रमणिका






लाभप्रेरित स्वयंमूल्यमापनाच्या जोडीला सहकाऱ्यांकडून अध्यापकाच्या कार्याचे होणारे मूल्यमापनदेखील विचारात घेता येते; परंतु हे करण्याची सहकारी अध्यापकांची तयारी असायला हवी व त्यांच्या ठिकाणी तसे करण्याची क्षमताही असावयास हवी— नपेक्षा अध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन अन्यायकारक ठरू शकते. ब्लॅकबर्ग व क्लार्क ह्या संशोधकांना असे आढळून आले की अध्यापकाच्या विविधांगी कार्याचे यथायोग्य मूल्यमापन त्याच्या सहकारी अध्यापकांना अथवा वरिष्ठांना काटेकोरपणे व सर्वच कामांबाबत करता येत नाही.[९]

वास्तविकपणे एकाच विषयाचे अध्यापन करणारे अध्यापक असतील तर ते अभ्यासक्रम पार पाडण्याबाबत अध्यापकाने केलेल्या नियोजनांचे तसेच त्याने त्यासाठी वापरलेल्या अध्यापनसाधनाचे मूल्यमापन अधिक चांगल्या प्रकारे करू शकतात. एरव्ही सामान्यपणे असे अध्यापक एकमेकांशी अभ्यासक्रमाच्या पूर्ततेत येणाऱ्या अडचणींबाबत, विद्यार्थ्यांच्या प्रतिसादाबाबत अनौपचारिक पद्धतीने बोलत असतातच. त्याचाच आधार घेऊन वरिष्ठ अध्यापक अशी पद्धती वापरात आणू शकतात की ज्यामुळे अध्यापक एकमेकांच्या अध्यापनाचे निरीक्षण शक्य तितक्या वस्तुनिष्ठपणे केले जाऊ शकेल. अशी पद्धती यशस्वी होण्यासाठी अध्यापकांमधील परस्परसंबंधात मोकळेपणा तर हवाच परंतु त्यांच्यात परस्परविश्वासाचे वातावरणही हवे. शिवाय इतर सहकाऱ्यांकडून होणारे मूल्यमापन हे आपल्या अध्यापनकार्यात सुधारणा होण्याच्या उद्देशाने केले जात आहे, त्यात अध्यापनातील आपले 'दोष' हुडकून काढून त्यांबद्दल आपल्याला 'शिक्षा' करण्याचा हेतू नाही अशी संबंधित अध्यापकाची खात्री पटली पाहिजे. अशा प्रकारचे वातावरण निर्माण करण्याची जबाबदारी ही मुख्यत: विभागप्रमुखाची मानली पाहिजे.

अध्यापकांनी परस्परांचे मूल्यमापन करण्यासाठी उपरोक्त पद्धती कशी राबविता येईल ह्याचा विचार ओर्प्रेन ह्या ऑस्ट्रेलियन शिक्षणतज्ज्ञाने केलेला असून त्याबाबत काही सूचनावजा मार्गदर्शन केले आहे.[१०]

सहकाऱ्यांकडून अध्यापकाचे मूल्यमापन करण्यासाठी प्रथम एक लहान समिती गठित करावी. ह्या समितीला अध्यापकाने अध्यापनासाठी तो वापरत असलेली साधने उदा., वाचन-साहित्याची यादी, दिलेले गृहपाठ, व त्याने वेळोवेळी विद्यार्थ्यांच्या ज्ञानाची चाचणी घेण्यासाठी वापरलेल्या पद्धती इत्यादी माहिती तपशीलवार द्यावी. त्यानंतर समितीने संबंधित अध्यापकाची मुलाखत घेऊन त्याला अध्यापनात कोणती उद्दिष्टे अभिप्रेत होती, ह्याविषयी स्पष्टता करून घ्यावी. तसे करणे शक्य नसल्यास समितीने आपल्या विचाराने ही उद्दिष्टे कोणती असावीत हे निश्चित करावे. एवढे झाल्यावर सहअध्यापक दोन प्रकारे मूल्यमापनात भाग घेऊ शकतात.

पहिला प्रकार : अध्यापकाने ठरविलेल्या उद्दिष्टांबाबत प्रत्येकाने आपले वैयक्तिक मत नोंदणे. उद्दिष्टे ही बौद्धिक दृष्टया समर्थनीय आहेत काय ? विद्यार्थ्यांच्या गरजा व त्यांची परिस्थिती ह्यांच्याशी उद्दिष्टे मेळ बसणारी आहेत काय ? विद्यार्थ्याने निवडलेल्या एकंदर अभ्यासक्रमाशी ही उद्दिष्टे सुसंगत आहेत काय ? उद्दिष्टे ही सुनिश्चित व स्पष्टपणे मांडलेली आहेत काय ? अध्यापकाने ह्या उद्दिष्टांच्या पूर्ततेचे मूल्यांकन कोणत्या रीतीने होऊ शकेल याबाबत काही विचार केलेला आहे काय ? इत्यादी प्रश्नांच्या संदर्भात वैयक्तिक मत नोंदविले जावे, असे अपेक्षित आहे.

दुसरा प्रकार : अध्यापकाने मूल्यमापनासाठी पुरविलेली अध्यापनसाधनसामग्री ही त्याने ठरविलेल्या उद्दिष्टांची पूर्तता करण्यास सक्षम आहे किंवा नाही हे पाहणे. सहकारी अध्यापकांना विषयाचे स्वरूप व विद्यार्थ्यांची माहिती प्रत्यक्षपणे असल्यामुळे अध्यापकाने आपल्यापुरती निर्धारित केलेली उद्दिष्टे कितपत वास्तवपूर्ण आहेत किंवा त्याने निवडलेल्या साधनसामग्रीच्या साहाय्याने ती उद्दिष्टे साध्य होऊ शकतील किंवा नाही, साध्य होऊ शकत असल्यास किती प्रमाणात साध्य होऊ शकतात ह्यावर अधिकृतपणे ते मतप्रदर्शन करू शकतात.

सहअध्यापकांनी करावयाच्या मूल्यमापनात अध्यापकाच्या अध्यापनातील परिणामकारकतेचाही विचार येतोच. अशा प्रकारे सहअध्यापकांनी केलेले अध्यापनाचे मूल्यमापन हे विश्वासार्ह असते असा निष्कर्ष ह्याबाबत झालेल्या संशोधनातून निघालेला आहे.[११] गुथ्री व ब्रेस्कॅम्प ह्या शिक्षणतज्ज्ञांच्या मते सहअध्यापकांनी प्रत्यक्ष अध्यापनाचे मूल्यमापन करण्याऐवजी परिणामकारक अध्यापन करण्याला आवश्यक असणारे गुण संबंधित अध्यापकात किती प्रमाणात आहेत ह्यावरून मूल्यमापन ठरवावे व तसे करणे त्यांना शक्य असते

अनुक्रमणिका

कारण वर्गाबाहेरदेखील अध्यापक एकमेकांच्या सान्निध्यात असतात. अध्यापकाला अध्यापनाविषयी कितपत आस्था आहे, विद्यार्थ्यांच्या हिताची त्याला किती कळकळ आहे हे सहकारी अध्यापकांच्या सहज लक्षात येऊ शकते. पुष्कळदा ही बाब वरिष्ठांच्या नजरेला येतेच असे नाही व विद्यार्थ्यांनादेखील त्याची जाणीव असेलच असे नाही. अध्यापनाच्या विषयातील अध्यापकाची तयारी कितपत आहे ह्याचीही कल्पना सहअध्यापकांना सहवासाने येते. अध्यापकाचे आपल्या विषयाच्या संदर्भातील वाचन, बौद्धिक बाबतीत त्याच्या मताचा होणारा आदर, त्याच्या ज्ञानातील अद्ययावतता, व त्याचा विषय इतर ज्ञानशाखांशी कसा निगडित आहे याविषयीची त्याची जाणीव इत्यादींबाबत सहकारी अध्यापकांना चांगल्यापैकी माहिती असते. शिक्षणतज्ज्ञ फ्रेंच-लोझोविक यांनी तर अध्यापकाच्या मूल्यमापनात सहअध्यापकांनी केलेल्या मूल्यमापनाला महत्त्वाचे स्थान असावयास हवे असे म्हटले आहे. परंतु त्यासोबतच विद्यार्थ्यांनी अध्यापनकार्याचे जे मूल्यमापन केले असेल त्याचाही विचार व्हावा असेही म्हटले आहे. मात्र सहअध्यापकांकडून होणाऱ्या मूल्यमापनात अध्यापकाचे विषयाचे ज्ञान, अध्यापनामागचा त्याचा दृष्टिकोण व विद्यार्थ्यांना मिळालेले यश ह्या तीनच कसोट्या लावण्यात याव्यात असे मत त्यांनी व्यक्त केले आहे. वरील प्रकारे सहअध्यापकाने करावयाचे मूल्यमापन हे स्वतंत्रपणे व अनामिक पद्धतीने व्हावयास हवे असे त्यांना वाटते.

वरील अटींची पूर्तता होऊ शकत असेल तर फ्रेंच-लोझोविक ह्यांनी प्रत्यक्ष मूल्यमापनासाठी पुढील कार्यपद्धती सुचविलेली आहे.[११]

(१) प्रत्येक अध्यापकाचे मूल्यमापन करण्यासाठी किमान तीन अध्यापकांची समिती असावी. हे अध्यापक, (अ) ज्याचे मूल्यमापन व्हावयाचे आहे त्या अध्यापकाच्या सतत संपर्कात असणारे, (ब) त्याच विषयाचे अध्यापन करणारे, (क) ज्याचे ते मूल्यमापन करणार असतील त्याच्याकडून त्याच वेळी किंवा भविष्यात त्यांचे स्वतःचे मूल्यमापन होणार असलेले व (ड) मूल्यमापनाचे काम काळजीपूर्वक व प्रामाणिकपणे करू शकणारे असावयास हवेत.

(२) हे मूल्यमापन करणाऱ्या अध्यापकांची निवड ज्याचे मूल्यमापन व्हावयाचे आहे त्या अध्यापकाने संस्थाप्रमुखांना / प्राचार्यांना दिलेल्या नावांच्या यादीतून करण्यात यावी. संस्थाप्रमुखांनी यादीतून केलेली निवड ही अंतिम असावी.

(३) मूल्यमापन समितीची बैठक संस्थाप्रमुखांनी घेऊन चर्चाद्वारे अध्यापकाचे विषयातील ज्ञान, त्याचा अध्यापनामागील दृष्टिकोण व त्याच्या विद्यार्थ्यांना मिळालेले यश ह्यांचे मापन करण्याची पद्धती ठरवून घ्यावी.

(४) मूल्यमापन करणारांनी आपले काम स्वतंत्रपणे करावे व आपला निर्णय अनामिक राहून द्यावा. ह्या बाबतीत पुरेशी गुप्तता बाळगली जावी.

(५) त्यानंतर संस्थाप्रमुखांनी प्रत्येकाने केलेले मूल्यमापन विचारात घेऊन त्यावरून एकत्रित मूल्यमापन पूर्वनिर्धारित पद्धतीने करावे.

ओर्पेन ह्यांनी अध्यापनाची परिणामकारकता ही सत्रोत्तरी परीक्षेतील विद्यार्थ्यांच्या कामगिरीवरून न ठरविता सहअध्यापकांनी प्रत्यक्ष विद्यार्थ्यांच्या मुलाखती घेऊन ती ठरविण्यात यावी असे म्हटलेले आहे. परीक्षेचा निकाल हाच अध्यापकाच्या अध्यापनकार्याची परिणामकारकता मोजण्याचा एकमेव निकष मानणे कसे चुकीचे असते हे कुलीक्, मॅक्केची व डॉयल ह्या शिक्षणतज्ज्ञांनी दाखवून दिले आहे. सत्रोत्तरी परीक्षेत चांगले गुण मिळविणाऱ्या व कमी गुण मिळविणाऱ्या अशा दोन्ही प्रकारच्या काही विद्यार्थ्यांच्या मुलाखती घेऊन अध्यापनाच्या परिणामकारकतेचे मापन करता येईल. अशा मुलाखती परीक्षा झाल्यानंतर काही कालांतराने घेतल्या तर शिकविण्यात आलेल्या भागापैकी किती भाग विद्यार्थ्यांच्या स्मरणात राहिलेला आहे हेही पाहता येईल. मात्र ह्या पद्धतीने अध्यापनाबाबत लगेच निष्कर्ष काढता कामा नये. इतर मार्गांनीदेखील अध्यापनाची परिणामकारकता तपासून पाहावी व त्यानंतर ह्या बाबतीत निष्कर्ष काढावा असेही ओर्पेन ह्यांनी सुचविले आहे.

मिल्लर, हिल्डब्रॅण्ड ह्यांच्यासारख्या शिक्षणतज्ज्ञांनी, सहअध्यापकांनी संबंधित अध्यापकाच्या वर्गावर जाऊन तेथे प्रत्यक्षात अध्यापन कसे केले जाते हे पाहावे, नव्हे, तसे करणे त्यांना सक्तीचे असावे असा आग्रह धरला आहे. स्वतः अध्यापकाला अथवा त्याच्या वर्गातील विद्यार्थ्यांना अध्यापन चालू असताना काय घडत असते हे नेमकेपणाने सांगता येत नाही किंवा तसे सांगण्याची

त्यांची तयारी नसते असे उपरोल्लिखित शिक्षणतज्ज्ञांना वाटते. त्यामुळे अध्यापकाची वेतनश्रेणी, पदोन्नती आदींशी संबंधित मूल्यमापनात सहअध्यापकांनी प्रत्यक्ष वर्गात चालणाऱ्या अध्यापनाचे निरीक्षण करून त्याबाबत आपला अहवाल देणे आवश्यक असल्याचे मत बेले व मॉर्टन ह्यांनी व्यक्त केले आहे. ह्यात अडचण अशी येते की सहअध्यापक हा चांगल्या परिचयाचा असला तरी वर्गाच्या दृष्टीने तो एका अर्थी परकाच असतो व त्याच्या वर्गातील उपस्थितीचा प्रतिकूल परिणाम अध्यापकाच्या कामावर होण्याची शक्यता गॅम्मेल ह्यांनी व्यक्त केली आहे. शिवाय आपल्या कामाचेही मूल्यमापन कधीतरी अशाच पद्धतीने होणार असल्याची जाणीव असल्याने सहअध्यापकाचा अध्यापनाविषयी अनुकूल अभिप्राय देण्याचा कल निर्माण होऊ शकतो. वरील सर्व गोष्टींचा विचार करता ओर्पेन ह्यांनी ह्या पद्धतीविषयी एकूण नापसंती व्यक्त केली आहे.

लाभप्रेरित स्वयंमूल्यमापनात अन्य प्रकारे सहअध्यापकांना सहभागी करून घेता येणे शक्य आहे. मॅक्केची ह्यांनी असे सुचविले आहे की अध्यापकाने केलेले स्वयंमूल्यमापन, त्याच्या विद्यार्थ्यांनी मिळविलेले यश, विद्यार्थ्यांनी त्याचे केलेले मूल्यमापन व अध्यापकाने उपयोजिलेली अध्यापन-सामग्री ह्यांचा साकल्याने विचार करण्याचे काम सहअध्यापकांना अधिक चांगल्या प्रकारे करता येईल. सहअध्यापकांना विषयाचे स्वरूप, शिक्षणसंस्थेचे वातावरण इत्यादींची कल्पना चांगली असल्याने इतर कोणाहीपेक्षा ते हे काम अधिक सक्षमतेने करू शकतात. त्यांना हे काम योग्य रीत्या करता यावे म्हणून विषयविभागाच्या पातळीवर विवक्षित अध्यापनकृतीचे विश्लेषण काळजीपूर्वक करण्यात यावे, त्याचप्रमाणे अध्यापनातील कौशल्य मोजण्याचे निकष कोणते असावेत ह्याची निश्चितीदेखील त्याच पातळीवर करण्यात यावी. म्हणजे मग अध्यापकाची वेतनश्रेणी, पदोन्नती इत्यादींसाठी होणारे मूल्यमापन अधिकाधिक वस्तुनिष्ठ पद्धतीने होऊ शकेल.

## विकासप्रेरित स्वयंमूल्यमापन

आतापर्यंत अध्यापकाच्या स्वयंमूल्यमापनाचा विचार आपण त्या मूल्यमापनावर त्याचे वेतन, पदोन्नती इ. अवलंबून असल्याचे गृहीत धरून केला. अर्थातच अशा प्रकारच्या मूल्यमापनात अंगभूत असणाऱ्या मर्यादाही विचारात घ्याव्या लागतात. त्याऐवजी स्वयंमूल्यमापनाचा हेतू अध्यापनकार्यात सुधारणा होणे व अध्यापकाचा अध्यापक म्हणून विकास होत राहणे हा असला तर (स्वयंमूल्यमापनावर त्याला मिळणारे आर्थिक लाभ अवलंबून नसल्याने) मूल्यमापन अधिक विश्वासार्ह होऊ शकते. यासाठी बऱ्याच विद्यापीठांतून व महाविद्यालयांतून लाभप्रेरित मूल्यमापनाऐवजी विकासप्रेरित मूल्यमापनाची पद्धती अवलंबिली जाते. ही पद्धती तुलनेने अधिक विधायक वाटते. याच कारणाने जगातील अनेक विद्यापीठांतून व महाविद्यालयांमधून तिचा वापर अध्यापकाचे मूल्यमापन करण्यासाठी केला जातो.[१३]

ह्या पद्धतीने मूल्यमापन करताना, अध्यापकाला प्रथम त्याने केलेल्या स्वतःच्या कामाच्या मूल्यमापनाचा संबंध त्याला मिळणाऱ्या आर्थिक लाभाशी किंवा पदोन्नतीशी जोडला जाणार नसल्याची कल्पना दिली जाते. स्वयंमूल्यमापनाचा हेतू त्याच्या अध्यापनकार्याची गुणवत्ता वाढविणे एवढाच असल्याची त्याची खात्री पटवून दिली पाहिजे. त्याचप्रमाणे स्वयंमूल्यमापन करण्याबाबत अध्यापकाला निश्चित स्वरूपाच्या सूचना करण्यात आल्या पाहिजेत. त्यासाठी प्रमाणित रेटिंग-स्केल जर अध्यापकाला पुरविण्यात आली तर स्वयंमूल्यमापन करण्यात अध्यापकाला मदत करता येईल. स्वयंमूल्यमापनाचे काम सुकर करता येईल तितके केले पाहिजे कारण एरव्ही अध्यापक आपणहून स्वतःच्या अध्यापनात कोणते दोष आहेत ह्याचा शोध घेण्याचा किंवा अध्यापनात सुधारणा कशी करता येईल ह्याचा विचार स्वयंप्रेरणेने करतील अशी शक्यता कमी असते. वर्षानुवर्षे ठरावीक पद्धतीने अध्यापन करीत व्यवसायात स्वतःला तरंगत ठेवण्याकडे सामान्य प्रवृत्ती असते. आपल्या अध्यापनकार्याकडे टीकात्मक दृष्टीने पाहणे हे अध्यापकाकडून क्वचित घडून येते. स्वतःच्याच अध्यापनकार्याचे काळजीपूर्वक व पद्धतशीरपणे परीक्षण करणे हे एक तर अतिशय कष्टाचे असते किंवा अति त्रासदायक असते. आपली व्यावसायिक स्थिती समाधानकारक नाही असे अध्यापकाला वाटत असले तरी आपल्या अध्यापनाचा विद्यार्थ्यांवर कोणता परिणाम होतो आहे, अध्यापन हेतुपूर्ण आहे किंवा नाही, अध्यापनातील हेतू कितपत साध्य होतो आहे यांविषयी



अनुक्रमणिका

अध्यापक स्वतः उदासीन असतो असे बेअर्ड व सेल्डीन ह्यांना आढळून आले.[१४]

अध्यापकाने केलेले स्वयंमूल्यमापन हे आर्थिक लाभाशी निगडित नसले तर त्यातून अध्यापकाला स्वतःच्या अध्यापनातील बऱ्या-वाईट बाबींची जाणीव होते व अध्यापनात सुधारणा करण्यास तो प्रवृत्त होतो असा अनुभव आल्याचे अॅलीमोनी, फ्रे इत्यादी संशोधकांनी म्हटले आहे.[१५] डॉयर, वेब्बर व सेल्डीन ह्यांना असे दिसून आले की अध्यापक स्वयंप्रेरणेने आपल्या कामाचे मूल्यमापन करीत नसले तरी कोणी त्यांना ते करावयास सांगितले तर मात्र करू शकतात. त्यामुळे अशा स्वयंमूल्यमापनाची पद्धती इत्यादी तपशील पूर्वनिर्धारित असणे व त्यांनुसार अध्यापकाला स्वयंमूल्यमापनास प्रवृत्त करणे आवश्यक ठरते. मेगाव ह्या शिक्षणतज्ज्ञाने तर असे म्हटले आहे की उपरोक्त कार्यपद्धतीतील प्रत्येक टप्प्यावर मूल्यमापनाचे वेळापत्रकच ठरवून द्यावे.

अध्यापकाने स्वयंमूल्यमापन केल्यावर त्याच्याशी विद्यार्थ्यांनी त्या अध्यापकाच्या अध्यापनाचे केलेले मूल्यमापन स्वतः पडताळून पहावे. अशा प्रकारचा पडताळा करून पाहणे हे अध्यापनकार्याच्या सुधारणेसाठी उपयुक्त ठरते. विद्यार्थ्यांनी केलेले मूल्यमापन अध्यापकाच्या स्वयंमूल्यमापनाशी जुळणारे असले तर सामान्यपणे अध्यापकाचे स्वयंमूल्यामापन यथायोग्य झाले असे मानले पाहिजे. ज्या वेळी ह्या दोन मूल्यमापनांत तफावत दिसत असेल त्या वेळी अध्यापकाने आत्मपरीक्षण केले पाहिजे, आपल्या अध्यापन पद्धतीचे पुनःपरीक्षण केले पाहिजे, मात्र त्याचबरोबर विद्यार्थ्यांनी व्यक्त केलेली मते ही पूर्वग्रहदूषित नसल्याचीही खात्री करून घ्यावी असे क्वीन्न इत्यादी शिक्षणशास्त्रज्ञांनी म्हटले आहे.[१६]

स्वयंमूल्यमापनाला साह्यकारी होण्याच्या दृष्टीने विभागातील सहअध्यापकांचे चर्चासत्र घडवून आणावे असे मेगाव्, कुलीक व मॅक्केची ह्यांनी सुचविले आहे. वरिष्ठांनी संबंधित अध्यापकाची प्रत्यक्ष मुलाखत घेण्याऐवजी वेळोवेळी विभाग अध्यापकांच्या बैठकी व्हाव्यात. अशा बैठकींमध्ये कोणतीही भीड न बाळगता अध्यापकांनी स्वतःचे मूल्यमापन इतरांपुढे मांडावे त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांनी केलेले मूल्यमापनही इतरांच्या नजरेस आणावे. त्यावर अध्यापकांमध्ये मोकळेपणी चर्चा व्हावी. अशा चर्चेतून निघालेले 'निष्कर्ष' त्यात सहभागी असणाऱ्यांनी 'गुप्त' ठेवावे; त्यांची बाहेर चर्चा न करण्याचे बंधन पाळण्यात यावे. अशा चर्चासत्रांना योग्य वातावरण लाभले, तर स्वतःच्या अध्यापनकार्याविषयीची अध्यापकाला वाटणारी खंत किंवा त्यासंबंधीची त्याची काळजी मनातल्या मनात ठेवणे त्याच्या फायद्याचे नाही असे त्याच्या लक्षात येते. आपल्याप्रमाणेच अन्य सहकाऱ्यांनाही तशाच अडचणींना तोंड द्यावे लागते, त्यांच्याही अध्यापनविषयक समस्या आपल्यासारख्याच आहेत या विचाराने, अध्यापकाला प्रामाणिकपणे आपल्या अध्यापनाचे मूल्यमापन इतरांपुढे करण्याला नैतिक बळ प्राप्त होते. मात्र अशा चर्चासत्रात सहभागी होणाऱ्या सर्व अध्यापकांनी चर्चासत्राआधी स्वतःच्या अध्यापनाचे मूल्यमापन आपापल्या परीने केलेले असावे. त्याचबरोबर त्यांनी आपल्या अध्यापनात सुधारणा करण्यासाठी काय करता येईल ह्याचा खोलवर जाऊन विचार केलेला असल्यास उत्तमच.

## सहअध्यापकांनी केलेले विकासप्रेरित मूल्यमापन

बर्क्वीस्ट आदी शिक्षणतज्ज्ञांचे मत असे आहे की सहअध्यापकांना एखाद्या अध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन कदाचित योग्य प्रकारे करता येणार नाही हे शक्य आहे, परंतु त्याच्या अध्यापनात सुधारणा घडवून आणण्याच्या कामी मात्र त्यांचा चांगलाच उपयोग होऊ शकतो.[१७] तथापि येथेही हे मूल्यमापन केवळ अध्यापकाच्या कामात सुधारणा करण्याच्या हेतूने झालेले असावयास हवे. साधारणपणे प्रत्येक अध्यापक आपल्या सहकाऱ्यांचे आपल्या अध्यापनाविषयीचे मत जाणून घेण्यास उत्सुक असतो असे आढळते व अनौपचारिक रीतीने तो ते जाणून घेतोही. मिल्लर आणि सेल्डीन् ह्यांनी याबाबत केलेल्या संशोधनात त्यांना असे आढळले की स्वतःच्या अध्यापनाविषयी अन्य सहकाऱ्यांशी चर्चा करताना त्यांना अध्यापनात सुधारणा करण्याच्या दृष्टीने काही उपयुक्त सूचना मिळाल्या असे अनेक अध्यापकांनी सांगितले.[१८] काही अध्यापक हे स्वतःहून सहकाऱ्यांना आपल्या वर्गातील अध्यापनाचे निरीक्षण करण्याची विनंती करतात, किंवा विद्यार्थ्यांचे स्वतःच्या अध्यापनाविषयी काय मूल्यमापन आहे हे जाणून घेण्याच्या कामी सहअध्यापकांनी त्यांना मदत

करावी अशी त्यांची इच्छा असते तर काही अध्यापक आपण वापरत असलेल्या अध्यापन साहित्याच्या योग्या-योग्यतेविषयी सहकाऱ्यांची मते जाणून घेऊ इच्छितात. परंतु हे सर्व अनौपचारिकपणे होत असते.

अध्यापकाचे अध्यापनकार्य सुधारण्याच्या कामात तीन प्रकारांनी त्याचे सहकारी-अध्यापक सहभागी होऊ शकतात असे ओर्पेन ह्यांनी दाखविले आहे. पैकी पहिला प्रकार म्हणजे ज्याची यापूर्वी चर्चा केली त्या वर्गातील अध्यापनाचे निरीक्षण करणे हा. दुसरा प्रकार म्हणजे अध्यापन-सल्लागार म्हणून कार्य करणे व तिसरा प्रकार म्हणजे उद्दिष्टानुसारी व्यवस्थापन (मॅनेजमेंट बाय ऑब्जेक्टिव्ह) पद्धतीचा अवलंब करण्यात सहभागी होणे.

इतर अध्यापकांकडून अध्यापकाच्या अध्यापनाचे मूल्यमापन हे त्याच्या अध्यापनात सुधारणा करण्याच्या हेतूने प्रेरित असेल तर त्याचे संबंधित अध्यापकाकडून स्वागतच होते हे उपर्युक्त संशोधनाच्या निष्कर्षावरून स्पष्ट आहेच; परंतु ओर्पेन ह्यांनी अनेक संशोधकांनी याबाबत केलेल्या सूचनांचा एकत्रित विचार करून एका विशिष्ट अशा पद्धतीची शिफारस केली आहे. या पद्धतीनुसार (१) अध्यापन-मूल्यमापनाची प्रक्रिया सुरू करण्यात स्वतः त्या अध्यापकाने पुढाकार घ्यावयास हवा. त्याने त्यासाठी आपल्याच विषयाचे अध्यापन करणाऱ्या एक अथवा दोन अध्यापकांची निवड करावी. (२) त्यानंतर निवडलेल्या अध्यापकांशी ह्या अध्यापकाने चर्चा करून त्यांनी अध्यापकाच्या अध्याप-नाचे निरीक्षण कधी करावयाचे तो दिवस व त्या निरी-क्षणाची पद्धती ठरविण्यात यावी. (३) निरीक्षणास सिद्ध असलेल्या अध्यापकांनी आपल्या वरिष्ठांचे व शक्य असल्यास एखाद्या मूल्यमापनतज्ज्ञाचे साह्य घेऊन वर्गातील अध्यापनात आपल्याला कोणकोणत्या बाबींचे निरीक्षण करावयाचे आहे, अध्यापनात अध्यापकाकडून कोणत्या बाबी अपेक्षित आहेत ह्याची यादी तयार करावी. परंतु ज्या गोष्टींची अध्यापकाकडून अपेक्षा करावयाची त्या अध्यापकाच्या क्षमतेच्या मानाने अधिक नसाव्यात हे पाहावे. शिवाय ज्या गोष्टींची अध्यापन सुधारण्यासाठी अत्यंत आवश्यकता असते, त्याच बाबींचा समावेश यादीत करावा. प्रत्येक बाब ही अत्यंत स्पष्ट शब्दांत व नेमकेपणाने नोंदली जावी. म्हणजे अध्यापनात त्यांची पूर्तता झाली किंवा नाही व अध्यापनावर तिचा निश्चित असा कोणता परिणाम झाला हे बघता येईल. (४) वर्गानंतर अध्यापकाने निरीक्षण-कर्त्यांना भेटून त्यांच्याशी त्याच्या अध्यापनात त्यांना चांगले काय आढळले व कोणते दोष दिसले ह्याची चर्चा करावी. निरीक्षकांनी अध्यापनातील उणिवा दाखवीत असतानाच आवश्यक त्या सुधारणा सुचवाव्या. त्याच वेळी अध्यापक व निरीक्षक ह्यांनी परस्परविचारविनि-मयाने निश्चित केलेल्या सुधारणांची अंमलबजावणी अध्यापकाकडून प्रत्यक्ष अध्यापनात कशी केली जाते हे पाहण्यासाठी पुन: निरीक्षण करण्याचे ठरविण्यात यावे. (५) ह्यानंतर अध्यापनाचे अंतिम निरीक्षण व्हावे व अध्यापनात सुधारणा घडून आली किंवा नाही, घडून आली असल्यास कितपत घडून आली ह्याची चर्चा निरीक्षण करणारे व अध्यापक ह्यांच्यात घडून यावी.

सहकारी अध्यापकांनी अध्यापकाच्या कामाचे मूल्य-मापन करण्याच्या पद्धतीतील फायदे लक्षात घेऊनच अलीकडे अमेरिकेतील विद्यापीठांतून वरीलप्रमाणे औपचारिक पद्धतीचा वापर करून अध्यापनात सुधारणा घडवून आणण्याकडे कल वाढत असल्याचे दिसते. ह्या पद्धतीने झालेल्या मूल्यमापनातून अध्यापनात सुधारणा घडून येते व त्याचे प्रत्यंतर विद्यार्थींनी अध्यापनाविषयी व्यक्त केलेल्या अनुकूल अभिप्रायांत व विद्यार्थ्यांच्या चांगल्या निकालावरूनदेखील येते असे मुरे, वॉलार्ड इ. संशोधकांना आढळले.

परदेशातील काही विद्यापीठांनी / शिक्षणसंस्थांनी अध्यापकांमधूनच 'अध्यापनतज्ज्ञ' ही पदे निर्माण करून उपरोक्त पद्धतीचे औपचारिकीकरण केलेले आहे. अध्यापकांनी इतर अध्यापकांना आपल्या अध्यापनाचे निरीक्षण करण्यास पाचारण करण्याऐवजी शिक्षण-संस्थाच अध्यापनतज्ज्ञांची वरीलप्रमाणे नेमणूक करतात. अध्यापकाने ह्या तज्ज्ञांचे साहाय्य अध्यापनविषयक बाबींमध्ये नियमितपणे घ्यावयाचे असते. वर्गातील अध्यापनाचे निरीक्षण करणे व तदनुसार अध्यापकाला सल्ला देणे ह्याव्यतिरिक्त अध्यापनकार्यासंबंधी व्याख्याने देणे, परिसंवाद घडवून आणणे इत्यादी कार्य अध्यापन-तज्ज्ञांनी करावे अशी अपेक्षा असते.

ज्या अध्यापकांची 'अध्यापनतज्ज्ञ' म्हणून निवड करण्यात येईल त्यांचे स्वतःचे प्रशिक्षण होणे आवश्यक असल्याचे मत शिफ् इत्यादी शिक्षणतज्ज्ञांनी व्यक्त केले आहे. अध्यापनतज्ज्ञ हे स्वतः परिणामकारक अध्यापन



अनुक्रमणिका

करू शकणारे असावेत व त्याबाबत त्यांची योग्य ती चाचणी झालेली असावी हे ओघानेच येते.

अध्यापनतज्ज्ञ हे समव्यावसायिकांमध्ये ज्यांची प्रतिष्ठा आहे असेच असावेत व त्यासाठी अध्यापकांनाच त्यांना कोणाचा सल्ला घेणे आवडेल हे विचारावे व त्या आधाराने अध्यापनतज्ज्ञांची निवड व्हावी; म्हणजे अध्यापनतज्ज्ञांविषयीच अध्यापकाला अविश्वास निर्माण होण्याचे प्रसंग सहसा उद्‌भवणार नाहीत.

अनेकदा अध्यापकाला स्वतःला आपल्या अध्यापनात कोणत्या सुधारणा आवश्यक आहेत ह्याची कल्पना येऊनही त्या गोष्टी अमलात आणण्याआड त्याच्या वैयक्तिक स्वरूपाच्या काही समस्या येऊ शकतील. त्यांचे निवारण करण्यासही अध्यापनतज्ज्ञाने मदत करावी. नपेक्षा तज्ज्ञांनी केलेले मार्गदर्शन वाया जाईल हे उघडच आहे.

आता हेही खरे आहे की अमेरिकेतील विद्यापीठांमध्येदेखील अध्यापनतज्ज्ञांची निवड व नियुक्ती करणे हे जिकिरीचे व खर्चाचे वाटत आहे. मग आपल्याकडील एकूण परिस्थितीचा विचार केला तर आपल्याकडे हे घडून येणे किती दुरापास्त आहे हे सांगणे नको. अध्यापकांनीच अध्यापकांच्या कामात सुधारणा घडवून आणण्याच्या प्रयत्नांमध्ये अलीकडे व्यापारी व्यवस्थापनशास्त्रात ज्याचा अधिक बोलबाला झाला आहे त्या उद्दिष्टांनुसारी व्यवस्थापनतंत्राचाही ( मॅनेजमेंट बाय ऑब्जेक्टिव्हज ) वापर सुचविण्यात आलेला आहे. अमेरिकेतील काही विद्यापीठांतून त्याचा वापरदेखील होऊ लागलेला आहे.

ही पद्धती थोडक्यात अशी : अध्यापकाने आपल्या वरिष्ठांना (सामान्यपणे विभागप्रमुखाला) भेटून पूर्वी ठरलेल्या निकषांच्या आधाराने त्यांच्याशी आपल्या कामाविषयी चर्चा करायची. उद्दिष्टांनुसारी व्यवस्थापनपद्धतीनुसार वेळोवेळी केलेल्या वरील पद्धतीच्या चर्चेपलीकडे जाऊन, (१) अध्यापनकृतीसाठी ठोस व मापनयोग्य उद्दिष्टे ठरविणे, (२) ही उद्दिष्टे ठरविताना त्यात अध्यापकाचा सहभाग असणे, (३) वेळोवेळी बैठका घेऊन उद्दिष्टपूर्तीचा आढावा घेणे व पुढील कालखंडासाठीची उद्दिष्टे निश्चित करणे व (४) विद्यापीठ किंवा महाविद्यालय ह्यांची ह्या कार्यक्रमाला बांधिलकी असणे ह्या बाबीदेखील आवश्यक असतात.

ओर्पेन ह्यांनी उद्दिष्टांनुसारी व्यवस्थापनपद्धती व सहअध्यापकांद्वारे होणारे अध्यापनाचे मूल्यमापन ह्यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला आहे. त्या दृष्टीने त्यांनी पुढील योजना सुचविली आहे—

(१) निरनिराळ्या विभागप्रमुखांनी एकत्र येऊन आपापल्या विभागासाठी सर्वसंमत उद्दिष्टे वर्षारंभी निश्चित करावी. ज्याप्रमाणे व्यापारी क्षेत्रात उद्दिष्टानुसारी व्यवस्थापनतंत्राचा वापर करताना 'दर्जाविषयक सूचना' ठोसपणे मांडल्या जातात त्याप्रमाणे ही उद्दिष्टेदेखील निःसंदिग्ध शब्दांत मांडली जावीत. त्यांबाबत संबंधितांच्या मनात पूर्ण स्पष्टता असल्याखेरीज त्यांना आपल्याकडून कोणती अपेक्षा आहे व तिच्या पूर्ततेसाठी आपल्याला नेमके काय करावे लागेल हे कळू शकत नाही.

(२) तदनंतर विभागप्रमुखांनी आपापल्या विभागातील सहकाऱ्यांची बैठक घेऊन त्यांच्यापर्यंत ठरलेली उद्दिष्टे पोचवावीत, व त्यांच्या मनातील शंका व प्रश्नांचे निराकरण करावे.

(३) त्यानंतर प्रत्येक अध्यापकाने स्वतंत्रपणे विभाग प्रमुखाला भेटून त्याने उद्दिष्टपूर्तीसाठी स्वतःकरिता ठरवून घेतलेल्या कार्यक्रमाची चर्चा करावी. ह्या ठिकाणी विभागप्रमुखांनी आपले मत संबंधित अध्यापकावर लादू नये; तर त्याला त्याचे उद्दिष्ट पूर्ण करण्याच्या कामी मदत कशी करता येईल ते पाहावे.

(४) ह्या बैठकीच्या वेळी विभागप्रमुखांनी अध्यापकाला अशा दोन सहकाऱ्यांची निवड करायला सांगावे की ज्यांच्या सहकार्याने त्याला वर्षभर आपल्या अध्यापनात सुधारणा करण्याची इच्छा आहे.

(५) अशा निवडलेल्या सहकाऱ्यांनी अध्यापकाच्या अध्यापनाचे निरीक्षण वर्षभराच्या काळात करावे व त्यातील गुणदोषांची चर्चा त्या त्या अध्यापकाशी करावी. ह्या चर्चेच्या आधाराने संबंधित अध्यापकाने विभागप्रमुखांना आपल्या अध्यापनाबाबतचा अहवाल 'नियमितपणे होणाऱ्या विभागीय बैठकी'च्या वेळी द्यावा. विभागाच्या कामाचे सिंहावलोकन करण्यासाठी अशा बैठका वेळोवेळी घेण्यात याव्यात.

(६) वर्षसमाप्तीच्या वेळी अध्यापकाने विभागप्रमुखाबरोबर आपल्या वर्षाभरातील अध्यापनकार्याचे पुनरावलोकन करावे. त्यात सुरुवातीला ठरविलेली अध्यापनाची उद्दिष्टे कितपत साध्य झाली ह्याची पाहणी करण्यात यावी.








(७) विभागातील अध्यापकांनी एकमेकांच्या अध्यापनात सुधारणा घडवून आणण्यासाठी सहकार्याचा दृष्टिकोण ठेवून काम करावे.

प्रस्तुत लेखात विद्यापीठ व महाविद्यालयीन पातळीवरील अध्यापकांच्या कार्याचे स्वरूप आधुनिक काळाच्या संदर्भात कोणते अपेक्षित आहे ह्याची चर्चा आली आहे. आपल्याकडे विद्यापीठ अनुदान आयोगाचीदेखील तीच अपेक्षा आहे व त्या अपेक्षेत काही गैर आहे अशी भूमिका संघटित प्राध्यापकवर्गाने अजून तरी निदान घेतलेली नाही. प्रत्यक्षात आज प्राध्यापक काय करतात हा विषय वेगळा आहे. उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील सध्याची दुरवस्था नष्ट करायची असली तर प्राध्यापकांच्या कार्याला सध्या आहे त्याहून अधिक व्यापक अर्थ मिळवून द्यावा लागणार आहे. अर्थातच ह्या कामी शिक्षणाचे धोरण ठरविणारे, शासन, संस्थाचालक व स्वतः प्राध्यापक ह्यांचे सहकार्य हवे. प्राध्यापकांच्या संघटनेने विधायक भूमिका अधिक प्रमाणात घेऊन याबाबत काय करता येईल हे पुढाकार घेऊन ठरविण्याची आज गरज आहे असे म्हणावेसे वाटते.

लेखाच्या दुसऱ्या भागात प्राध्यापकाच्या कार्याचे मूल्यमापन होणे आवश्यक आहे हे मान्य करून स्वयंमूल्यमापन पद्धती व सहअध्यापकांद्वारे होणारे अध्यापनाचे मूल्यमापन ह्यांचा परामर्श परदेशांत त्याबाबत आलेल्या अनुभवाच्या आधाराने घेतला आहे. आपल्याकडील परिस्थिती वेगळी आहे, समस्यांचे स्वरूपही वेगळे आहे. तथापि इतरत्र ह्या दिशेने झालेल्या प्रयत्नांतून काही मार्गदर्शन आपल्याला मिळू शकते काय हेही पाहिले पाहिजे. सध्या प्राध्यापकांसाठी नव्या वेतनश्रेणी लागू करण्याची प्रक्रिया सुरू आहे. त्या संदर्भात स्वयंमूल्यमापनाचे काही फॉर्म्स प्राध्यापकांना भरावे लागले. त्यांतील काही बाबी प्राध्यापकांनाही इतक्या नवीन होत्या की त्यांचे प्रयोजन बहुतेकांच्या लक्षातही आले नाही असे साधारणपणे आढळले.

निष्कर्षवजा पुढील गोष्टी ह्या संदर्भात महत्त्वाच्या वाटतात :

(१) शासन, समाज व स्वतः प्राध्यापकवर्गाने अध्यापकाच्या कामाबाबतच्या पारंपरिक कल्पना आता सोडून देण्याची वेळ आली असून, अध्यापनाला कालानुरूप नवा व्यापक अर्थ प्राप्त करून देण्याच्या कामी स्वतः प्राध्यापक व त्यांच्या संघटनांनी येथून पुढच्या काळात स्वतःला जुंपून घ्यायला हवे.

(२) सध्या शासनाचा दृष्टिकोण अध्यापकाने केलेल्या स्वयंमूल्यमापनाचा संबंध त्याच्या वेतनश्रेणीशी, पदोन्नतीशी जोडण्याचा दिसतो. हा दृष्टिकोण अध्यापनात सुधारणा होण्याच्या हेतूलाच मारक ठरू शकतो. अशा प्रकारच्या लाभप्रेरित स्वयंमूल्यमापनाऐवजी सुधार-प्रेरित स्वयंमूल्यमापनावर भर दिला तरच अपेक्षित परिणाम घडून येण्याची आशा ठेवता येईल.

(३) स्वयंमूल्यमापनाचा किंवा सहअध्यापकांनी केलेल्या अध्यापनाच्या मूल्यमापनाचा हेतू सफल होण्यासाठी परस्परविश्वासाचे, सहकार्याचे वातावरण शैक्षणिक संस्थांमध्ये असणे अगत्याचे आहे. तसे ते निर्माण करण्यासाठी प्राध्यापक संघटनांनी पुढाकार घेणे आवश्यक आहे.

प्राध्यापक संघटनेची भूमिका ह्या प्रश्नांसंबंधी विधायक स्वरूपाचीच आहे असे मानावयास आजतरी जागा आहे. तेव्हा वेगवेगळ्या पातळ्यांवरील प्राध्यापक संघटनांनी प्राध्यापकाच्या कार्याच्या स्वरूपाविषयी व अध्यापनाच्या मूल्यमापनाविषयी चर्चा, परिसंवाद घडवून आणून, ह्या प्रश्नांबाबत जागृती घडवून आणावी, प्रत्यक्ष काही कार्यक्रम राबविण्याच्या योजना तयार कराव्या असे सुचवावेसे वाटते.

हा लेख तयार करताना 'जर्नल ऑफ हायर एज्युकेशन' ह्या विद्यापीठ आयोगातर्फे प्रकाशित होणाऱ्या नियतकालिकाच्या १९८७–८८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या (Vol. 13, No. 1–3) ह्या अंकातील (१) मुनीस रझा व मार्जरी फर्नांडिस ह्यांच्या 'फन्क्शन्स ऑफ टीचर्स इन हायर एज्युकेशन' ह्या व (२) ख्रिस्तोफर ओर्पेनलिखित "इव्हॅल्युएशन ॲण्ड इम्प्रुव्हमेंट ऑफ युनिव्हर्सिटी टीचिंग" ह्या दोन लेखांचा आधार घेतलेला आहे.






संदर्भ :


१. हिरेमठ, एस. बी.– 'पॅटर्न्स ऑफ करीयर मोबिलिटी'– कन्सेप्ट पब्लिशिंग कंपनी, १९८०.

२. लाईट, डोनाल्ड, 'थिंकिग अबाऊट फॅकल्टी', १९७४.

३. ट्रो एम ॲण्ड फूल्टन ओ; 'रिसर्च ॲक्टिव्हिटी इन अमेरिकन हायर एज्युकेशन', मॅक्ग्रोहिल, १९७५.

४. एल्ब के. ओ., 'द क्राफ्ट ऑफ टीचिंग', सॅनफ्रॅन्सिस्को, जोसे-बास, १९८४.

५. मिल्लर आर. आय, 'इव्हॅल्युएटीन्ग फॅकल्टी परफॉर्मन्स्', सॅनफ्रॅन्सिस्को, जोसे-बास, १९८२.

६. क्रॉनबॉक् एल, 'इसेन्सियल्स् ऑफ सायकॉलॉजिकल टेस्टिन्ग,' मॅक्ग्रोहिल, न्यूयॉर्क, १९८०.

७. कुलीक् जे. ए. ॲण्ड मॅक्केची डब्लू जे., 'द इव्हॅल्युएशन ऑफ टीचर्स इन हायर एज्युकेशन', रिव्ह्यू ऑफ रिसर्च इन हायर एज्युकेशन, १९८५, ३.

८. डॉयल के. ओ. ॲण्ड क्रिटन एल. आय., 'स्टुडंट, पीअर ॲण्ड सेल्फ इव्हॅल्युएशन ऑफ कॉलेज इन्स्ट्रक्शन', जर्नल ऑफ एज्युकेशनल सायकॉलॉजी, १९७१, ७०.

९. ब्लॅकबर्न आर. टी ॲण्ड क्लार्क एम. जे., 'ॲन ॲसेसमेंट ऑफ फॅकल्टी परफॉर्मन्स, सम कोरिलेटस बिटविन ॲडमिनिस्ट्रेटर, कलीग्, स्टुडंट ॲण्ड सेल्फ रेटिंग्ज', सोशिओलॉजी ऑफ एज्युकेशन, १९७५, ४८.

१०. ओर्पेन डी., 'मॅनेजमेंट-बाय-ऑब्जेक्टिव्हज् इन ए युनिव्हर्सिटी सेटिंग', डिकीन युनिव्हर्सिटी, व्हिक्टोरिया, ऑस्ट्रेलिया, १९८६.

११. मॅस्लो ए. जे. ॲण्ड झिम्मरमन डब्ल्यू.– 'कॉलेज टीचिंग ॲबिलिटी, स्कॉलर्ली ॲक्टिव्हिटी ॲण्ड पर्सनॅलिटी', जर्नल ऑफ एज्युकेशनल सायकॉलॉजी, १९५६, ४७.
–ब्लॅकबर्न आर. टी. ॲण्ड क्लार्क एम. जे., पूर्वोक्त.

१२. फ्रेंच-लॅझोविक जी., इव्हॅल्युएशन ऑफ कॉलेज टीचिंग, वॉशिंगटन, डी. सी., असोशिएशन ऑफ अमेरिकन कॉलेज प्रेस, १९७६.

१३. सेल्डीन पी., हाऊ कॉलेजेस इव्हॅल्युएट प्रोफेसर्स, न्यूयॉर्क, ब्लीथ पेनिंगटन, १९७५.

१४. सेल्डीन पी. सक्सेसफूल फॅकल्टी इव्हॅल्युएशन प्रोग्रॅम्स, न्यूयॉर्क, डॉन्व्हेन्टरी प्रेस, १९८३.
– बेअर्ड आर., 'टीचिंग ॲण्ड लर्निंग इन हायर एज्युकेशन', लंडन, पेन्ग्वीन, १९७५.

१५. ॲलीमोनी एल. एम. 'द युजफूलनेस ऑफ स्टुडन्ट इव्हॅल्युएशन्स इन इंप्रुव्हिंग कॉलेज टीचिंग', युनिव्हर्सिटी ऑफ इलिनॉय, १९७४.

१६. क्विन्न एम. आर., 'डिझाईनिंग ॲन इफेक्टिव्ह फॅकल्टी इव्हॅल्युएशन प्रोग्रॅम', जर्नल ऑफ बिझिनेस एज्युकेशन, १९७८–८१.

१७. बर्कवीस्ट डब्ल्यू. एच. व इ., हॅण्डबुक ऑफ फॅकल्टी डेव्हलपमेंट, वॉशिंग्टन, डी. सी. डॅनबिल प्रेस, १९८५.

१८. मिल्लर, आर. आय., पूर्वोक्त.






अनुक्रमणिका








## वाद्–संवाद्

संपादक,
नवभारत यांस,
स. न. वि. वि.

मे–जून १९८८ च्या 'नवभारत' मासिकाच्या अंकात मासिकाचे संपादक प्राचार्य मे. पुं. रेगे यांनी डॉ. आंबेडकरांच्या 'रिडल्स इन हिंदुइझम' या पुस्तकाच्या संदर्भात माझी मुलाखत घेतली. त्या मुलाखतीचे शीर्षक 'सुटलेली कोडी' असे आहे. या मुलाखतीवर अनेकांच्या आपापल्या प्रतिक्रिया 'नवभारत' मासिकातच नंतर प्रसिद्ध झाल्या. प्रा. अरुण कांबळे यांची प्रतिक्रिया 'सुटलेली कोडी ?' या शीर्षकाखाली आंबेडकर भारत, अंक ५ वा, महापरिनिर्वाण दिन–६ डिसेंबर १९८८ या अनियतकालिकात प्रसिद्ध झाली व ती 'नवभारता'च्या मे १९८९ च्या अंकात पुनर्मुद्रित झाली. हिंदू संस्कृतीची व हिंदू धर्माची कोडी अनेक आणि विविध आहेत. सुमारे पाच सहस्र वर्षांच्या कालावधीत ही हिंदूंची भारतीय संस्कृती या देशात दृढमूल होऊन नांदत आहे. त्यात ही कोडी निर्माण झाली व दृढमूल झाली आहेत. मानवसमाजात गेल्या सहा सहस्र वर्षांमध्ये आठ संस्कृतींचा इतिहास घडला आहे. त्यांपैकी अनेक संस्कृती विकास पावल्या, विस्तारल्या; राज्यसंस्था, कला, साहित्य, धर्म, विविध चालीरीती व सामाजिक संस्था यांच्या रूपांत त्या नांदल्या; कालांतराने ढासळल्या व विराम पावल्या. अशा प्राचीन आठ संस्कृतींपैकी दोन संस्कृती सतत अखंडितपणे आतापर्यंत स्थिरावल्या आहेत. त्या म्हणजे हिंदूंची भारतीय संस्कृती आणि चिनी संस्कृती.

आधुनिक पाश्चात्त्य संस्कृतीच्या निकटच्या संपर्कात ही प्राचीन भारतीय संस्कृती आली आणि गेल्या दोनशे वर्षांत तिच्यातील गुणदोषांचा, अंधश्रद्धांचा व सामाजिक न्याय-अन्यायांचा परामर्श आधुनिक सुशिक्षित करू लागले. गेल्या शंभर वर्षांत या हिंदू समाजरचनेमध्ये मौलिक परिवर्तन व्हावे, सामाजिक अन्यायाची दर्शक विषम समाजरचनेची चौकट नष्ट होऊन सामाजिक समता व सामाजिक न्यायाच्या तत्त्वावर पुनर्रचना व्हावी, असा ध्ययवाद व्यक्त होऊ लागला. भारताची राजकीय स्वातंत्र्याची चळवळ यशस्वी झाल्यावर भारतात संसदीय लोकशाही मूलभूत मानवी मूल्यांच्या अधिष्ठानावर संविधानद्वारा उभी राहिली, व ती कार्यवाहीतही आली. त्याला बेचाळीस वर्षे झाली. ह्या संसदीय लोकशाहीनेही कोडी सुटण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे. ही संसदीय लोकशाही अधिक समर्थ बनली तर ही कोडी पूर्णपणे सुटतील.

प्रा. अरुण कांबळे म्हणतात, की 'जातिसिद्ध म्हणजे जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यावर आधारलेली समाजरचना हिंदू समाज आता मानीत नाही, हे शास्त्रीबुवांचे म्हणणे धडधडीत खोटे आहे.' त्यावर उत्तर असे की संसदीय लोकशाही कार्यवाहीत आहे की नाही ? २८ प्रादेशिक राज्ये आणि भारताचे केंद्रिय राज्य हे वयात आलेल्या मतदारांच्या बहुमताने निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या द्वारे प्रशासित होत आहे. त्यांच्याशी चातुर्वर्ण्य व जातिसंस्था यांचा काडीचा संबंध नाही. राखीव जागा म्हणजे परंपरागत जन्मसिद्ध उच्च-नीच रचनेचे अवशेष म्हणून राहिलेले दोष बाधू नयेत, ह्याकरिता केलेली तरतूद आहे. पाच हजार वर्षे विषम समाजरचना राहिली, तिचे अवशेष शल्यभूत म्हणून नवे सामाजिक रोग निर्माण करू शकतात; ते रोग उद्भवू नयेत याकरिता केलेल्या त्या तरतुदी आहेत. उदार असे वातावरण भारताच्या विधानसभा, विधानपरिषदा, लोकसभा आणि राज्यसभा यांच्यामध्ये दिसून येते. तेथे जातिसंस्था व जातिविषयक अहंकार व्यक्त होणे, हे लज्जास्पद मानले जाते. याचा अर्थ विचारक्षेत्रात, उच्च स्तरात परंपरेच्या विचारांची बंधने नष्ट होत आहेत; याचा अर्थ सगळी कोडी सुटण्याची पार्श्वभूमी तयार झाली आहे.

हिंदू समाजाने भारताचा संसदीय लोकशाहीचा मूलभूत कायदा म्हणजे संविधान निर्माण करण्याचे नेतृत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना मुक्त मनाने अर्पण केले. याचा अर्थ हिंदू समाजाने म्हणजे सुशिक्षित हिंदू

समाजाने जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यावर आधारलेली समाजरचना अमान्य केली आहे. निरक्षर हिंदू समाज फार मोठा आहे. प्रचंड निरक्षर हिंदू समाज हा एक भारतीय संसदीय लोकशाहीला मोठा धोकाच आहे; परंतु या धोक्यास सुशिक्षित हिंदू समाज आवरू शकतो हे अनेक प्रसंगांनी सिद्ध झाले आहे व होत आहे.

आज भारतातील विधानसभा, विधानपरिषदा, लोकसभा, राज्यसभा, नगरपालिका, महानगरपालिका इ. संसदीय लोकशाही संस्थांमध्ये दलित आणि मागासलेल्या जमातींचे सदस्य विराजमान होऊन मुक्तपणे या संस्था वरिष्ठजातीय सदस्यांच्या खांद्यास खांदा लावून चालवीत आहेत. हे महान व भव्य दृश्य आहे. ते सूचित करते, की ही कोंडी सुटत आहेत; न सुटलेली सुटण्याच्या मार्गात आहेत; ही प्रक्रिया विरुद्ध होत नाही. सर्वच कोंडी हळूहळू सुटत आहेत. ही कोंडी आधुनिक शिक्षण सोडवीत आहे. उच्च, मागासलेले, दलित, भटके, वनवासी, आदिवासी वगैरे शिक्षण मिळालेले सगळेच सांस्कृतिक दृष्टचा समान उच्च पातळीवर येऊन जीवन जगू लागले आहेत.

या देशात आधुनिक शिक्षणाची हजारो माध्यमिक विद्यालये, उच्च महाविद्यालये आणि शेकडो विविध विद्यापीठे आधुनिक शिक्षण देत आहेत. त्या शिक्षणपद्धतीला जन्मसिद्ध चातुर्वर्ण्याचा स्पर्श नाही. भारतीय विद्यापीठे व महाविद्यालयांमध्ये शेकडो दलित व मागासलेले सुशिक्षित विद्याविभूषित अध्यापनाचे काम करीत आहेत आणि ते तथाकथित उच्च वर्णीयांच्या जोडीने करीत आहेत. ही गोष्ट आकडेवारीने निश्चित करता येते, केवळ दूर बसून केलेल्या अंदाजाने नव्हे. सबंध भारताचे सर्वेक्षण केल्यास लक्षात येते, की लक्षावधी प्राथमिक व माध्यमिक शिक्षक हे दलित व मागासलेले असून ते तथाकथित उच्च वर्णीयांबरोबर विद्यादानाची पवित्र कामगिरी बजावत आहेत.

प्रशासनाच्या क्षेत्राकडे दृष्टिक्षेप करा, म्हणजे लक्षात येईल, की जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यव्यवस्था भारतातील केंद्र शासनाला व प्रादेशिक शासनाला संपूर्ण अमान्य आहे. आणि तशी मान्यता दिसल्यास, तो गुन्हा ठरतो. उच्च स्तरावर मंत्री, राज्यमंत्री व उपमंत्री केंद्र शासनात व प्रादेशिक राज्यांच्या शासनांत दलित व मागासलेल्या वर्गातील असल्याचे मधूनमधून लक्षात भरते; लक्षात आणावे लागत नाही. श्री. सुशीलकुमार शिंद्यांसारखे कर्तबगार प्रशासक केंद्र प्रशासनातही आढळून येतात व प्रादेशिक प्रशासनातही कोठे कोठे आढळून येतात.

सामाजिक जीवनात आणि केवढा मोठा प्रचंड बदल होत आहे, याचे निकट दर्शन प्रा. अरुण कांबळे यांनी करणे जरूर आहे. जातिसंस्थेची दोन महत्त्वाची लक्षणे सांगितली जातात– रोटीबंधन आणि बेटीबंधन. आता रोटीबंधनाचा निरास केवळ कायद्यात राहिला नाही. मुंबई, पुणे, दिल्ली, कलकत्ता, मद्रास इ. शहरांमधील हॉटेलमध्ये–पंचतारांकित असोत अथवा तारकारहित असोत–सगळ्या जातिजमाती एका टेबलावर भोजन करीत असतात. सहभोजनाचा अधिकार हा भोगला जातो, ही गोष्ट स्पष्टपणे अवलोकनात येणारी आहे, ती नाकारता येत नाही. स्वातंत्र्यपूर्व काळात इंडियन नॅशनल काँग्रेसची अधिवेशने प्रतिवर्षी भरत. त्या अधिवेशनाच्या प्रसंगी सर्व जातिजमातींचे व धर्मांचे सहस्रावधी लोक मांडीला मांडी लावून भोजन करीत. आता हा सहभोजनाचा प्रश्न कोणाच्याही मनात चुकूनही येत नाही. जन्मसिद्ध जातिव्यवस्थेचे भोजननिर्बंध हे लक्षण होते; ते आता समाजाचे कुलक्षण ठरले आहे. शंभर वर्षांपूर्वी लो. टिळक व महादेव गोविंद रानडे यांना ख्रिश्चन मिशनऱ्याकडे चहा घेतल्याबद्दल पुण्याच्या ब्राह्मणांनी प्रायश्चित्त घ्यावयास लावले. आता तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी–वेदशास्त्र शिकवण्याच्या पाठशाळेचे अध्यक्ष–यांच्या घरी दलित समाजातील एक महिला, त्यांच्या स्वयंपाकघरात सुग्रास अन्न तयार करून वाढत असते. वाईसारख्या ब्राह्मण जमातीचे वर्चस्व असलेल्या तीर्थक्षेत्रात हे आता आक्षेपार्ह मानले जात नाही व कोणी आक्षेपार्ह मानत असल्यास त्याला कोणी मानत नाही. मनुस्मृतीचे धर्मशास्त्र-मनुस्मृतीचे पुस्तक आता केवळ धर्मेतिहास व कायद्याचा इतिहास समजावून घेण्याकरताच हिंदू पंडित व कायद्याचे विद्यार्थी वाचतात. डॉ. आंबेडकरांनी मनुस्मृती जाळली, त्यानंतर काही थोड्याच वर्षांत हिंदूंचा समान नागरिक कायदा केंद्र शासनाने पारित केला. त्यामुळे दलित तरुण आणि ब्राह्मण तरुणी यांचा विवाह वैध ठरला असून, त्यांची संतती ही औरस म्हणून हक्कदार झाली आहे. जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यव्यवस्था शिक्षित हिंदू समाजाने अमान्य केली आहे ही गोष्ट उत्तम रीतीने विविध प्रकारच्या सामाजिक,





राजकीय व सांस्कृतिक संस्थांच्या यशस्वी कार्यवाहीमुळे संशयातित झालेली आहे.

प्रा. अरुण कांबळे यांना असे सुचवावेसे वाटते, की जातिसंस्था ही कमीत कमी अडीच ते तीन हजार वर्षे जबरदस्त ताकतीने टिकली, निर्माण होत राहिली. जवळजवळ तीन हजार जाति-पोटजातींच्या रूपांत अनिर्बंधपणे नांदली. याचे कारण विशिष्ट राजकीय सत्ता होय. ही राजकीय सत्ता धार्मिक अंधश्रद्धा, राजसत्ता व जातपंचायत मिळून बनलेली वरिष्ठसत्ता. ही वरिष्ठसत्ता जाति-पोटजातींना व उपजातींना टिकवू शकली. धार्मिक अंधश्रद्धा ब्राह्मणनामक पुरोहितवर्गाने मिथ्य-कथांच्या म्हणजे धार्मिक-पौराणिक कथांच्या द्वारा टिकविली. उदा., देवाच्या मुखातून ब्राह्मण, बाहूतून क्षत्रिय, जांघांतून वैश्य आणि पायांतून शूद्र निर्माण झाले. चार वर्ण उच्च-नीच स्वरूपांत देवानेच निर्माण केलेत, त्या त्या वर्णाच्या आईबापांच्या पोटी पूर्वकर्माने जीवात्मा जन्म घेतो, ही दुसरी तात्त्विक मिथ्यकथा होय. म्हणजे कर्मसिद्धान्त ! तो ब्राह्मणांच्या द्वारे जोपासला; परंतु मनुष्य धार्मिक कथांच्या जोरावर धार्मिक आचरण नियमितपणे करत नसतो. त्याच्या आचरणाला नियमबद्ध पक्के रूप देणारी प्रत्यक्ष दंडव्यवस्था असावी लागते.

भारतीय दंडव्यवस्था म्हणजे क्षत्रियवर्णाची राजसंस्था. भारतीय धर्मशास्त्रात म्हटल्याप्रमाणे राजा हा योग्य प्रकारे समुचितपणे दंडाची अंमलबजावणी करतो. तेव्हा वर्णाश्रम धर्मव्यवस्था टिकते. त्याकरता परमेश्वराने क्षत्रियवर्णासह राजा निर्मिला आहे. भारतातील राजसंस्था ही परंपरागत जातिव्यवस्थेची नीट अंमलबजावणी करीत दीर्घकालपर्यंत स्थिरावली. सत्ता म्हणजे जातपंचायत. या जातपंचायतीचा अंमल इंग्रजी राज्य स्थापन झाल्यावरही खालपासून वरपर्यंत सर्व जाति-जमातींमध्ये चालू होता. वर आम्ही न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे व लो. बाळ गंगाधर टिळक यांच्या प्रायश्चित्तप्रकरणाचे उदाहरण दिलेच आहे ही जातपंचायत ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यानंतर हिंदू समाजाच्या पांढरपेशा वर्गात कार्यक्षम राहिली नाही. एकोणिसाव्या शतकात ती ढिली होत गेली व या विसाव्या शतकात ती नामशेष झाली. आता या जातपंचायती तीक्ष्ण किंवा क्षीण स्वरूपात हिंदू समाजाच्या खालच्या स्तरांमध्ये अजून अंमल करीत आहेत. त्यांच्याशी ब्राह्मणनामक पुरोहितवर्गाचा काहीही संबंध नाही. जातपंचायत ही जातींनी स्वयंनिर्मित असलेली अत्यंत पुरातन संस्था आहे. तात्पर्य, प्रा. अरुण कांबळे यांना अशी विनंती करावीशी वाटते, की या हिंदू समाजाचे सामाजिक परिवर्तन करण्यास आवश्यक अशी मीमांसा करीत असता, जोतिराव फुल्यांच्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर या द्विवर्णी मीमांसेपेक्षा अधिक व्यापक चातुर्वर्ण्यव्यवस्थेचे पृथक्करण करणे आवश्यक आहे. ब्राह्मण-पुरोहित हा दक्षिणा देणाऱ्या यजमानवर्गाचा अंकित असतो. क्षत्रिय, वैश्य व संपन्न शिल्पजीवी शूद्र या तीन वर्णांच्या धार्मिक गरजांवर जगणारा परोपजीवी यजमानांच्या हांजीहांजीवर जगणारा वर्ग होय; हे विसरून चालणार नाही. कोडी सुटत आहेत, यात शंका नाही; परंतु ती मुळीच सुटत नाहीत, सुटण्याचा वरवर भास आहे, एक प्रकारची वंचना आहे, असेही म्हणण्यास जागा आहे. अजून गावकुसाच्या बाहेरील वसत्या व गावकुसाच्या आतील वसत्या यांची मुक्त सरमिसळ होत नाही, हे अगदी उघड आहे. ब्राह्मणाला दोष देऊन केवळ ब्राह्मणाला पकडून हे प्रश्न सुटणार नाहीत; ही गोष्ट डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना नीट कळली होती. ब्राह्मण ग्रामसंस्थेतला बलुता आहे. तेथील ग्रामपंचायत मुख्य. तिने दलिताला गावकुसाबाहेर बंदिस्त केले व वेठबिगार चालू ठेवली. विटाळ केवळ ब्राह्मणाला होत नाही. ९० टक्के सवर्ण प्रजेला होतो. ब्राह्मण हा त्यातील क्षत्रिय, वैश्य व संपन्न शिल्पजीवी शूद्र वर्णांचा अंकित; हे ध्यानात ठेवले तरच परंपरागत हिंदू समाजाची मीमांसा वास्तवाधिष्ठित ठेवता येते. कारण सर्व सवर्ण हे दलित जातींना राबविण्याकरता संबद्ध असलेले व त्यामध्ये हितसंबंध गुंतलेले लक्षात घेतले पाहिजेत. केवळ ब्राह्मणवर्ग लक्षात ठेवून ही मीमांसा एकांगी होते, हे प्रा. अरुण कांबळे यांनी लक्षात ठेवले पाहिजे. वस्तुवादी मीमांसा हवी की नको ? साप समजून भुई धोपटण्याचा कार्यक्रम चालू ठेवला, तर कोडी सुटण्याला शक्ती मिळणे शक्य नाही. व्यापक वस्तुवादी दृष्टिकोण पाहिजे. म्हणजेच समाजशास्त्रीय दृष्टिकोण पाहिजे.

ही कोडी सुटण्याकरता जातिभेद विचाराबरोबरच वंशभेद-विचारही लक्षात घेणे आवश्यक ठरते. धर्मशास्त्राप्रमाणे आर्यवंश आणि अनार्य शूद्रवंश असे दोन वंश मानावे लागतात. वंशभेद म्हणजे शरीरलक्षणांचे



अनुक्रमणिका

वैशिष्टच, कातडीचा रंग, डोळयाचा रंग, मस्तकमिति म्हणजे-लंब कपाल, गोल कपाल वगैरे अशी ही वंशलक्षणे भारतातल्या उच्च वर्गीयांमध्ये अगदी वेगळी अशी डोळयांत आणि मनात भरतील इतकी वेगळी राहिली आहेत काय ? सवर्ण व दलित असा शरीरलक्षणांच्या स्वरूपातला भेद हिंदू समाजात राहिला नाही. देशस्थ ब्राह्मणांपैकी ५०-६० टक्के दलितांच्याही पंक्तीत नीट एकरूपपणे सामावून जाऊ शकतात. दुसरे असे की प्रदेशभेदाबरोबर शरीरलक्षणभेद अनुस्यूत असतात. बंगालमध्ये ज्या तऱ्हेची वंशलक्षणे दिसतात त्यांपेक्षा पंजाबमध्ये निराळी दिसतात हे खरे आहे; परंतु त्याचा आर्य आणि अनार्य या धर्मशास्त्रोक्त भेदाशी काहीही संबंध नाही. आंध्रातील दलित आणि उच्च वर्णीय यांच्यामध्ये अधिक जवळीक व साम्य दिसते. बंगालमधील उच्च वर्णीय आणि महाराष्ट्रातील उच्च वर्णीय यांच्यात कितीतरी मोठा फरक दिसतो. ही प्रादेशिक वंशलक्षणे म्हणजे आर्य-अनार्य भेद दर्शविणारी लक्षणे नव्हेत. मूळ मुद्दा असा, की सवर्ण व दलित यांच्यातही निश्चितपणे शरीरलक्षणांचा फरक हिशेबाने मांडता येत नाही. आणि दृष्टिपथात तर दाखवणे पुष्कळ वेळा कठीण जाते. राहणीतला भेद दिसतो, परंतु तो शिक्षणाने बदलता येतो. भाषेतला फरक दिसतो, तो शिक्षणाने बदलता येतो या संबंध चर्चेतला मूळ मुद्दा असा, की कोडी सुटत असलो, तरी ती सुटत असताना ती सरळपणे बिनतक्रार सुटत आहेत, असे म्हणता येत नाही त्याकरिता आवश्यक असलेली ध्येयवादाची प्रेरणा सगळया सामाजिक परिवर्तनास अनुकूल असलेल्या संस्थांच्या कार्यकर्त्यांमध्ये नवा उत्साह निर्माण करील; विशेषत: शिक्षणसंस्थांमध्ये असलेल्या आधुनिक शिक्षकवर्गाला कृतिशील बनवील, इतकी उत्कट व्हावयास पाहिजे.

**– लक्ष्मणशास्त्री जोशी**

संपादक, नवभारत यांस,

स. न. वि. वि.

आपला मे ८९ चा अंक आजच (२३।९।८९) ला मिळाला. आपणास विचारणा करणार होतो तेवढयात निवेदनाची चिठ्ठी वाचली व खुलासा मिळाला. आपण आपल्यावरील आमच्या विश्वासाबद्दल निश्चित राहा. हा अंक जगावा ही मनोमन इच्छा. ह्यातील लेखांनी विचाराला स्थिर बैठक प्राप्त करून दिली आहे आणि म्हणूनच मी रु. ३००/- भरून आजीव सदस्य झालो. तुमचा अंक ही माझ्या दिवंगत वडिलांनी मला दिलेली मोठी भेट आहे.

ह्या अंकातील अरुण कांबळे ह्यांचा लेख अत्यंत उत्कृष्ट आहे व तर्कतीर्थांवर केलेले निर्भय भाष्य ते स्वतःच ज्याचे अध्यक्ष व विश्वस्त आहेत, त्या अंकात वाचण्यास मिळाला. लोकशाहीतील विचारस्वातंत्र्य कसे असते, ते पाहावयास मिळाले, आणि म्हणूनच हा अंक जगला पाहिजे.

अरुण कांबळेंना माझे वैयक्तिक अभिनंदन कळवावे ही विनंती मी जोशी असल्याने आमचे पूर्वज कसे वागलेत ह्याचे सुंदर विवेचन वाचण्यास मिळाले.

काळ बदलला पाहिजे व तसेच विचार पक्के बलवान व न्याय्य झाले पाहिजेत. शेवटी माणूस व माणुसकीच महत्त्वाची असो.

आपण जसे होईल त्याप्रमाणे अंक पाठवत राहा. मी वाट पाहीन. विलंबाची काळजी नसावी.

**– रंजन र. जोशी**

संपादक, नवभारत यांस,

स. न. वि. वि.

नवभारत ( मे १९८९ )च्या अंकातील एस. डी. इनामदार ह्यांचा ऑर्फिअसच्या मिथ्यावरचा लेख (ऑर्फिअस : दोन दृष्टिकोण) वाचला. त्याची मांडणी, त्यामधील विश्लेषण खूप आवडले. जी. ए. कुलकर्णी अन् दिलीप चित्रे यांच्या दोन रूपककथांचे त्यांनी फार चांगल्या भाषेत रसग्रहण करून त्यांमागील आशयाचे चांगले स्पष्टीकरण केले आहे.

मृत्यूचे सार्वभौमत्व, त्याच्या अस्तित्वाने जाणवणारे जीवनाचे क्षणभंगुरत्व (अस्तित्ववादी निर्णयाला वेढून टाकणारा नियतिवाद), मानवी व्यक्तित्वाच्या गाभ्यात असणारी शून्यता, रिक्तता; त्यामुळे हे जीवन निरर्थक अन् असह्य यातना देणारे ओझे बनते. हे अस्तित्ववादी तत्त्वज्ञानाचे वर्णन प्रभावी वाटले.

मला एक गोष्ट नेहमीच चिंतनीय अशी वाटत आली आहे : आपल्या अनेक साहित्यिकांच्या विचार-विश्वावर पडलेली पाश्चिमात्य संस्कृतीची आणि तत्त्व-ज्ञानाची दाट छाया. आपल्या परंपरागत संस्कृतीपासून त्याचे जे अलगीकरण ( Alienation ) झाले आहे त्याचे ही गोष्ट निर्देशन करीत असावी. वैज्ञानिक संकल्पनांना वैश्विक स्वरूप असू शकते. साहित्यात, संस्कृतीमध्ये इतर संस्कृतींच्या कल्पनांची एवढ्या मोठ्या प्रमाणात केलेली उसनवारी कितपत नैसर्गिक आहे ? असा एक प्रश्न कधीतरी पुढे येतो.

टागोरांनी गीतांजलीमध्ये जीवन-मृत्यूबद्दल आपल्या व्यक्त केलेल्या कल्पना– Because I love this life, I know I shall love death as well– यात आपल्या सांस्कृतिक विचारांचे प्रतिबिंब दिसते. डब्ल्यू. बी. येट्ससारखे पाश्चिमात्य साहित्यिक त्यामुळे आपणास जीवनाकडे पाहण्यासाठी एक नवा दृष्टिकोण मिळाला असे भावपूर्ण भाषेत सांगतात.

आधुनिक भौतिकीप्रमाणे निर्मिती व विनाश ही एकाच सत्याची दोन रूपे असतात. निर्मिती झाल्यास विनाश हा अपरिहार्य होतो.

**– वसंत त्रिं. चिपळोणकर**

⊙ ⊙ ⊙





अनुक्रमणिका







Registered No. SAT-3/89

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमालेची

### संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

* वैदिक संस्कृतीचा विकास। तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ६० रु.
* हिंदुधर्माची समीक्षा (तृतीयावृत्ती) व सर्वधर्मसमीक्षा (प्रथमावृत्ती) – तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ५० रु.
* अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र० स्वामी केवलानंद सरस्वती — २०० रु.
* क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य । डॉ० रा० भा० पाटणकर — २० रु.
* पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ० सुमंत मुरंजन — २० रु.
* लोकशाहीचे धोके । पन्नालाल सुराणा — ८ रु.
* भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श । सौ० कमल पाध्ये — ८ रु.
* हिंदी साहित्यविचार । प्रा० प्यारेलाल गोहेल — ५ रु.
* महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना । चा० अ० दाभोलकर — ५ रु.
* श्री० यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ — ४० रु.
* संशोधन साधना । डॉ० वसंत स० जोशी — २५ रु.
* ज्ञानदेव चिंतन (संपादित) । डॉ० वसंत स० जोशी — ३० रु.
* आनंदाचा डोह । प्रा० रा० ग० जाधव — १६ रु.
* भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराजकृत ) बालकांड — १५ रु.
* तरंगयामिक व पुंजयामिक । मा० ग० टोळे — १० रु.
* आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी — ४० रु.
* वागीश्वरी । डॉ० गो० के० भट — २० रु.
* नवमानवतावाद व मानवाचा आदर्श — २५ रु.
* प्रस्थानभेद ( प्राचीन १४ विद्यांची माहिती ) पुनर्मुद्रण । गं० वा० लेले — १५ रु.
* बौद्धधर्माचा अभ्युदय आणि प्रसार ( पुनर्मुद्रण ) । प० ल० वैद्य — १० रु.
* चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान ( आवृत्ती दुसरी ) । सदाशिव आठवले — २५ रु.
* गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे — १० रु.
* इतिहासाचे तत्त्वज्ञान ( दुसरी आवृत्ती ) । सदाशिव आठवले — ६० रु.
* दासशूद्रांची गुलामगिरी ( भाग-२ ) । शरद पाटील — ७० रु.

संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई ( जि. सातारा )

हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून
मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






